# हिंदु धर्माचीं तत्वें

( अर्थात् यासंबंधीं निरनिराळ्या विषयावर वैद्यांनीं दिलेलीं व्याख्यानें व लिहिलेले लेख. )



लेखक,

चिंतामण विनायक वैद्य,
एम. ए., एलएल. बी.

टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुळगुरु आणि
संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, मध्ययुगीन भारत,
महाभारत-उपसंहार, वगैरेचे कर्ते.

---

पुणें.
१९३१

---

किंमत बारा आणे.

# प्रस्तावना.

' धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजाः ॥ '

हिंदु धर्माचीं तत्त्वें श्रुति आणि स्मृति या धर्मग्रंथांत सांगितलीं असून श्रुति म्हणजे उपनिषदांसह चारी वेद आणि स्मृति म्हणजे महाभारतासह अठरा स्मृत्या एवढें विस्तृत वाङ्मय धर्माचें मूळ असल्यानें हिंदुधर्माचीं मूळतत्त्वें निश्चित करून तीं धर्मसंज्ञेला कशीं योग्य आहेत म्हणजे समाजाचें रक्षण व कल्याण करणारीं कशीं आहेत हें पाश्चात्य निरीक्षणानें सिद्ध करून देणें अत्यंत परिश्रमाचें व विद्वत्तेचें आहे, तथापि ईश्वरकृपेनें फार सक्तीच्या वेळीं ( अलीकडे तर सर्वच वेळ फुरसतीचा आहे) माझा परिचय या वाङ्मयाशीं बराच झाला. विशेषतः बादरायणाचीं सूत्रें व त्यांवरील शांकरभाष्य समग्र वाचण्याचा सुयोग विद्वान् काशीचे राहणारे व न्याय व वेदांत दोहोंत पारंगत रामशास्त्री हरडीकर यांच्याबरोबर ग्वालेरीस आल्यानें या विषयावर कांहीं साधार सांगण्याचा मला अधिकार प्राप्त झाला. यामुळें यासंबंधानें कित्येक लेख विविधज्ञानविस्तारांत ग्वालेरीहून परत आल्यावर मीं लिहिले व अलीकडे गणपति-उत्सवात याच विषयासंबंधानें बरींच व्याख्यानें दिलीं. हा विस्तार एकत्र करून ' हिंदु धर्माचीं तत्त्वें ' हा ग्रंथ मी वाचकांपुढें ठेवीत आहें.

धर्माचें-बाह्यधर्माचें-स्वरूप विचार व आचार यांत मुख्यतः असतें. प्रत्येक धर्माचें तत्त्वज्ञान भिन्न आहे. नीतीचे विचार जरी सर्वांचे एक आहेत तरी पारलौकिक विचार भिन्न असणें अपरिहार्य आहे. कारण ईश्वर आहे हें सर्वांस जरी मान्य आहे तरी तो कसा आहे व कोठें आहे; आत्मा आहे हें सर्व धर्मास मान्य आहे पण तो कसा आहे, शरीरांत कसा येतो व बाहेर कसा जातो, मेल्यावर त्याची गति काय होते इत्यादि गोष्टी कल्पनेनें, किंवा प्रत्यक्ष अनुभवानें किंवा रसायनशास्त्रानेंहि न सुटणाऱ्या असल्यानें भिन्न भिन्न देशांत या प्रश्नांवर आचार्यांनीं निरनिराळीं मतें प्रतिपादन करणें अपरिहार्य आहे. तेव्हां आपल्या आर्य ऋषींनीं यासंबंधीं काय केलें हें प्रत्येक हिंदु-धर्माभिमानी मनुष्यास माहीत असणें जरूर आहे. तत्त्वज्ञानाचा हा विषय जितका विशद करतां येईल तितका मीं या ग्रंथांत केला आहे आणि इतर धर्मांतील तत्त्वज्ञानाच्या तुलनेनें उपनिषदांतून प्रतिपादिलेलें तत्त्वज्ञान अधिक उदात्त आणि बुद्धीस पटणारें कसें आहे

हेंहि दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.या विवेचनांत नवीन इंग्रजी शिक्षण घेतलेले तरुण ज्या ज्या शंका घेऊं शकतील त्या त्या घेतल्या आहेत आणि त्याचे समाधान करण्याचा प्रयत्न शांकरमतानुसारें केला आहे. श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या विशाल बुद्धिमत्तेनें आपल्या भाष्यांत अशा सर्व शंका उपस्थित करून त्यांस उत्तरे दिलीं आहेत हें मागण्यासारखें आहे.

विचाराचा विचार झाल्यावर आचाराकडे वळता आपल्या हिंदुधर्मांत मूर्तीपूजा, वर्णव्यवस्था वगैरे अनेक आचारनियम बुद्धीस पटणारे नाहींत असें अनेक सुशिक्षितास वाटतें आणि तत्त्वज्ञानाच्या बाबतींत हिंदु धर्म श्रेष्ठ आहे तर या आचाराच्या बाबतींत तो कनिष्ट आहे, अशी पुष्कळांची तक्रार निदान समजूत आहे. यासंबंधानें माझे काय विचार आहेत हें मीं माझे लेखात व व्याख्यानात सांगितलें असून त्यांचा समावेश या ग्रंथात केला आहे." धर्मो धारयते प्रजाः " या व्याख्येप्रमाणें हिंदुधर्मांतील आचारहि समाजाचें रक्षण व पोषण करणारा आहे असें माझें मत असून तें मीं वाचकांपुढें या पुस्तकांत ठेविलें आहे. तें कितपत सत्य आहे याचा विचार वाचकांनीं करावा.

अनेक वेळां हिंदुधर्माचीं मूळभूत तत्त्वें काय आहेत असा मला ठिकठिकाणीं अनेक आस्तिक लोकांनीं प्रश्न केला. तीं तत्त्वें प्रतिपादन करण्यास एखादा स्वतंत्र ग्रंथ लिहावा असें मला एकदां वाटलें व तसें कित्येकांनीं सुचविलें. परंतु मला फुरसत झाली नाहीं हें एक आणि हीं व्याख्यानें व हे लेख एकत्र छापले असता हिंदुधर्माचीं तत्त्वें योग्य रीतीनें कळतील अशी माझी कल्पना,या दोन कारणांनीं हा ग्रंथ मी वाचकांपुढें ठेवीत आहें आणि माझी खात्री आहे कीं, या ग्रंथावरून हिंदुधर्माचीं तत्त्वें त्याच्या चांगलीं निदर्शनास येतील. हा ग्रंथ काढण्याचा विचार गुदस्ताच गणेशोत्सवाच्या वेळीं होता. परंतु तो सुयोग कित्येक कारणांनीं आला नाहीं. यंदाच्याहि गणपत्युत्सवांत, हें कार्य होऊं शकलें नाही ही दिलगिरीची गोष्ट होय. पण आणखी एक वर्ष वाट पहाणें इष्ट नाहीं असें वाटल्यावरून कार्तिक शुद्ध एकादशीच्या पुण्यदिवशीं मी हा लहानसा ग्रंथ प्रसिद्ध करून लोकांपुढें ठेवीत आहें त्याचा योग्य आदर जनता करील अशी आशा व्यक्त करून मी ही प्रस्तावना पुरी करतों.

कार्तिक शु. ११ शके १८५३ **चिंतामण विनायक वैद्य.**

# हिंदुधर्माचीं तत्त्वें.



## प्रस्ताव.

गतवर्षीं ( १९२९ ) गणेशोत्सवाच्या प्रसंगीं कोणत्या विषयावर व्याख्यानें द्यावीं याचा विचार करीत असतां केसरींतील एक उतारा माझ्या नजरेस आला. अमेरिकेंत भौतिक शास्त्रें व तत्त्वज्ञान यांची प्रगति विशेष झाली असल्यानें तेथील कित्येक सुशिक्षितांनीं कांहीं धर्मासंबंधीं प्रश्न शंभर ख्रिस्ती धर्मोपदेशकांस केले. त्यांचीं जीं उत्तरें आलीं तीं व ते प्रश्न मनन करण्यासारखे आहेत. उत्तरें तीन प्रकारचीं ( १ ) होय ( २ ) नाहीं ( ३ ) आह्मांस सांगता येत नाहीं अशीं होतीं. मात्र पहिला प्रश्न 'ईश्वर आहे कीं नाहीं ?' हा असून सर्वांनींच आहे असें उत्तर दिलें. पुढील प्रश्नांची यादी व उत्तरें येणेंप्रमाणें—

| | होय | नाहीं | सांगतां येत नाहीं |
|---|---|---|---|
| २ जगाची उत्पत्ति बायबलांत सांगितल्याप्रमाणें झाली कीं काय ? | ५ | ८९ | ६ |
| ३ सैतान आहे कीं नाहीं ? | ९ | ८२ | ९ |
| ४ स्वर्ग आणि नरक खरे आहेत काय ? | ११ | ७६ | १३ |
| ५ मृत्यूनंतर पुनर्जन्म होतो कीं काय ? | ७९ | ४ | ७ |
| ६ पुनरुत्थानाच्या दिवशीं ईश्वर न्याय करणार आहे कीं काय ? | १७ | ६७ | १६ |
| ७ येसू पुनः येणार आहे कीं काय ? | ८ | ७५ | १७ |
| ८ येशूच्या करारानंतर दुसरा ग्रंथ होणार आहे कीं काय ? | १८ | ६९ | १३ |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ येशूच्या फांशीनें मनुष्याचे गुन्हे माफ झाले काय ? | २९ | ६१ | १० |
| १० प्रार्थनेनें कुदरत बदलते कीं काय ? | २१ | ५७ | २२ |

वरील उत्तरांच्या प्रकारावरून अमेरिकेमध्यें भौतिकशास्त्राच्या प्रगतीमुळें ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या श्रद्धेमध्यें सुद्धां कसा घोंटाळा उत्पन्न झाला आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल. हिंदुस्थानांतहि पाश्चात्य तत्त्वज्ञान आणि भौतिकशास्त्रें यांच्या प्रसारामुळें हिंदु सुशिक्षित लोकांच्या हृदयांत हिंदुधर्मभावना बरीच डळमळीत झाली आहे, हें आपण पहातों. तेव्हां वरील प्रश्न हिंदु धर्मामध्यें कसे सोडविलेले आहेत आणि हिंदुधर्माचीं तत्त्वें भौतिक शास्त्राच्या ज्ञानालाहि कशीं प्रतिकूल नाहींत हें दाखविणें यावेळीं अत्यंत महत्त्वाचें आहे असें मला वाटलें. या दृष्टीनें गतवर्षी गजाननोत्सवांत मुंबईस व पुणें मुक्कामीं या मुद्दयांवर मीं व्याख्यानें दिलीं. त्यांतील विचार हिंदू जनतेपुढें काय-मचे रहावेत या हेतूनें मी हा ग्रंथ लिहित आहें. माझ्या व्याख्यानांत जे विचार मीं बोलण्याच्या पद्धतीनें सांगितले तेच या ग्रंथांत विस्तार-पूर्वक लिहिण्याच्या पद्धतीनें हिंदु लोकांसमोर मांडीत आहे. धर्माची भावना श्रद्धेवर अवलंबून आहे यांत तर शंकाच नाहीं. ख्रिस्ती किंवा इतर धर्मांत या मुद्दयासंबंधानें जीं मतें प्रतिपादिलीं आहेत तीं खोटीं आणि हिंदुधर्माचीं मतें खरीं असें मला दाखवावयाचें नाहीं. कारण धर्माचीं तत्त्वें मुख्यतः पारलौकिक गोष्टीसंबंधानें निर्णय सांगणारीं असतात. तेथें बुद्धिजीवी तत्त्वज्ञानाचा किंवा प्रत्यक्ष प्रमाणाचा फारसा शिरकाव नाहीं आणि आपल्यास मान्य असलेल्या ऋषींनीं जें सांगि-तलें तें त्या ऋषींस मानणाऱ्या लोकांनीं श्रद्धेनें आतांपर्यंत मानलें ते यापुढेंहि मानतील व मानावें. तात्पर्य परधर्माच्या मतांवर मला कोणताहि आक्षेप घ्यावयाचा नाहीं. फक्त हिंदुधर्म वरील मुद्दयांवर व

तदनुषंगी कित्येक गोष्टींवर काय सांगतो आणि तें त्याचें सांगणें भौतिक शास्त्राला अविरोधी बुद्धीला पटणारें कसें आहे, एवढेंच या ग्रंथांत सांगावयाचें आहे. आणि भौतिक शास्त्राच्या प्रगतीनें डळमळणारी तरुण सुशिक्षित हिंदु लोकांची हिंदूधर्मश्रद्धा निश्चल रहावी हा या ग्रंथाचा मुख्य हेतु आहे.

वरील मुद्दयांशिवाय आणखी कांहीं मुद्दे हिंदुधर्माला तत्त्वभूत असलेले असे आहेत कीं ते इतर धर्मांत नाहींत व त्याविषयीं सुशिक्षित हिंदू लोकांत पुष्कळ अश्रद्धा उत्पन्न झाली आहे. तेव्हां त्या कित्येक मुद्दयांविषयींहि माझे विचार हिंदू लोकांपुढें मांडणें जरूर आहे. हिंदु धर्मांत मान्य असलेली वर्णव्यवस्था व मूर्तिपूजा ह्या दोहोंबद्दल हल्लीं पुष्कळच अश्रद्धा उत्पन्न झाली आहे. आणि या दोन गोष्टी हिंदू धर्मांतच दिसतात, तेव्हां ह्या व इतर मुद्दयासंबंधानेंहि मीं निरनिराळ्या प्रसंगीं व्याख्यान देऊन माझे विचार मी लोकांपुढें ठेवले तेहि या ग्रंथांत ग्रथित करीत आहे.

या लेखांतील विवरण बहुतेक औपनिषदिक तत्त्वज्ञानानुसार विशेषत: भगवद्गीतेच्या मतानुसार ठिकठिकाणीं त्या त्या ग्रंथांतील वचनांचा आधार देऊन केलें आहे. यामुळें नवीन दृष्टि कोठें लावली असली तरी त्याला मुळांत हिंदुधर्मांत आधार असल्यानें लोकादरास हा ग्रंथ पात्र होईल अशी मला आशा आहे.

---

# १ ईश्वर आहे काय ?

ईश्वराचें अस्तित्व सर्व ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं मान्य केलें आहे. त्याचप्रमाणें हिंदूधर्महि ईश्वराचें अस्तित्व मानतो. बहुतेक सर्व धर्मांत ईश्वराचें अस्तित्व मानलें आहे. पण धर्म म्हटला म्हणजे ईश्वर मानलाच पाहिजे असें नाहीं. बौद्ध धर्मांत आणि जैन धर्मांत ईश्वराचें अस्तित्व मानलेलें नाहीं. नास्तिक म्हणजे ईश्वर नाहीं असें म्हणणारे लोक केवळ धर्महीन आहेत असें मानतां येत नाहीं. या जगतांत धर्म नाहीं, पापपुण्य नाहीं, आत्मा नाहीं, परलोक नाहीं, ईश्वर नाहीं, असा सर्वच गोष्टींना नकार देणारे कट्टर नास्तिक आपण सोडून दिले तरी सामान्य नास्तिक म्हणजे निरीश्वरवादी लोक धर्महीन आहेत असें नाहीं. परंतु अशा लोकांचे बौद्धादि एकदोन धर्म सोडले असतां बहुतेक सर्व धर्मांत ईश्वर आहे असेंच मानलेलें आहे.

तात्त्विक दृष्ट्या विचार करूं लागलें म्हणजे ईश्वर नाहीं, कारण तो कोठेंहि दिसत नाहीं अशी प्रथम कल्पना येते. तसेंच स्पेन्सर-सारख्या महाभौतिकशास्त्रवेत्त्यांनीं ईश्वर आहे कीं नाहीं हें आम्हांस सांगतां येत नाहीं, तो अज्ञेय आहे असें मानलें हें प्रसिद्ध आहे. ईश्वराचें अस्तित्व जगांतील नीतिप्रयुक्त व्यवहाराला मुळींच आवश्यक नाहीं असेंहि पुष्कळ नीतिशास्त्रज्ञ म्हणतात. किंबहुना बुद्धानेंहि असेंच सांगितलें. एका शिष्यानें बुद्धास ‘ ईश्वर आहे कीं नाहीं ? ’ हा प्रश्न केला, तेव्हां त्यानें उत्तर दिलें ‘ ईश्वर आहे असें मीं तुला सांगितलें आहे काय ? ’ शिष्यानें उत्तर दिलें ‘नाहीं.’ बुद्धानें पुन्हां विचारलें, ‘ ईश्वर नाहीं असें मीं तुला सांगितलें आहे काय ? ’ शिष्यानें उत्तर दिलें, ‘ तसेंहि नाहीं. ’ तेव्हां बुद्धानें शेवटीं सांगितलें कीं, ‘ ईश्वर आहे किंवा नाहीं या गोष्टीचा तूं विचारच करूं नकोस.’

तात्पर्य, नीतीच्या किंवा धर्माच्या व्यवहाराला ईश्वराच्या अस्तित्वाची आवश्यकता नाहीं आणि भौतिक शास्त्रांत तर ईश्वराचें अस्तित्व निश्चयानें सिद्ध होत नाहीं.

असें जरी आहे तरी मनुष्याचें मन ईश्वर आहे कीं नाहीं ही चौकशी बुद्धिमत्तेनें केल्याशिवाय रहात नाहीं. ईश्वराची कल्पना कशी उत्पन्न झाली याचा आपण प्रथम थोडासा विचार करूं. तात्त्विक दृष्ट्या ईश्वराच्या कल्पनेचें मूळ जीवाच्या कल्पनेंत आहे. हें शरीर जड आहे हें आपण पहातों. पण या शरीरास चालविणारा आणि सुख-दु:ख भोगणारा व विचार करणारा असा कोणी त्यांत अन्य आहे कीं नाहीं ? “ भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत: ” असा प्रश्न करणारे नास्तिक शरीराहून अन्य कोणतीहि वस्तु नाहीं असें स्पष्ट मानतात. पण कांहीं तरी जीववस्तु शरीराहून भिन्न आहे असें आपल्या प्रत्ययास येतें. ती वस्तु जरी अदृश्य असली तरी ती तिच्या परिणामावरून वायूप्रमाणें आपल्यास अस्तित्व दाखविते आणि ती शरीरासारखी जड नाहीं हेंहि आपल्या प्रत्ययास येतें. शरीराहून भिन्न जीव अथवा आत्मा आहे ही गोष्ट सर्व धर्मांत मानलेली आहे. कठोपनिषदांत या प्रश्नासंबंधानें प्रथमच निर्देश केलेला आहे. ‘ येयं प्रेते विचिकित्सा मनुष्येऽस्तीत्येके नायमस्तीति चैके ’ असा उपन्यास करून नचिकेतानें प्रत्यक्ष मृत्यूलाच हा प्रश्न विचारलेला आहे. मनुष्य मेल्यावर असतो असें कांहीं लोक मानतात व तो नसतो असें कांहीं लोक मानतात; तेव्हां यांतील खरें काय ? असा हा प्रश्न असून त्याचें उत्तर आहे, “ मनुष्यांत जो आत्मा आहे, तो शरीर मृत झाल्यावर मृत होत नाहीं ” असेंच मृत्यूनें दिलें. आत्म्याचे अस्तित्वाबरोबर नित्यत्वहि बहुतेक सर्व तत्त्ववेत्त्यांना मान्य झालें असून आत्म्याची साक्ष आपल्यास चांगली पटते. मुख्यत: प्राणिमात्रास सुखदु:खाचा अनुभव

येतो या गोष्टीत येते. बौद्धादि अनीश्वरवादी धर्मसुद्धां याचमुळें आत्म्याचें अस्तित्व मानतात. व सांख्यांतहि मनुष्याचें लक्षण हेंच दिलें आहे. प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं मॅटर आणि मोशन यांच्या पलीकडे तिसरी वस्तु मानली नाहीं. सर्व सृष्टीमध्यें मोशन भरलेली आहे असेंच ते तत्त्ववेत्ते जगताच्या उलाढालीचें कारण मानीत. पण सुखदु:ख आणि विचार याची उपपत्ति केवळ मोशननें होत नाहीं. यासाठींच सांख्यांनीं पुरुष अथवा आत्मा निराळा मानला.

जड शरीर आणि अशरीर आत्मा या दोन कोटी मानल्यावर पुढची पायरी साहजिकच ईश्वराची येते. पण याच ठिकाणीं कित्येक तत्त्ववेत्ते थांबलेले आहेत. आपल्याइकडेहि सांख्यांनीं प्रकृति आणि पुरुष यांच्यापलीकडे तिसरी कोटि मानलेली नाहीं. कारण आत्म्याची जितकी प्रतीति आपल्यास येते तितकी ईश्वराची येत नाहीं. त्यांची व्याख्या भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें ‘पुरुष: सुखदु:खानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते’ अशी दिली आहे. याशिवाय इच्छा, द्वेष, चेतना व धृति हेहि आत्म्याचें आस्तित्व सिद्ध करतात. येथें असें कोणी म्हणेल कीं सुखदु:खादि गोष्टी अनुभवास येतात यांचें कारण जडसृष्टीचा हा एक स्वभाव आहे. पण तसें म्हणतां येणार नाहीं. कारण जगांतील अचेतन वस्तूंस, दगडांस किंवा वायूस किंवा पाण्यास सुखदु:ख किंवा इच्छाद्वेष नसतात हें आपण पहातों. तेव्हां जडाहून भिन्न अदृश्य स्वरूपाचा, पण अशा रितीनें अनुभवास येणारा जीव देहांत आहे असें आपणांस तर्कानें मानावें लागतें. कदाचित् कोणी आणखी असा आक्षेप घेईल कीं, प्राण्यांच्या शरीरांत असणारे पृथ्वी, जल व वायुरूपी जे अंश असतात त्यांच्या संघातांत हा सुखदु:खानुभवाचा गुण उत्पन्न होतो; तर या आक्षेपाचें उत्तर असें आहे कीं, सर्व प्राण्यांत सारखाच जडाचा समवाय झाला असल्यानें सर्व प्राण्यांना सुखदु:खाचा अनुभव

एकाच तऱ्हेचा झाला पाहिजे, पण असें दिसत नाहीं. प्राणिमात्रांत भिन्न भिन्न योनींतच नव्हे तर भिन्न भिन्न व्यक्तींतहि हा अनुभव आहे. गाई व डुकराला विष्ठा आवडते तर मनुष्याला त्याची घृणा आहे. इच्छा आणि द्वेष यांचा तर भेद व्यक्तिव्यक्तींत भयंकर आहे. एकाची इच्छा एक, तर दुसऱ्याची दुसरी. शरीरांतील जड परमाणु एक असून हा भेद कां ? अर्थात् प्रतिशरीरांत सुखदु:ख—इच्छाद्वेष—भेदाचा कारण जीव मानावा लागतो.

पण सांख्य याप्रमाणें शरीर आणि जीव, प्रकृति आणि पुरुष, अचेतन आणि चेतन अशा दोन कोटि मानून तेथेंच थांबले, ही त्यांची चुकी झाली असें थोडासा जास्त विचार केला असतां आपल्या निदर्शनास येतें. जीवात्मा किंवा पुरुष अमर मानला तरी ज्या शरीरांत तो असतो त्या एकाच शरीरास तो हलवूं शकतो. जगताच्या घडामोडीस कारण कोण हें पुरुष मानल्यानें उलगडत नाहीं. सूर्य प्रत्यहीं उगवतो, आकाशांतील नक्षत्रें, चंद्र, ग्रह वगैरे सारखे फिरतात, या प्रकारची सतत चालणारी गति ही कोणीं दिली आणि याचें नियंत्रण कोण करतो, किंबहुना शरीरस्थ जीवालाहि कोण चालवितो हा प्रश्न बुद्धीपुढें उभा राहातो. अर्थात् प्रकृतिपुरुषाहूनहि तिसरी कोटि मानली पाहिजे. भगवद्गीतेनेंहि सांख्यांचे प्रकृति पुरुष मानून याच कारणासाठीं तिसरा पुरुषोत्तम मानला आहे. क्षर आणि अक्षर यांनाहि चालविणारा 'क्षर: सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ।' या क्षराक्षराच्या पलीकडचा आणि त्यांना चालविणारा "उत्तम: पुरुषस्त्वन्य: परमात्मेत्युदाहृत: । यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय **ईश्वर:**" याप्रमाणें ईश्वराचें अस्तित्व व त्याचें कार्य गीतेंत उपदेशिलें आहे. तीनही लोकांना धारण करणारा आणि चालविणारा असा हा ईश्वर पुरुषोत्तम आहे, आणि तो आत्म्याच्या पलीकडे असल्यामुळें परमात्मा आहे.

ईश्वराची कल्पना जीवाच्या कल्पनेबरोबरच किंबहुना त्यापूर्वींसुद्धां विचार करणाऱ्या मनुष्यास प्राप्त होते. कारण जगांतील सर्व हाल-चालींचा शास्ता जसा ईश्वर आपल्यास मानावा लागतो तसाच जगत् कोणीं निर्माण केलें हा प्रश्न मनुष्यास अगोदरच उत्पन्न होतो. ज्या-प्रमाणें कोणतीहि रथादि वस्तु आपण उत्पन्न करतों त्याप्रमाणें या सृष्टीस कोणींतरी उत्पन्न केलें असलें पाहिजे. याच दृष्टीनें ईश्वराची कल्पना आपल्यासमोर ऋग्वेदादि ग्रंथांतून मांडली आहे; आणि सर्व धर्मांतहि असेच ईश्वराचें वर्णन प्रथम केलेलें आढळतें. येथें नास्तिक उभा राहून असें म्हणेल, 'प्रत्येक वस्तूला कोणीतरी कर्ता पाहिजे. तेव्हां ईश्वराला पुनः कर्ता कोण हा प्रश्न आलाच.' "सर्व जगताला कोणीतरी चालविणारा पाहिजे तेव्हां ईश्वराला चालविणारा कोण?" पण ह्याचें उत्तर असें आहे कीं हा प्रश्न कोठेंतरी थांबलाच पाहिजे. बृह-दारण्यकांत असा प्रश्न याज्ञवल्क्यास गार्गीनें केलाच आहे. तेव्हां याज्ञ-वल्क्यानें उत्तर दिलें, 'अनतिप्रश्न्यां वै देवतां पृच्छसि' 'या देवतेच्या पलीकडे पुनः दुसरा प्रश्न होऊं शकत नाहीं. तो तूं प्रश्न विचार-त्येस.' तेव्हां गार्गी स्तब्ध राहिली. अर्थात् हा प्रश्न कोठेंतरी थांबलाच पाहिजे. यावर प्रतिस्पर्धी म्हणेल, मग जडाहून निराळा जीव किंवा आत्मा व आत्म्याहून निराळा परमात्मा या तीन पायऱ्या न जातां जडा-पाशींच कां थांबत नाहीं? परमेश्वराला कोणी उत्पन्नकर्ता नाहीं किंवा शास्ता नाहीं, असें जर मानावयाचें तर जड जगतालाच कोणी कर्ता नाहीं व शास्ता नाहीं असे कां मानूं नये? सर्व जगत् स्वयंसिद्ध आहे, आणि त्याची गति स्वयंप्रेरित आहे, हा त्याचा स्वभाव आहे असें कां मानूं नये. किंबहुना 'नेचर' अथवा स्वभाव जगत् चालविणारा मान-णारे कित्येक तत्त्ववेत्ते आहेत (स्वभावमेके कवयो वदन्ति। कालं तथाऽन्ये-श्वेताश्वतर). सांख्य तत्त्ववेत्त्यांनींहि असेंच मानलें आहे. त्यांनीं

मानलेला पुरुष केवळ द्रष्टा आहे. प्रकृति अथवा जड सृष्टि आपल्या गुणांनींच चराचर जगत् निर्माण करते. सांख्यांचा सिद्धान्त सांगतांना 'मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचराम्' असें गीतेंतच म्हटलें आहे. प्रकृति अथवा प्रधान हें जगताचें कारण केवळ पुरुषसान्निध्यप्रेरित आहे, असें जसें सांख्य मानतात तसेंच अनेक पाश्चात्य तत्त्ववेत्ते व भौतिक शास्त्रवेत्ते मानतात.आणि त्यांच्या मतें येथें पुरुषकल्पनेचीहि जरुरी नाहीं. प्रकृति स्वभावप्रेरित होऊं शकते. परंतु विचारान्ती हा सिद्धान्त सिद्धीस जाऊं शकत नाहीं.

ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्याकरितां म्हणजे ईश्वराचें जगत्कर्तृत्व प्रस्थापित करण्यासाठीं जें मोठें महत्त्वाचें प्रमाण हिंदु तत्त्वज्ञानानें पुढें केलेलें आहे तें हें कीं जगताच्या रचनेमध्यें एका प्रकारचें चातुर्य भरलेलें आहे. याचा कोणी तरी बुद्धियुक्त कर्ता असला पाहिजे. त्याचप्रमाणें जगतांतील घडामोडी इतक्या व्यवस्थित आणि सूत्रबद्ध चाललेल्या आहेत कीं, त्या कोणीतरी अप्रमेय शक्तीच्या ईश्वराच्या शासनेंत असल्या पाहिजेत! उपनिषदांमध्यें जगताचें अव्याहत नियमबद्ध चलन कोणाच्या तरी भीतीनें चाललें आहे अशी एक उदात्त काव्यमय कल्पना केलेली आहे. 'भीषाऽस्माद्वातः पवने भीषोदेति सूर्यः । भीषा इंद्रश्चाग्निश्च मृत्युर्धावति पंचमः ॥' सूर्य नियमबद्ध रीतीनें उगवतो तोच कमी जास्ती होईल तर किती अनर्थ होईल ? रात्रीं नाटक पहावयास गेल्यामुळें सूर्य उशीरां उठला असें कधीं झालें नाहीं. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरतां फिरतां एक दिवस विश्रान्तीसाठीं उभी राहिली असेंहि कधीं झालेलें नाहीं. हे गोल आपआपल्या नियमबद्धगतीनें सारखे फिरत आहेत. तेच जर नियम सोडून कमीजास्ती रीतीनें चालतील तर किती घोटाळा होईल ? ईश्वराच्या या शासनाचें काव्यमय वर्णन करतांना बृहदारण्यकोपनिषदांत 'एष सेतुर्विधरणः

एषां लोकानामसंभेदाय ' असें वर्णन केलें आहे. ' परमात्मारूपी महान् सेतु या सर्व लोकांना त्यांचा गोंधळ व नाश होऊं नये म्हणून धरून ठेवीत आहे. ' तात्पर्य, या सृष्टीच्या घडामोडीला कोणीतरी शास्ता असला पाहिजे असें बुद्धीस पटतें, त्याचप्रमाणें सृष्टींतलें रचनाचातुर्य पाहून केवळ जडस्वभाव प्रकृति हें उत्पन्न करीत आहे असें मानतां यावयाचें नाहीं. निरनिराळ्या झाडांचीं निरनिराळीं सुंदर फुलें, त्यांतील रंग, व त्या रंगांची विलक्षण मांडणी पाहून कौतुक वाटतें. मानवी शरीरांत चालणाऱ्या अंतस्थ क्रिया व निरनिराळ्या नाड्या व ज्ञानतंतु, आणि इच्छेनें चालणाऱ्या व इच्छाविरहित चालणाऱ्या क्रिया पाहिल्या म्हणजे आश्चर्यानें मनुष्य थक्क होतो. तात्पर्य, सृष्टिरचनेंत जें चातुर्य दिसतें तें ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करतें. जड प्रकृतीला तें साध्य होणार नाहीं, असा हिंदुधर्माचा सिद्धान्त आहे. सांख्यांचें प्रधान खोडून काढतांना ' रचनानुपपत्तेश्च नानुमानम् ' असें सूत्र बादरायणानें घातलें आहे. ' सांख्य ज्याचें अनुमान करतात तें प्रधान ही सृष्टीची सुंदर विविध रचना करूं शकणार नाहीं. यामुळेंच परमात्म्याची सिद्धि होते. '

पाश्चात्य धार्मिक ग्रंथांत किंबहुना अनेक तत्त्वज्ञान्यांच्या ग्रंथांतहि ईश्वराच्या अस्तित्वाचें प्रमाण रचनानुपपत्ति हेंच मुख्यत: दिलेलें आहे. ' डिझाइन ' ( design ) अथवा बुद्धियुक्त रचनाचातुर्य जगतांत सर्वत्र दृष्टीस पडतें, हें महत्त्वाचें प्रमाण ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल पाश्चात्य विद्वानांनीं दिलेलें आहे. येथें जगतांतील सर्व बुद्धिवानांचा युक्तिवाद एकच प्रकारचा कसा असतो हें आपल्यास पहावयास सांपडतें. ईश्वर आहे ही कल्पना या रीतीनें तर्कानें सर्वांसच प्राप्त होते आणि त्याच्या ठिकाणीं जगताचें कर्तृत्व आणि जगताचें शास्तृत्व आपल्यास मानावें लागतें. अर्थात् जगताचें संहारकर्तृत्वहि ईश्वराकडे साहजिक येतें.

जशी वस्तु ईश्वरानें उत्पन्न केली तशीच ती नष्ट होण्यास तोच कारण असला पाहिजे. सर्व जर सृष्टि नाशवंत आहे ही गोष्ट अनुमानानें व प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध आहे, आणि ती जर परमेश्वरानें उत्पन्न केलेली आहे असें जर आपण मानलें तर तिचा नाशहि परमेश्वराच्याच इच्छेवर आहे हें साहजिकच प्राप्त होतें. तेव्हां उत्पत्ति, स्थिति आणि लय या तीनहि गोष्टी परमेश्वराच्या आधीन आहेत आणि ईश्वराच्या कल्पनेंत या तीन्ही गोष्टींचा मुख्यत: अंतर्भाव होतो. औपनिषदिक भाषेंत 'सर्व' जग 'तज्जलान्'–तज्जं, तल्लं, तदनं,–असें आहे. म्हणजे त्यापासून उत्पन्न झालेलें, त्यांतच लय पावणारें आणि त्यानेंच चालणारें आहे.

असो तर, याप्रमाणें ईश्वराचें अस्तित्व जगतांतील रचनाचातुर्यानें आणि जगताच्या नियमबद्ध अविच्छिन्न घडामोडीनें सिद्ध होतें आणि तसें तें हिंदु धर्मांत मानलेलें आहे. पण हें अस्तित्व तर्कनिष्ठ आहे असें अनुमानानें सिद्ध होऊं शकत नाहीं; प्रत्यक्षप्रमाणानें तर नाहींच नाहीं, असें प्रतिपक्षी म्हणूं शकतो. 'अग्निरनुष्ण:' असें म्हणणाऱ्याला 'अग्निरुष्ण:' असें सिद्ध करण्यास जसा प्रत्यक्ष अग्निस्पर्श याचीच जरुरी आहे, त्याप्रमाणें ईश्वर आहे, असें सिद्ध करण्यास ईश्वराचा अनुभव व्हावयास पाहिजे. तसा तो अनुभव होतो कीं नाहीं हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. ईश्वराचा अनुभव येतो अशी हिंदुधर्मांत समजूत आहे. आणि ती कशी योग्य आहे हें पुढील लेखांत पाहूं.

## ब्रह्मानुभव

सृष्टींतील रचनाचातुर्य आणि नियमबद्ध घडामोड यांवरून ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होतें असें मागील प्रकरणांत सांगितलें आहे. तरीसुद्धां आक्षेपकांचें समाधान होत नसल्यानें या विषयांत कांहीं प्रत्यक्ष प्रमाण

आहे कीं नाहीं असा प्रश्न उपस्थित होतो. कारण यत्र यत्र रचनाचातुर्य तत्र तत्र कर्ता अशी व्याप्ति जरी मांडली किंवा यत्र यत्र सुव्यवस्था तत्र तत्र बुद्धिमान् शास्ता, अशी व्याति मांडली तरी आक्षेपक असें म्हणूं शकेल कीं, सृष्टींत सर्वत्र रचनाचातुर्य किंवा सुव्यवस्था दिसत नाहीं. कांहीं वस्तु अत्यंत हिडिस स्वरूपाच्या असतात. सृष्टीच्या कांहीं व्यापारांत अत्यंत अव्यवस्था असते. सिंधमध्यें एका दिवसांत २५ इंच पाऊस पडून कित्येक गांवें वाहून जातात व शेंकडों माणसें मरतात तर त्याच वेळीं महाराष्ट्रांत दोन महिन्यांत एक इंच सुद्धां पाऊस पडत नाहीं. तेव्हां सृष्टींतील सुव्यवस्थाच आक्षेपार्ह आहे. अशा स्थितींत अनुमानप्रमाण लंगडें पडतें. तेव्हां ‘ अग्निरुष्ण: ’ असें प्रत्यक्ष प्रमाण या विषयांत आहे कीं नाहीं आणि ईश्वर असेल तर तो आपणांस कां दिसू नये ? अशी पृच्छा सुविचारी मनुष्याच्याहि मनांत उभी रहाते. अमेरिका आहे असें सिद्ध होण्यास आनुमानिक पुराव्यापेक्षा अमेरिका प्रत्यक्ष जाऊन पहाणें हें जसें शक्य आहे, तसें ईश्वराचें अस्तित्व अनुमानावर न सोडतां अनुभवरूपी प्रत्यक्ष प्रमाण येथें आहे कीं नाहीं ?

भगवद्गीतेंत श्रीकृष्णानें अर्जुनास अनेक रीतीनें ईश्वराचें वर्णन करून सांगितलें तरीसुद्धां त्याच्या पोटांत हीच शंका राहिली आणि त्यानें हाच प्रश्न केला. ‘त्वया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ’ इत्यादि तूं म्हणतोस तें खरें पण श्रीकृष्णा तुझें ईश्वरी स्वरूप मला पहावयास मिळेल कीं नाहीं हा प्रश्न त्यानें केला. श्रीकृष्णानें मिळेल असें सांगून त्यास आपलें विश्वरूप दाखविलें. तेव्हां ईश्वराचा अनुभव येतो, असाच हिंदूधर्माचा सिद्धान्त आहे. वेदांती लोक यालाच ब्रह्मानुभव म्हणतात. पूर्वऋषींनीं ब्रह्माचा अनुभव घेतला असें जसें उपनिषदांतून वर्णन आहे, तसेंच अलीकडे ज्ञानेश्वरादि संतांच्याहि प्रत्यक्ष अनुभवाच्या

गोष्टी आपल्यास माहित आहेत. तुळशीदास व रामदास यांस श्रीरामाचें दर्शन झालें, तुकाराम व नामदेव यांस श्रीविठ्ठलाचें दर्शन झालें, एकनाथ व त्यांचे गुरू जनार्दनस्वामी यांस दत्तदर्शन झालें अशा दंतकथा प्रचलित आहेत त्या खोट्या नसाव्या. हा साक्षि-पुरावा खोटा मानावयाचें कारण नाहीं. कारण ज्या मार्गानें त्या संतांस अनुभव आला त्या मार्गानें आपणांसहि येऊं शकेल. आपल्या इष्टदेवतेचा किंवा ब्रह्माचा निदिध्यास घेतला असता अनुभव येईल असें सिद्ध आहे. दुसऱ्याच्या साक्षिपुराव्यानें अमेरिकेची सिद्धि झाली तरी ज्यास प्रत्यक्ष अमेरिका पहावयाची असेल त्यानें त्याच उद्योगाला लागून बोटींत बसलें पाहिजे; आणि समुद्राच्या पैलपार गेलें पाहिजे. असें केलें असतां अमेरिका दिसेल यांत शंका नाहीं. श्रीमच्छंकराचार्यहि अशीच प्रतिज्ञा करतात. परमेश्वराचें यथार्थ ज्ञान होऊन अज्ञान नष्ट झालें म्हणजे प्रपंचाचा शम होऊन ब्रह्मानुभव होतो आणि मग मोक्ष प्राप्त होतो. आणि (तज्ज्ञानान्निखिलप्रपंचनिलयात् ब्रह्मानुभावात्परं । निर्वाणं जनिमुक्तमभ्युपगतं मानं श्रुतेर्मस्तकम् ॥). आतां हें खरें कीं अनन्य-भक्तीनें किंवा सतत निदिध्यासानें ब्रह्मानुभव येणें फार कठिण आहे, अमेरिकेस जाण्यासारखें सोपें नाहीं. पण कठिण असलें तरी शक्य आहे यांत मात्र शंका नाहीं हें मीं निश्चयानें सांगूं शकतों.

येथें आक्षेपक असा प्रश्न करील कीं ईश्वरानुभवाचा सिद्धान्त जसा हिंदु धर्मांत मानला आहे तसा इतर धर्मांतहि मानलेला आहे. आणि महंमदालाहि ईश्वरदर्शन झालें व येशू ख्रिस्ताच्या ईश्वरपुत्रत्वाची प्रत्यक्ष अनुभूति त्याचा शिष्य पीटर यास झाली असें कुराणांत आणि बायबलांत वर्णन आहे. तेव्हां तुकाराम, रामदास यांना जें दर्शन झालें हेंहि खरें आणि महंमद व पीटर यांस दर्शन झाले तेंहि खरें हें कसें संभवेल ? मुसलमानी धर्माच्या दृष्टीनें व ख्रिस्ती धर्माच्या दृष्टीनेंहि हिंदु

धर्मांतील देव हा खरोखर ईश्वर नसून तो सैतान आहे. तेव्हां कोणतीतरी एक गोष्ट खोटी असली पाहिजे. परंतु हिंदुधर्माची कल्पना अशी नाहीं. हिंदुधर्म असें मानतो कीं इतर धर्माप्रमाणें ईश्वराचें भजन केलें असतांहि ईश्वरप्राप्ति होते. भगवद्गीतेचा उदात्त सिद्धान्त असा आहे कीं 'यो यो यां यां तनुं भक्त्या श्रद्धयाऽर्चितुमिच्छति । तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्.' ज्या ईश्वरविभूतीचें भक्तीनें चिंतन जो करतो त्या विभूतिरूपानें मी त्यास प्राप्त होतो असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे. आणि ही गोष्ट विचारासहि पटण्यासारखी आहे. ईश्वराचें स्वरूप अमुकच आहे असें निश्चयानें आपल्यास म्हणतां येणार नाहीं. वेदान्त-तत्त्वज्ञानाप्रमाणें ईश्वर सर्व जगतामध्यें सारखाच भरलेला असल्याकारणानें ज्या ज्या स्वरूपानें तुम्हीं ईश्वराची भक्ति कराल त्या त्या स्वरूपाची भक्ति ईश्वरालाच पोंचून त्या स्वरूपाचा अनुभव तुम्हांस येईल. महंमद किंवा पीटर यांस झालेलें ईश्वराचें दर्शन हिंदुधर्म खोटें मानीत नाहीं. याविषयीं विशेष विस्तारानें पुढें सांगतां येईल. पण येथें आपणांस या ख्रिस्ती धर्माच्या दृष्टान्तानें आपल्याच संतांविषयीं जी शंका उपस्थित होऊं शकते· तिचा निरास करतां येतो. तुळशीदासास रामदर्शन झालें, तुकारामास विठ्ठलदर्शन झालें, आणि एकनाथास दत्ताचें दर्शन झालें तेव्हां ईश्वराचें हें भिन्न भिन्न स्वरूप कसें ही शंका उत्थित होते. त्याचेंहि उत्तर वरील श्लोकांतच आहे. 'यो यां तनुं भक्तः' या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ज्या ज्या स्वरूपानें तुम्ही ईश्वराची भक्ति कराल आणि अव्यभिचारी योगानें त्याचा निदिध्यास कराल त्या त्या स्वरूपानें तुम्हांस ईश्वराचें दर्शन होईल, हा सिद्धान्त विचारास पटण्यासारखा आहे. याशिवाय राम, विठ्ठल, दत्त, गणपति ही एकाच परमेश्वराचीं भिन्न रूपें आहेत अनेक देव नाहींत असेंच हिंदु धर्म मानतो हें पुढें येईलच. आणि या प्रत्येक

देवासंबंधें ' त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ' अशीच हिंदुधर्माची भावना आहे.

यावरहि कित्येक असा आक्षेप घेऊं शकतील कीं हा अनुभव खरा नसून ज्यास इंग्रजींत हेल्यूसिनेशन ( hallucination ) म्हणतात, तशा प्रकारचा हा अनुभव आहे. अर्जुनास सुद्धां प्रत्यक्ष डोळ्यांनीं ईश्वराचा अनुभव आला नाहीं. त्यास दिव्यचक्षु द्यावे लागले. अर्थात् हेंहि एक प्रकारचें हेल्यूसिनेशन होतें. एखाद्या गोष्टीचा किंवा स्वरूपाचा तुम्ही जर सतत निदिध्यास कराल तर तें स्वरूप तुम्हांस डोळे मिटल्यानंतर तुमच्या अंतश्चक्षूंपुढें तर उभें राहूं लागेलच, पण तुमच्या जागृत अवस्थेंत सुद्धां तुमच्या प्रत्यक्ष चर्मचक्षूंपुढें आहे, असा तुम्हांस भास होईल. यासच हेल्यूसिनेशन म्हणतात. अशा प्रकारचें हेल्यूसिनेशनच वरील सर्व अनुभवांत कां मानूं नये ? असा प्रश्न आक्षेपकास करतां येईल.

हा प्रश्न कठिण आहे हें खरें आणि कांहीं ठिकाणीं कांहीं मनुष्यांस अशा प्रकारचें हेल्यूसिनेशन होतें; पण वरील जितक्या लोकांस ब्रह्मानुभव झाला तितक्यांस तो भास अशा स्वरूपाचा नसून ज्यांत कांहीं प्रत्यक्ष अनुभव आहे अशा स्वरूपाचा झाला अशी त्यांची साक्ष आहे. कांहीं संभाषण, एखादा निरोप, कांहीं मंत्र श्रुतिगोचर झाले किंवा कांहीं प्रत्यक्ष वस्तु प्राप्त झाल्या असेंच त्यांचें सांगणें आहे. ही गोष्ट खरी कीं खोटी याचा निकष प्रत्येकास आपल्या अनुभवांत सांपडेल असें मला वाटतें. अशा प्रकारचें प्रत्यक्ष ईश्वराचें दर्शन होणारे साधुपुरुष लाखांत एखादे आणि शेंकडों वर्षांत सुद्धां पहावयास न मिळणारे हें खरें. कारण, इतकी निस्सीम भक्ति आणि असा सतत निदिध्यास फारच विरळा. पण प्रत्येक मनुष्यास जागृतावस्थेंत नाहीं पण स्वप्नांत आपल्या आत्म्याचें कांहीं तरी ईश्वराशीं संबंध असलेलें ज्ञान अनुभवास येतें ही गोष्ट निर्विवाद आहे. स्वप्नाचा विचार करणा-

ज्यांनीं असें लिहून ठेवलें आहे कीं, जें स्वप्न पहांटेच्या सुमारास प्रत्यक्ष आपल्यास विलक्षण रीतीचें, मनांत नसलेलें ( ध्यांनीं असें तें स्वप्नीं दिसे ) दिसतें तें व्यवहारांत लागलीच सिद्ध होतें. अशा प्रकारचें स्वप्न पुष्कळांस सांगतां येईल. असें स्वप्न बहुधा ज्या वेळेस मन शान्त ईश्वर-विषयक विचारानें भरलेलें, अथवा पुण्यग्रंथाचें वाचनानें निर्विकल्प होऊन मनुष्य झोपीं जातो तेव्हां पडतें. याचा अनुभव मला अनेक वेळा आला आहे. ज्यास्त न सांगतां माझ्या अनुभवाचें मी एक स्वप्न सांगतों. सितारामपंत दामले हे ज्या पहांटेस वारले त्या पहांटेस आणि त्याच वेळेस मला असें स्वप्न पडलें कीं, ‘ एक प्रेतयात्रा चालली आहे. तेव्हां त्याबरोबरच्या लोकांपैकीं एकानें मला सांगितलें कीं, ते गृहस्थ नुकतेच गेले. ’ याच वेळेस वासुदेवराव जोशी, चित्रशाळेचे मालक यांनीं मला बाहेरून हांक मारून म्हटलें, ‘ अहो उठा, सितारामपंत गेले ! ’ हें ऐकून मला खरोखरच आश्चर्य वाटलें. अशा प्रकारचीं स्वप्नें मला दोन तीन सांगतां येतील आणि कित्येक गृहस्थांस अशा प्रकारचा अनुभव आलेला असेल. स्वप्नांत जीवात्म्याला, होणारी गोष्ट कशी कळते हें एक मोठें गूढ आहे. तें कधीं कधीं कळतें यांत तर संशयच नाहीं. याचा निर्णय ईश्वराचें अस्तित्व मानल्याशिवाय आणि जीवात्म्यास परमात्म्याचा अंश मानल्याशिवाय लागावयाचा नाहीं. माझ्या दृष्टीनें हें एक प्रत्यक्ष प्रमाण आहे आणि एक क्षणभर का होईना, या स्वप्नानुभवांत ईश्वराची आपल्यास साक्ष पटणारी आहे. अर्थात् या प्रमाणाला ‘ अग्निरुष्णः ’ अशा स्वरूपाचा अनुभव हा प्रत्यक्ष पुरावा मानतां येतो.

---

# ईश्वराचें एकत्व.

वर सांगितलेंच आहे कीं, ईश्वराचें स्वरूप भिन्नभिन्न कल्पितां येतें. या उलट कित्येक धर्मांत ईश्वराला स्वरूपच नाहीं किंवा ईश्वराचें स्वरूप सांगतां येत नाहीं असा सिद्धान्त आहे. हिंदुधर्मानें ईश्वराचें स्वरूप कसें मानलें आहे याजविषयीं थोडेंसें विस्तारपूर्वक सांगितलें पाहिजे. ईश्वर एकच आहे, अनेक नाहींत, असा हिंदुधर्माचा परमसिद्धान्त आहे. आणि असें जर खरें, तर ईश्वराचें स्वरूप एकच असलें पाहिजे असें म्हणावें लागेल. हिंदुधर्मांत वेदांपासून अनेक देवांची कल्पना केलेली आहे. पौराणिक काळांत शिव, विष्णु, आदित्य, देवी, आणि गणपति या पांच देवतांची भक्ति सांगितली आहे हें प्रसिद्धच आहे. पण हे देव भिन्न नसून एकाच देवाच्या भिन्न स्वरूपाचे प्रकार आहेत ही गोष्ट हिंदुधर्मीय लोक नेहमीं विसरतात आणि त्यामुळेंच हिंदूधर्मावर अनेक देव मानल्याचा आक्षेप येतो. इतकेंच नव्हे तर या भिन्न देवतांचे उपासक एकमेकांची निंदा करतात, एकमेकांच्या देवांचीहि निंदा करतात आणि यामुळें हिंदुधर्मीयांना संघशक्तींत निर्बली करतात. या पांच मुख्य देवांशिवाय इतर अनेक देवहि अनेक पंथांचे लोक मानतात. यामुळें परधर्मी लोक हिंदुधर्माचा नेहमीं अधिक्षेप करतात. तेव्हां हिंदुधर्मीयांनीं हें तत्त्व नेहमीं समोर ठेवलें पाहिजे कीं, हिंदुधर्म, देव अर्थात् ईश्वर एकच आहे असें निश्चयानें मानतो.

वेदांमध्यें इंद्र, वरुण, इत्यादि भिन्न देवता मानल्या असल्या तरी हे सर्व देव एकाच ईश्वराचीं भिन्न स्वरूपें आहेत असें ऋषींनीं वेदांतच स्पष्टपणें सांगितलें आहे. ‘ एकं सद्विप्रा बहुधा आमनन्ति । इंद्रं यमं मातरिश्वानमाहुः’ ॥ शहाणे लोक एकच देव मानतात आणि

त्याला इंद्र, यम, वायु इत्यादि बहुविध नांवें देतात. बृहदारण्यकोपनिषदांत हाच सिद्धान्त एका मनोरंजक आख्यानांत सांगितला आहे. जनकाच्या दरबारांत तत्त्वज्ञानचर्चा चालली असतां एका ऋषीनें याज्ञवल्क्यास विचारलें, 'देव किती आहेत?' याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें, 'तेहतीस कोटि आहेत.' ऋषीनें पुन्हां विचारलें 'देव किती आहेत?' याज्ञवल्क्यानें 'तेहतीस आहेत' म्हणून सांगितलें. पुन्हां 'बारा आहेत' 'तीन आहेत' आणि शेवटीं 'एक आहे' असें याज्ञवल्क्यानें सांगितलें. ही भिन्न संख्या ऐकून ऋषीनें प्रश्न विचारला, 'मग तेहतीस कोटि सांगितलेंस तें खरें कीं खोटें?' याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें, 'हा ईश्वराचा महिमा आहे. ईश्वर जर जगतांत भरून राहिला आहे, तर तेहतीस कोटीच काय अनेक कोटि देव तुम्हांस सृष्टींत दिसतील.' भगवद्गीतेचाहि अशाच प्रकारचा सिद्धान्त आहे. विभूति अध्यायामध्यें आपल्या अनेक विभूति वर्णन करतांना श्रीकृष्णानें इंद्र, वरुण, व्यास, राम इत्यादि अनेक सांगितल्या. 'वृष्णीनां वासुदेवोऽस्मि' अशी वासुदेवाची विभूति सांगितली आणि शेवटीं असें सांगितलें कीं, "अथवा बहुतैनेन किं ज्ञातेन तवाऽर्जुन। विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत्" जगतांत चराचर वस्तूंत ईश्वर एका अंशानेंच भरलेला असून 'त्रिपादस्यादऽमृतं दिवि' असें त्यांचें अनंतत्त्व आहे. तेव्हां हिंदुधर्माचा महान् सिद्धान्त असा आहे कीं, ईश्वर एक असून तो सर्व सृष्टि व्यापून राहिलेला आहे. ज्या ज्या ठिकाणीं विभूतित्व दिसेल त्या त्या ठिकाणीं तुम्हांस ईश्वरत्वाच जास्त अनुभव येतो एवढेंच.

ईश्वर एक असून त्याचीं निरनिराळीं स्वरूपें कशीं कल्पितां येतात हें याप्रमाणें दाखविलें. पण मनुष्य बहुधा Anthropomorphist असतो व या दृष्टीनें ईश्वरास मनुष्याचें स्वरूप देत असतो. ज्यू धर्मा-

मध्यें ईश्वर एक आहे, हा जोराचा सिद्धान्त प्रथम प्रतिपादन केला गेला असें म्हणतात; पण त्याच्या अगोदर वैदिक ऋषींनींहि हाच सिद्धान्त प्रतिपादिला. दोन्ही धर्मांमध्यें फरक इतकाच कीं ज्यू लोक आणि तदनुसारी ख्रिस्ती व मुसलमान लोक ईश्वरास कोणतेंच स्वरूप देत नाहींत व त्यास निराकार मानतात. पण आपल्या धर्मांत हा प्रश्न पूर्वी उपस्थित झाला तेव्हां वैदिक आचार्यांमध्यें याविषयीं भिन्न मतें पडलीं. यास्काच्या निरुक्तांत या प्रश्नाचा निर्गम असा केला आहे कीं, इंद्रादि देवतांचीं दोन्ही स्वरूपें आहेत; म्हणजे त्यांस मुळींच रूप नाहीं हेंहि खरें आणि मानवी रूप आहे हेंहि खरें. असो, असा सिद्धान्त निश्चयानें हिंदुधर्मांत मान्य करतां येईल कीं परब्रह्मस्वरूपानें ईश्वरास कोणतेंच रूप नाहीं. परंतु निरनिराळ्या स्वरूपानें ईश्वराची भक्ति करणें शक्य आहे, इतकेंच नव्हे तर तें फलदायीहि आहे. 'ज्या ज्या स्वरूपानें तुम्ही ईश्वराची भक्ति कराल त्या त्या स्वरूपानें तो तुम्हांस पावेल' या प्रकारचें भगवद्गीतेचें वचन पूर्वी दिलेंच आहे. पण त्याच्या-पुढें असें सांगितलेंच आहे कीं, 'देवान् देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि' कांहीं स्वरूपानें ईश्वराची भक्ति करण्यापासून जें फळ प्राप्त होईल त्यापेक्षां परब्रह्मस्वरूपानें ईश्वराची भक्ति करणारा व निदिध्या-सानें ब्रह्मस्वरूप होणारा ब्रह्मांतच विलीन होतो, 'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति' असा उपनिषदाचा प्रत्ययसिद्ध सिद्धान्त आहे.

मूर्तिपूजेविषयीं मी निराळ्या प्रकरणामधें विवेचन करणार आहे पण येथें हें सांगितलें पाहिजे कीं कोणत्याहि स्वरूपामध्यें तुम्ही ईश्वराची भक्ति करीत असतांना ही भावना जागृत ठेवा कीं, हें परब्रह्म ईश्वराचेंच स्वरूप आहे. 'त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि'. अशा रीतीनें ब्रह्माची उपासना त्या प्रत्यक्ष देवाची केल्यापासून तुम्हांस उत्तम फळ मिळेल. तसेंच तुम्हांस भिन्न स्वरू-पाचा द्वेष किंवा हेवा करतां कामा नये. कारण वर सांगितल्याप्रमाणें

ईश्वराची सेवा कोणत्याहि स्वरूपांत करतां येते. मुसलमानी धर्माप्रमाणें ईश्वर-स्वरूपाची सेवा करणारे लोकहि सिद्धि पावतील, असा हिंदु-धर्माचा महान् सिद्धान्त आहे. येथें कदाचित् कोणी असा प्रश्न करील कीं मग परधर्मांत गेलेल्यास परत घेण्याची खटपट कां करतां ? यासंबंधानें स्वतंत्र विस्तृत विवेचन करावयास पाहिजे, परंतु येथें एवढेंच सांगणें पुरें आहे कीं, मुसलमानी किंवा ख्रिस्ती धर्मांत गेलेला मनुष्य त्या धर्मांत मानलेला देव खरा, इतर धर्मांत मानलेला देव खोटा अशा विरोधी भावनेनें देवाची भक्ति करतो. हें त्याच्या ईशभक्तींतील वैगुण्य आहे. हिंदुधर्माची व्यापकदृष्टि आर्यधर्मांत जन्मलेल्या मनुष्यास असणें अवश्य आहे आणि याचसाठीं परधर्मांत गेलेला हिंदु पुनः हिंदु धर्मांत परत घेण्याची व आणण्याची खटपट न्याय्य आहे.

हिंदुधर्माच्या परम सिद्धान्तापैकीं ईश्वर एक आहे आणि तो चराचर सृष्टि व्यापून आहे हा सिद्धान्त होय. या सिद्धान्ताला कांहीं अपवादक मतें आहेत हें येथें सांगितलें पाहिजे. द्वैतमतामध्यें ईश्वर आणि सृष्टि हीं भिन्न असून ईश्वराचें स्वरूप कांहीं निश्चित प्रकारचें आहे. वैष्णव सिद्धान्तामध्यें महाविष्णूस ईश्वर मानलेलें असून त्याचें स्वरूप चतुर्भुज शंखचक्रगदापद्मधारी इत्यादि प्रकारचें मानलें आहे. आणि तोच सर्व सृष्टीचा उत्पत्तिकर्ता, शास्ता आणि संहर्ता आहे. पण याहि सिद्धान्तांत ईश्वराचें स्वरूप भिन्नभिन्न प्रकारचें मानल्यास बाध आहे असें दिसत नाहीं. आणि अद्वैतमतानें अशा स्वरूपांत ईश्वराची भक्ति केली तरीहि फलद्रूप होणारी आहे, यांत शंकाच नाहीं. तेव्हां द्वैत आणि अद्वैत या कठिण प्रश्नाचा निर्णय जरी झाला नाहीं तरी ईश्वराचें स्वरूप कोणत्याहि प्रकारचें मानलें तरी चालेल असेंच ठरतें. याशिवाय ज्या इतर स्वरूपानें अनेक लोक ईश्वराची भक्ति करतात तीं स्वरूपें अद्वैत-मतानें ईश्वराचींच होत हें सिद्ध आहे. या भक्तींत उणीव इतकीच असते

कीं आम्ही एका ईश्वराचीच भक्ति करतों ही भावना भजकाच्या अंतः-करणांत जागृत नसते, तशी ती जागृत ठेवणें हें हिंदुधर्मीयांचें महत्त्वाचें कर्तव्य आहे. गणपति, विष्णु, शिव, देवी, हनुमान किंबहुना म्हसोबा यांची पूजा करतांना किंवा भक्ति करतांना ईश्वर एकमेवाद्वितीय असून त्याचेंच हें एक प्रत्यक्ष रूप आहे अशी भावना पूजकानें नेहमीं ठेविली पाहिजे. असें केलें तरच पूजा फलद्रूप होईल इतकेंच नव्हे, तर हिंदुधर्मीयांत एकीभाव आणि प्रेम उत्पन्न होईल.

---

## २ जगाची उत्पत्ति.

ख्रिस्ती धर्मोपदेशकांस विचारलेल्या प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न ईश्वर आहे कीं नाहीं याचें उत्तर आहे असें दिल्यावर ईश्वरानें सृष्टि निर्माण केली आणि सृष्टि हीच त्याचें प्रमाण व दृश्यकार्य ठरलें. तेव्हां दुसरा प्रश्न बायबलांत सांगितल्याप्रमाणें जगाची उत्पत्ति झाली काय ? असा सहज येतो. त्यावर नाहीं असें उत्तर शेंकडा ७० लोकांचें आलें. अर्थात् हल्लींच्या भौतिक शास्त्रांच्या प्रगतीमुळें बायबलांत वर्णन केलेली जगदुत्पति बहुतेक ख्रिस्त्यांस अमान्य करावी लागली. बायबलांत असें वर्णन आहे कीं, प्रारंभीं अव्याकृत ( chaos ) वस्तु तमोमय होते. ईश्वरानें त्यावर स्तिमित राहून (brood over it) जगाची उत्पत्ति केली. 'God said let there be light and there was light' अशा रीतीनें सहा दिवसांत सृष्टीची उत्पत्ति करून सातव्या दिवशीं ईश्वरानें विश्रांति घेतली. हें वर्णन त्या वेळच्या ज्ञानास्थितीस आणि कल्पनेस अनुलक्षून आहे असें स्पष्ट दिसतें. अर्थात् तें अक्षरशः खरें घ्यावयाचें नाहीं असें जें ख्रिस्ती धर्मोपदेशक म्हणतात तें योग्य आहे. पण प्रथम उजेड, नंतर पाणी, नंतर पृथ्वी, नंतर अनेक प्राणी आणि शेवटीं मनुष्य

ईश्वरानें उत्पन्न केला. या वर्णनांत थांबत थांबत आणि स्वतंत्र अशी जी उत्पत्ति सांगितली आहे तिला भौतिक शास्त्राचा उत्क्रान्ति-तत्त्वाचा पूर्ण विरोध आहे हें उघड आहे.

तत्त्वज्ञानदृष्ट्या जगदुत्पत्तींतील मूलभूत प्रश्नांचा विचार केला असतां प्रथम प्रश्न असा उपस्थित होतो कीं, ईश्वरानें सृष्टि निर्माण केली ती कशापासून? कोणतीहि वस्तु निर्माण झाली असतां आपल्या इकडील न्यायशास्त्रीय भाषेंत बोलावयाचें म्हणजे त्याचें उपादान-कारण कोणतें आणि निमित्त-कारण कोणतें? सुतारानें पेटी निर्माण केली यांत पेटीचें निमित्त-कारण सुतार आणि उपादान-कारण लांकूड. ईश्वराचें सृष्टि-कर्तृत्व विचारांत घेऊं लागलें म्हणजे हाच प्रश्न उपस्थित होतो. किंबहुना ईश्वराचें अस्तित्वहि जगताला कांहीं निमित्त-कारण पाहिजे याच सिद्धान्तानें प्राप्त झालें आहे. जगताचें उपादान-कारण कोणतें हा प्रश्न प्राचीन काळापासून तत्त्ववेत्त्यांसमोर आहे व त्याचीं तीन प्रकारचीं उत्तरें तत्त्ववेत्त्यांनीं दिलीं आहेत. वर बायबलच्या वर्णनांत एक पूर्वीं अव्याकृत कांहीं तत्त्व होतें असें म्हटलेलें आहे. यालाच इंग्रजींत ' मॅटर ' असें म्हणतात, व सांख्यशास्त्रांत ' प्रकृति ' म्हणतात. पण chaos अथवा matter अथवा प्रकृति ईश्वराहून भिन्न आणि पूर्वींपासूनच असलेली असें मानलें, तर तत्त्वज्ञानामध्यें अशी अडचण उपस्थित होते कीं, ईश्वराच्या बरोबरीचें दुसरें एक तत्त्व अनादिसिद्ध मानावें लागतें. सांख्यांनीं हें स्पष्टपणें मानलें. ' प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ' असें भगवद्गीतेंत सांख्यांचें मत वर्णिलेलें आहे. पण हें हिंदुधर्माचें मत नव्हे. हिंदुधर्मांत गीतेंतच सांगितल्याप्रमाणें हे दोन्ही पुरुष आहेत; आणि दोन्हीहून निराळा एक उत्तम पुरुष आहे. ( "द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।" " उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।" ). तात्पर्य या मतांत

प्रकृति, मॅटर अथवा केऑस परमेश्वराच्या बरोबरीची एक निराळी वस्तु मानावी लागते. दुसरी शंका अशी एक उपस्थित होते कीं, या मॅटरनें ईश्वराची आज्ञा कां मानावी ? सांख्यांनीं याचें असें उत्तर दिलें कीं, पुरुषसान्निध्यानें आणि पुरुषाच्या पाहण्यानें प्रकृति विकार पावून चराचर सृष्टि निर्माण करते. गीतेंतहि सांख्यांच्या या सिद्धान्ताचें ' मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ' असें वर्णन केलेलें आहे. अलीकडच्या सांख्यांचा असा सिद्धान्त आहे कीं, त्रिगुणाची साम्यावस्था ज्या वेळेस असते त्या वेळेस प्रकृति अविकृत असते; परंतु त्रिगुणांच्या साम्यावस्थेंत थोडासा बदल झाला कीं, प्रकृति चराचर सृष्टि निर्माण करूं लागते. परंतु हें मत दुर्बल दिसतें; कारण त्रिगुणाची साम्यावस्था कशानें बिघडते हा प्रश्न बाकी राहतोच. अर्थात् पुरुषाचा जगदुत्पत्तीशीं कांहींएक संबंध नाहीं असेंच मानावें लागतें. आणि त्यामुळें ईश्वरानें सृष्टि निर्माण केली या सिद्धान्तास बाध येतो. जे लोक केवळ जडवादी आहेत त्यांना येथें कांहींच अडचण नाहीं. जगतांत केवळ मॅटर ( अणुरूपी जड वस्तु ) असून त्यांत नेहमीं मोशन ( हालचाल ) चालू आहे, अर्थात् उत्पत्ति आणि लय हा मॅटरचा स्वभावधर्म आहे असें ते मानतात.

ईश्वरानें सृष्टि उत्पन्न करतांना कांहीं अनादि उपादान-कारण घेतलें असें मानलें तर वरप्रमाणें आक्षेप उत्पन्न होतात. यासाठीं कित्येक तत्त्ववेत्ते असेंच मानतात कीं, ईश्वरानें शून्यापासून सृष्टि निर्माण केली. त्यास कोणत्याहि उपादान कारणाची जरुरी नाहीं. कित्येक धर्म हाच सिद्धान्त मानतात कीं, ईश्वरानें शून्यापासून सृष्टि निर्माण केली. ईश्वराच्या कल्पनेंतच जर अचिंत्य शक्ति ही अंतर्भूत होते, तर ईश्वरानें केवळ इच्छामात्रेंकरून सर्व सृष्टि निर्माण केली, असें म्हणण्यांत कोणतीहि अडचण येत नाहीं. बायबलांतील सृष्टीच्या

उत्पत्तीच्या वर्णनांत असाच भाव पुढें दृग्गोचर होतो. God said let there be light and there was light या म्हणण्यांत केवळ इच्छेनें ईश्वरानें तेज उत्पन्न केलें असेंच गृहीत होतें. अशाच प्रकारचा सिद्धान्त कित्येक इतर धर्मांतील तत्त्ववेत्त्यांचा आहे. परंतु साधारण दृष्टीला असें वाटतें कीं, जेथें कांहींच नाहीं तेथें कांहीं आहे असें कसें उत्पन्न होईल? छांदोग्योपनिषदांत म्हणलें आहे कीं, " पूर्वीं कांहींच नव्हतें असें नाहीं. पूर्वीं ' सत् ' होतें. कारण असतापासून सत् झालें असें म्हणतां यावयाचें नाहीं ("कथमसत: ०सज्जायेत–छां"). भगवद्गीतेंतहि ' नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत: ' म्हटलें आहे. असत् वस्तूचा सत् स्वरूपानें भाव होणें शक्य नाहीं हें विचारवंतास मान्य करावें लागतें. यामुळें ईश्वरानें शून्यापासून सृष्टि निर्माण केली या म्हणण्यांत अरुचि उत्पन्न होते. त्याचप्रमाणें दुसरा आक्षेप असा येतो कीं, इच्छामात्रें सृष्टि उत्पन्न झाली या म्हणण्यांत सृष्टीची क्रमोत्पत्ति अमान्य होते आणि सृष्टींत तर उत्पतीचा क्रम आपल्यास दिसतो. किंबहुना अलीकडच्या भौतिक शास्त्रांच्या प्रगतीनें evolution चा ( क्रमोत्पत्तीचा ) किंवा उत्क्रांतितत्त्वाचा सिद्धान्त निश्चयात्मक रीतीनें प्रस्थापित झाला आहे. ईश्वरानें तेज उत्पन्न केलें, उदक उत्पन्न केलें, पृथ्वी उत्पन्न केली, स्वर्गादिलोक उत्पन्न केले, अनेक प्राणी उत्पन्न केले, आणि शेवटीं दोन माणसें उत्पन्न केली, अशी इच्छामात्रानें निर्मिति संभाव्य दिसत नाहीं आणि तीहि निरनिराळी, शून्यापासूनच. या दोन कारणांनीं शून्यापासून जगदुत्पत्ति झाली हा सिद्धान्त मनुष्याच्या बुद्धीस पटत नाहीं.

हिंदुधर्मांतील सृष्टीच्या उत्पत्तिची कल्पना कशी आहे, हें सांगतांना प्रारंभीं विचारलेला प्रश्न एका मंत्रांत ऋषीनें प्रत्यक्ष केलेला आपल्यासमोर तत्काळ उभा रहातो. कोणत्याहि कार्यवस्तूस उपादान-

कारण लागतें. सुतारानें रथ बनविला, त्याकरतां त्यानें वनांतून लांकडें तोडून आपलीं हा दृष्टान्त घेऊन ऋषि प्रश्न करतो, 'किं स्विद् वनं क उ स वृक्ष आस यतो द्यावापृथिवी निष्टतक्षुः।' कोणत्या वनांतून कोणतीं झाडें तोडून आणून त्यापासून तासून, झोडून ईश्वरानें पृथ्वी आणि द्युलोक उत्पन्न केले? अर्थात् हा प्रश्न रूपकाच्या अलंकारानें तत्त्वज्ञानाच्या मुळाशीं जातो. उपनिषदांमध्यें 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' असें वर सांगितल्याप्रमाणें मानलें आहे. पण हें वन किंवा हें सत् पूर्वींच आहे असें मानलें तर तें ईश्वरानें निर्माण केलेलें नाहीं असें मानावें लागेल, आणि यांत वर सांगितल्याप्रमाणें दोष उत्पन्न होतील. उपनिषदांमध्यें या अडचणीचा परिहार फार उत्तम रीतीनें केला असून ईश्वरानें ही सृष्टि आपल्यापासूनच निर्माण केली असें मानलेलें आहे. जसा कोळी आपल्याच पोटांतून तंतु काढून त्याचें जाळें पसरतो, ('यथोर्णनाभिः' इ० मंत्र पाहा), त्याप्रमाणें परमेश्वरानें आपल्या शरीरांतून सृष्टि निर्माण केली असें मानलें आहे. अर्थात् सृष्टीचें निमित्त-कारण आणि उपादान-कारण एकच आहे असें उपनिषदांचें मत आहे. यासच वेदान्तांत अभिन्ननिमित्तोपादानकारण सिद्धान्त असें म्हणतात. वेदान्ततत्त्वज्ञानांत सर्व चराचरसृष्टींत परब्रह्म भरलेलें आहे असें मानलेलें असल्यानें ब्रह्मच जगदाकार-रूपानें परिणत होतें हें साहजिकच ठरूं शकतें. अशा रीतीनें जगताचें आणि ईश्वराचें एकत्व प्रस्थापित झाल्यानें या मतावर कोणत्याहि प्रकारचा आक्षेप घेतां येत नाहीं.

परमेश्वराच्या ठिकाणीं जगताचा केवळ आभास होतो असा श्रीमच्छंकराचार्यांचा मायावाद येथें विचाराकरितां पुढें येतो. पण हा वाद खरा किंवा प्रत्यक्ष सृष्टि निर्माण झाली आणि लय पावली हें खरें, या गोष्टीचा आपल्यास येथें विचार करण्याचें कारण नाहीं. सृष्टि

इंद्रियगोचर असून ती निर्माण झाली असें आपण ज्या वेळेस म्हणतों त्या वेळेस ती वस्तुतः झाली किंवा मायारूप झाली, वाटेल तें मानलें तरी ती झाली कशी हा प्रश्न महत्त्वाचा शिल्लक रहातोच. ' शुक्तौ रौप्यमिव ' हा शंकराचार्यांचा दृष्टांत घेतला तरी ईश्वररूप—शुक्तीच्या ठिकाणीं दुसरा कांहीं, रुप्याचा, भास झाला हें मानलेंच पाहिजे. तो भास कशामुळें झाला अर्थात् भासरूप किंवा प्रत्यक्ष सृष्टि कशापासून निर्माण झाली हा प्रश्न आपल्यासमोर राहतो. याचें उपादान-कारण रौप्य म्हणा वा कांहीं म्हणा भिन्न नसून ईश्वर हेंच आहे, असें हिंदु-धर्मांतील शांकर तत्त्वज्ञानाचें मत आहे. द्वैताचें भिन्न मत हिंदुधर्मांत मान्य आहे हें येथें सांगितलें पाहिजे. मध्व-रामानुज वगैरे द्वैतवादी सृष्टीचें उपादान-कारण ईश्वर नसून सांख्य मताप्रमाणें अनादि प्रकृति आहे असें मानतात. या वादांत खोल शिरण्याचें कारण नाहीं, कारण हा वाद सृष्ट्युत्पत्तीच्या केवळ उपादान-कारणाचा आहे. आणि ' जन्माद्यस्य यतः ' या सूत्रांत यतः या प्रयोगांत बादरायणानें मोठ्या खुबीनें हे दोन्ही पक्ष अंतर्भूत केले आहेत. ' अस्य जगतः जन्मादि जन्मस्थितिलयाः यतः ' तें ब्रह्म' ' ज्यापासून ' हे शब्दरूप निमित्तकारण आणि उपादानकारण या दोहोंनांहि लागू आहे त्यांत येन व यस्मात् या दोहोंचाहि अंतर्भाव होतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

असो, याप्रमाणें ईश्वरानें सृष्टि आपल्यापासूनच निर्माण केली हा हिंदुधर्माचा मुख्य सिद्धान्त किंवा प्रकृतीपासून ( सांख्य किंवा द्वैती ) केली हा दुसरा सिद्धान्त, कोणताहि घेतला तरी दोहोंत क्रमोत्पत्ति सारखीच मान्य आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. " आत्मनः आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरापः । अद्भ्यः पृथिवी । " वगैरे तैत्ति-रीय उपनिषद्वाक्यांत हा सिद्धान्त सांगितला असून तो सर्वांसच मान्य आहे. प्राचीन ऋषींनीं हजारो वर्षांपूर्वीं डार्विनचा Evolution अथवा

क्रमोत्पत्तिसिद्धान्त आपल्या बुद्धिमत्तेनें प्रतिपादिला, याचें आश्चर्य वाटतें. हा सिद्धान्त मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. निरनिराळ्या भूतांची उत्पत्ति निरनिराळ्या वेळीं स्वतंत्र रीतीनें शून्य अगर chaos पासून मानली तर अनेक अडचणी उपस्थित होतात. हल्लींच्या पाश्चात्य भौतिक शास्त्रानें आकाशांतील गोलांची किंबहुना पृथ्वीवरील भिन्न भिन्न वस्तूची क्रमोत्पत्ति अनेक प्रत्यक्ष सांपडलेल्या अवशेषांवरून सिद्ध केली आहे. तथापि प्रारंभींचे कांहीं तत्त्ववेत्ते भूतांची पृथगुत्पत्ति हिंदुस्थानांतहि मानीत होते. भगवद्गीतेंत नास्तिक मताचा उल्लेख करतांना भूतांना 'अपरस्परसंभूत' म्हटलें आहे; म्हणजे हे नास्तिक ईश्वरहि मानीन नव्हते व भूतें ( यांच्या मतें चारच होतीं, आकाश नव्हतें ) क्रमानें उत्पन्न झालीं असेंहि मानीत नव्हते. ग्रीक तत्त्ववेत्तेहि चारच भूतें अपरस्परसंभूत स्वतंत्र मानीत. चारांच्या ऐवजीं अलीकडचे रसायनशास्त्रज्ञ ६७ elements अथवा स्वतंत्र परमाणु मानीत. आम्ही शिकलों त्या वेळेस सोनें, रुपें, तांबें वगैरे धातूंचे स्वतंत्र परमाणु आहेत व ऑक्सिजन, हायड्रोजन वगैरे स्वतंत्र वायूंचे परमाणु आहेत असें शिकलों. आपल्याकडील न्यायशास्त्राचाहि असाच सिद्धान्त, 'पृथिव्यप्तेजोवाय्वाकाशकालदिगात्ममनांसि' असे ९ स्वतंत्र परमाणु असल्याचा सिद्धान्त प्रसिद्धच आहे. पण अलीकडील पाश्चात्य भौतिक शास्त्राच्या प्रगतींत हे स्वतंत्र atoms अगर परमाणु नाहींसे झाले आणि या मूलभूत भिन्न अणूंच्या ऐवजीं एकच नवीन परमाणु Electron प्रस्थापित झाला आहे; व याच्या कमीजास्त प्रमाणाप्रमाणें भिन्न भिन्न वस्तु बनतात असें सिद्ध झालें आहे. अर्थात् ईश्वरानें आपल्या आकाशमय शरीरांतून सर्व सृष्टि निर्माण केली, हाच सिद्धान्त हल्लीं मान्य झालेला दिसतो. एकच मूलभूत उपादान तत्त्व ब्रह्ममुळाशीं असून त्याचें प्रथम विकार पावलेलें स्वरूप आकाश हें आहे. त्यापासून म्हणजे electron पासून वायु, वायू-

पासून तेज इत्यादि उत्पत्ति झालेली आतां अलीकडच्या शास्त्रानें सिद्ध आहे. आकाशांत दिसणाऱ्या सहस्रावधि तेजोमय गोलांची उत्पत्ति nebular theory प्रमाणें ' आकाशाद्वायुः वायोरग्निः ' याच तऱ्हेनें सिद्ध होऊं लागली आहे. त्याचप्रमाणें सेंद्रिय व निरिंद्रिय सृष्टि (organic and inorganic) ही सुद्धां पृथ्वीपासून उत्पन्न झालेली आपल्या दृष्टीस पडते. निरिंद्रियापासून सेंद्रिय वगैरे क्रमाक्रमानें मनुष्यापर्यंत जगाची उत्पत्ति झालेली आहे, असें पाश्चात्य भौतिक शास्त्रानें सिद्ध केलेलें आहे. तेव्हां ज्या रीतीची जगाची उत्पत्ति हिंदुधर्म मानतो त्या रीतीला भौतिक शास्त्राच्या आजच्या प्रगतीनें बाध येत नाहीं.

अशा रीतीनें evolution अथवा क्रमोत्पत्तीच्या मार्गानें हल्लींच्या सृष्टीची उत्पत्ति होण्यास लाखों वर्षे लागतील ही गोष्ट साहजिकच प्राप्त होते. आणि लाखों वर्षांच्या अंतीं सृष्टीचा ऱ्हास किंवा नाश याच्या उलट क्रमानें होईल असेंहि evolution वादी मानतात. या दोन्ही कल्पना भगवद्गीतेंत एका सुंदर श्लोकांत मांडलेल्या आहेत. जगताची उत्पत्ति-स्थिति-प्रलयकाल एक कल्प आहे असें मानलें असून त्याची मर्यादा सहस्र युगाची मानली आहे; म्हणजे ४३ लक्ष २० हजार वर्षांचें एक युग अशा हजार युगांचें एक कल्प होतें. "सहस्र-युगपर्यंत महर्यद् ब्रह्मणो विदुः। रात्रिं युगसहस्रांन्तां तेऽहोरात्र-विदो जनाः" याप्रमाणें दिवस व रात्र असें रूपक करून दिवसाच्या प्रारंभीं जसें सर्व जग हळूहळू दिसूं लागतें त्याप्रमाणें मी हें जगत् कल्पाच्या आरंभीं हळूहळू निर्माण करतों असें भगवंतानें म्हटलें आहे. " अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंन्त्यहरागमे। रात्र्यागमे प्रलीयन्ते " या रूपकांत सृष्टीची हळूहळू आकाशाच्या अव्यक्त स्वरूपापासून व्यक्त स्वरूपांत उत्पत्ति व त्याचप्रमाणें रात्र पडतांना हळूहळू जसें सर्व जग काळोखांत नाहींसें होतें त्याप्रमाणें व्यक्त सृष्टीचा अव्यक्तांत हळूहळू

विलय होतो, असें सांगितलें आहे. या वर्णनावरून जगताची उत्पत्ति परमेश्वरापासून कशी होते आणि जगाचा लय शेवटीं ईश्वरांतच कसा होतो, या विषयींचा हिंदुधर्माचा सिद्धान्त स्पष्ट होतो आणि या सिद्धान्तास भौतिक शास्त्राची कितीहि प्रगति झाली तरी बाध येणार नाहीं असें निश्चित दिसतें.

सृष्टीमध्यें जीवनत्व असून जीवाच्या ठिकाणीं बुद्धिमत्ता आणि ज्ञानशक्ति अशी आपल्या दृष्टीस पडतात. तेव्हां सृष्टीच्या उत्पत्तीला केवळ जड कारण आहे, असें मानतां येणार नाहीं. कारण जडापासून जीव होणार नाहीं. यामुळें सांख्यांनीं जड आणि जीव असे दोन पदार्थ मानले. जीवाच्या ठिकाणीं चेतना, सुखदुःखाचा अनुभव आणि ज्ञानशक्ति हीं आहेत. वेदान्त-तत्त्वज्ञानांत या दोहोंहून पलीकडची कोटि ईश्वराची किंवा परमात्म्याची कां मानली हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां जड, जीव, आणि ईश्वर अशा तीन कोटि, हिंदुधर्माच्या उच्च तत्त्वज्ञानामध्यें मानल्या आहेत. द्वैततत्त्वज्ञानांत जीवात्मे व पञ्चमहाभूतात्मक प्रकृति ह्या दोन कोटि अनादि व स्वतंत्र मानल्या असून ईश्वर हा सर्वांचा शास्ता व अधिष्ठाता आहे असें मानलें आहे. इतर द्वैतवादी धर्माप्रमाणें तीन कोटींचा हा सिद्धान्त साहजिकच प्राप्त होतो. पण अद्वैतमतांत एकच ईश्वरतत्त्व आहे. 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः' या वचनानुरूप जीव हा परमेश्वराचाच अंश आहे. अर्थात् जगतांत दिसणारी ज्ञानशक्ति ही ईश्वराचीच अंशरूप शक्ति होय. तसेंच वरील अभिन्ननिमित्तोपादान सिद्धान्तानुरूप जड हें निराळें नसून ईश्वरस्वरूपच आहे, असें मानावें लागतें. आणि असें मानलें म्हणजे जड, जीव आणि परब्रह्म अशा तीन कोट्या न राहातां एकच कोटि म्हणजे परब्रह्माची शिल्लक रहाते. दिसणाऱ्या निरिंद्रियापासून सेंद्रिय सृष्टि कशी निर्माण झाली, हें याच सिद्धान्ता-

वरून चांगलें निदर्शनास येतें, इतकेंच नव्हे तर सर्व जड सृष्टि सुद्धां चित्स्वरूप आहे, हें अलीकडच्या भौतिक शास्त्राच्या प्रगतीनें ठरत चाललें आहे. प्रो. बोस यांनीं वृक्षांस जीव आहे व सुखदु:खानुभव आहे हें तर सिद्ध केलें आहेच, पण लोखंडास सुद्धां थकवा येतो असेंहि दाखविलें आहे. तेव्हां हिंदुधर्माच्या या परम सिद्धान्ताचें किती व्यापक स्वरूप आहे, हें वाचकाच्या लक्षांत येईल. याचा विस्तार आणखी एका पुढील प्रकरणांत आपणांस करावयाचा आहे. प्रारंभीं दिलेल्या ऋषिवाक्यांत जो प्रश्न आहे, त्याच मंत्राच्या उत्तरार्धांत आणखी एक प्रश्न असा गोंविला आहे कीं, त्यावरून ऋषींच्या मनांत जगदुत्पत्ति ईश्वरानें आपल्यापासूनच केली हाच सिद्धान्त होता असें दिसतें. ' कि स्विद्वनं क उ स वृक्ष आस यतो द्यावापृथिवी निष्टतक्षु:॥ मनीषिणो मनसा पृच्छतेदु तत् । यदध्यतिष्ठत् भुवनानि धारयन् (ऋ. १०, मं. ८५). रथ करण्याचा दृष्टान्त घेतला म्हणजे सुतार जमिनीवर उभें राहून झाड तोडतो आणि रथ बनवतो, त्याप्रमाणें ऋषि विचारतो, हे बुद्धिमान् मनुष्यांनो, तुम्ही आपल्या मनाशीं हा प्रश्न करा कीं, ज्या वेळेस ईश्वरानें हीं भुवनें बनवलीं त्या वेळेस तो कशावर उभा होता? अर्थात् या सर्व प्रश्नांचें उत्तर ब्रह्म हेंच आहे. यजुर्वेदामध्यें हाच ऋग्वेदांतील मंत्र घेऊन त्याचें उत्तर दुसऱ्या मंत्रांत स्पष्टपणें हेंच दिलें आहे. " ब्रह्म तद्वनं ब्रह्म स वृक्ष आस यतो द्यावापृथिवी निष्टतक्षु: । मनीषिणो मनसा तद्ब्रवीमि ब्रह्मैवाध्यतिष्ठत् भुवनानि धारयन् ". सर्व सृष्टि ब्रह्मानें भरलेली असून ईश्वरानें जगत् ब्रह्मापासूनच निर्माण केलें असा हिंदुधर्माचा महान् सिद्धान्त वैदिक काळापासून आहे आणि तो हल्लींच्या भौतिक शास्त्रांच्या प्रगतीनें अबाधित आहे.

---

## ३ सैतान आहे कीं नाहीं ?

ख्रिस्ती धर्मामध्यें सैतान निराळा मानलेला असून तो ईश्वराच्या angels पैकींच म्हणजे देवदूतांपैकींच मानलेला आहे. परंतु तो ईश्वराच्या विरुद्ध बंड केल्यानें स्वर्गांतून नरकांत पडला आहे, तो मनुष्यांस नेहमीं पापकर्मास प्रवृत्त करतो आणि ईश्वराची सत्ता झुगारून देण्यास त्यांस लावतो, असें त्याचें कार्य मानलेलें आहे. Adam and Eve या प्रथम मनुष्यांच्या जोडप्यास त्यानेंच स्वर्गीय उपवनांतून पृथ्वीच्या सुखदुख:मिश्रित लोकांत पाडलें व हें कार्य त्यानें ईव्हच्या मनांत परमेश्वरानें मना केलेलें ज्ञानवृक्षाचें फळ खाण्यास भरवून केलें, अशी बायबलांतील कथा आहे. मनुष्याचें मन पापाचरणाकडे जें वळतें तें सैतानाच्या प्रेरणेमुळें वळतें असें ख्रिस्ती मानतात. ईश्वर आहे असें मानल्यावर सैतान आहे कीं नाहीं हा प्रश्न आहे अशाच उत्तराकडे झुकतो. पण पाश्चात्य तत्त्वज्ञानी लोक सैतान नाहीं असें मानतात. अर्थात् पूर्वोक्त तिसऱ्या प्रश्नाच्या उत्तरांत शंभरापैकीं ८२ धर्मोपदेशकांनीं सैतान नाहीं असेंच उत्तर दिलें. या संबंधानें हिंदुधर्माची कल्पना काय आहे हें आपण या लेखांत पाहूं.

प्रथम सैतानाची कल्पना कशी व केव्हां उत्पन्न झाली याचा आपण ऐतिहासिक दृष्ट्या विचार करूं. सैतानाची मूळ कल्पना प्रथम पारशांच्या धर्मामध्यें आपणांस दिसते. ‘ ऐंग्र मैन्यु ’ अथवा ‘ अहरिमन् ’ अशी एक ईश्वराच्या विरोधी शक्ति पारशी धर्मामध्यें मानली आहे. ईश्वर म्हणजे अहुरमज्द; यानें चांगली सृष्टि निर्माण केली; आणि अहरिमन् हा त्या सृष्टीचा बिघाड करतो असें त्यांचें मत आहे. जगतांत चांगलें आणि वाईट, पाप आणि पुण्य, सुख आणि दुःख असे दोन प्रकार सारखे सतत झगडत असलेले आपल्या दृष्टीस पडतात. ईश्वर जर चांगला

आहे तर तो वाईट वस्तु, पाप आणि दुःख कां निर्माण करील ? चांगलें आणि वाईट, पाप आणि पुण्य, सद्वृत्ति आणि असद्वृति यांचे निर्माणकर्ते भिन्न असले पाहिजेत अशा कल्पनेनुरूप अहुरमज्द आणि अहरिमन् असे दोन अनादिसिद्ध पुरुष असून त्यांचा सतत झगडा या जगतांत चालू आहे, असें पारशी धर्मांत मानलें आहे. कल्पाच्या शेवटीं* अहुरमज्दाचा जय होईल आणि सर्वत्र 'अशाचें' अथवा सद्गुणाचें राज्य होईल असें पारशी धर्मांत मानिलें आहे. पारशी लोकांतील या कल्पनेच्या सारखी यहुदी धर्मांतील व तदनुयायी धर्मांतील सैतानाची कल्पना आहे. मात्र सैतान हा ईश्वरानेंच निर्माण केलेला आहे, अनादि नाहीं, असें त्यांत मानलेलें आहे.

निरनिराळ्या सद्गुणांचें आणि दुर्गुणांचें प्रवर्तक असे देवदूत (angels) व राक्षस (fiends) असून ते अहुरमज्दचें व अहरिमन्चें साहाय्य करतात आणि त्यांच्या आज्ञेंत वागतात अशीहि आणखी कल्पना या दोन्ही धर्मांत आहे. पारशी धर्मांत अहरिमन्चे अनुयायी व आज्ञाधारक म्हणजे राक्षस यांनाच देव म्हणतात. आणि याच्या उलट असुर याचा अर्थ देव पारशी धर्मांत ,आहे व या देवदूतांचीं नांवें सत्य, दया, औदार्य वगैरे आहेत. असुर व देव यांचे विरुद्ध अर्थ पारशी धर्मग्रंथांत व हिंदुधर्म ग्रंथांत असलेले पाहिले म्हणजे हे दोन्ही लोक प्रथम एकच होते व पुढें भांडून वेगळे होऊन एकमेकाचे शत्रु झाले हा इतिहास निष्पन्न होतो. अहुरमज्द शब्दांतील असुर आणि देव हे

---

* तात्त्विक विचार असा पुढें येतो कीं, ईश्वरास अहरिमन् यांस जिंकण्यास कल्पाएवढा काळ कां लागावा ? ईश्वराची कल्पना जर अनंत शक्तीची आहे तर त्यास अहरिमन् तास चिरडण्यास वेळ लागू नये. पण मनुष्य नायकाचा प्रतिनायकहि अचाट शक्तीचा मानतो. देवीनें जिंकलेले राक्षस किंवा रामानें जिंकलेला रावण अत्यंत प्रबळ मानलेला आहे.

आपल्या ग्रंथांत अत्यंत भांडणारे एकाच कश्यपाचे वंशज मानले आहेत. असुर म्हणजे चांगला असा अर्थ कांहीं ऋग्वेद-मंत्रांत आहे, पण हे मंत्र फार जुने असावे. भगवद्गीतेंत आसुर म्हणजे वाईट स्वभावाचा आणि दैव म्हणजे चांगला असा विभाग वर्णिलेला मूळचा द्विविध विभाग ब्राह्मण ग्रंथांतील होय. "द्वौ भूतसर्गौ लोकेस्मिन् दैव आसुर एव च". याच्या उलट पारशांत देव म्हणजे राक्षस आणि असुर म्हणजे देव असे अर्थ आहेत. हा द्विविध प्राचीन विभाग सांख्यांनीं त्रिविध सृष्टीचा विभाग सात्त्विक, राजस, तामस असा केला तो ज्यास्त सयुक्तिक वाटल्यानें तो भगवद्गीतेंत ज्यास्त विस्तारलेला आहे.

असो; सैतान हा राक्षसांचा ( म्हणजे देवांचा ) मुख्य असून तो ईश्वराचा आज्ञाभंग करून स्वर्गलोकांतून च्युत झाला आणि नरकांत येऊन तेथील राजा बनला. त्याला आर्चडीमॉन म्हणजे राक्षसश्रेष्ठ मानलेलें असून त्याच्या स्वर्गच्युतीची कथा अत्यंत काव्यमय अशी मिल्टनच्या 'पॅरेडाइज लॉस्ट' मध्यें वर्णन केलेली प्रसिद्धच आहे. It is better to rule in hell than serve in heaven हे सैतानाचें बाणेदार वाक्य प्रसिद्ध आहे. सैतान शब्दाचा अर्थ ज्यूइश भाषेंत शत्रु असा आहे. सैतानाची भूमिका लोकांत पुढें इतकी प्रिय झाली कीं, युरोपांत कित्येक वर्षे Satanist पंथ चालू होता व तो ईश्वराची उपासना न करतां सैतानाचीच करी. सैतानाचा मनुष्यास कुमार्गास लावण्याचा उद्योग सतत चालू असतो. किंबहुना ज्या वेळेस येशूनें आपला नवीन उदात्त धर्म उपदेश करण्यास प्रारंभ केला आणि मनुष्यांत सद्धर्मानें वागण्याची प्रवृत्ति जागृत करण्याचा यत्न केला, तेव्हां सैतानानें त्याला एकाएकी उचलून नेऊन पर्वताच्या उंच शिखरावर ठेविलें आणि त्यास सर्व जग दाखवून 'या जगाचा मी तुला

राजा करतो तूं हा उद्योग सोडून दे' असें सांगितलें. परंतु येशूनें त्याच्या प्रलोभनास वश न होतां त्यास झिडकारलें अशी कथा बायबलामध्यें वर्णिली आहे. तात्पर्य, मोठमोठ्या सदाचरणी लोकांस सुद्धां सन्मार्गापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न सैतान करीत असतो, व जगतांतील प्रलोभनें त्यांस दाखवीत असतो. बौद्ध धर्मांत सुद्धां बुद्धाला सत्यशोधनाच्या मार्गापासून परावृत्त करण्यासाठीं माररूपी सैतानानें प्रयत्न केला असें मानलें आहे. त्याचप्रमाणें कठोपनिषदांत नचिकेतास यमानें प्रलोभनें दाखविल्याची कथा आहे. तात्पर्य, सर्वत्र एकच कल्पना अनेकदां मनुष्यास सहाजिकच सुचते असें आपणांस म्हणावें लागतें.

पण मनुष्यास पापाचरण करण्यास कोण प्रवृत्त करतो या प्रश्नाचें उत्तर हिंदूधर्मांत निराळें दिलेलें आहे. भगवद्गीतेंतच हा प्रश्न सरळपणें केलेला असून ( अथ केन प्रयुक्तोयं पापं चरति पूरुषः ) या प्रश्नाचें उत्तर 'काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विध्येतमिह वैरिणम्' असें दिलेलें आहे. रजोगुणापासून उत्पन्न होणारा काम, क्रोध ( आणि त्यांचाच भाऊ लोभ ) हे मनुष्यांस पापाचरण करण्यास प्रवृत्त करतात असें हिंदुधर्मानें स्पष्ट सांगितलें आहे. नरकांत नेणारा निराळा सैतान हिंदूधर्मानें मानलेला नाहीं. ( त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः। कामः क्रोधस्तथा लोभः तस्मादेतत् त्रयं त्यजेत् --भगव० ). हिंदुधर्मामध्यें यम मानलेला आहे, पण यम म्हणजे सैतान नव्हे. यम मनुष्यास पापाकडे प्रवृत्त करीत नाहीं. यमाचें हें कार्य आहे असेंहि हिंदूधर्म मानीत नाहीं. ज्यानें पाप केलें आहे त्याला यथाधर्म, यथान्याय शिक्षा देणें हें यमाचें कार्य मानलेलें आहे; आणि म्हणून त्यास यमधर्म असेंहि म्हणतात.

मनुष्यास रजोगुणापासून उत्पन्न होणारे काम, क्रोध, लोभ, पापाचरणाकडे प्रवृत्त करतात असें मानलें तरी रजोगुण हा कोणीं उत्पन्न

केला हा प्रश्न रहातो. वाईट गोष्ट परमेश्वर कशी उत्पन्न करील ही अडचण भासल्यानें अहरिमन् किंवा सैतान यांची कल्पना उत्पन्न झाली. परंतु हिंदुधर्माच्या तत्त्वज्ञानांत ही अडचण मानली गेली नाहीं. सृष्टि आणि तींतील सर्व प्रकार हे जर परमेश्वरानें उत्पन्न केले आहेत तर रजोगुण किंवा तमोगुण हेहि परमेश्वरानेंच उत्पन्न केले आहेत असेंच मानावें लागतें. त्यांचा उत्पन्न करणारा निराळा मानणें शक्य नाहीं. जगतांतील कोणतीच वस्तु किंवा शक्ति परमेश्वराच्या इच्छेच्या किंवा आज्ञेच्या बाहेर जाऊं शकत नाहीं.

अर्थात् सत्त्व, रज, तम हे तिन्ही गुण परमेश्वरानेंच उत्पन्न केले आहेत. सात्त्विक, राजस व तामस वस्तु, प्रवृत्ति किंवा प्राणी ईश्वरानेंच उत्पन्न केले आहेत. "ये चैव सात्त्विका भावा राजसा स्तामसाश्च ये। मत्त एवेति तान् विद्धि। (पण) नत्वहं तेषु ते मयि।" असें स्पष्टपणें भगवद्गीतेंत सांगितलेंच आहे. किंबहुना मनुष्य जें जें करतो तें तें हृदयस्थ परमेश्वराच्या प्रेरणेनें करतो असें भगवद्गीतेंतच सांगितलें आहे. (ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया). हृदयस्थ ईश्वराच्याच प्रेरणेनें सर्व बरीं वाईट कर्में होत असतात असा हिंदुधर्माचा महान् सिद्धांत आहे. परंतु 'नत्वहं तेषु' हें लक्षांत ठेवलें पाहिजे. चांगल्या किंवा वाईट कर्मांमध्यें परमेश्वर नाहीं हें विसरतां कामा नये. हें विसरून एका आरोपीनें न्यायाधिशास उत्तर दिलें 'मीं चोरी केली नाहीं, ईश्वरानें यंत्रभूत माझ्याकडून चोरी करविली, तेव्हां तो शिक्षेस पात्र आहे मीं नाहीं.' अर्थात् न्यायाधिशानें त्यास उत्तर दिलें कीं, 'मीहि तुला शिक्षा देत नाहीं. हृदयस्थ ईश्वर माझ्याकडून तुला शिक्षा देववीत आहे. आणि तीहि तुला नाहीं तर हृदयस्थ ईश्वरालाच आहे.' सर्वव्यापी सिद्धान्तास याप्रमाणें एकदेशीय भागानें लावणें हीच सामान्यतः चुकी होते.

बौद्धधर्मांत वर सांगितल्याप्रमाणें मार म्हणून जो मानलेला आहे तो सैतान नव्हे. तो काम याचेंच निराळें रूप आहे. बौद्ध धर्माचे सिद्धान्त पापपुण्याविषयीं हिंदुधर्माहून निराळे नाहींत हें सांगावयास नको. पापपुण्य, मनुष्याच्या हातून मागील कर्मानुरूप घडत असतें असा बौद्ध धर्माचा व हिंदुधर्माचा आणखी सिद्धान्त आहे. त्याविषयीं आपणांस स्वतंत्र प्रकरणांत विवेचन करावयाचेंच आहे. पण पापाची प्रवृत्ति सैतानाच्या प्रेरणेनें होते असें न मानल्यानें पापाचरणाची जबाबदारी हिंदूधर्मानें पापी मनुष्यावरच ठेवली आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

येथें असें कोणी विचारील कीं, ईश्वरानें सत्त्वगुणच कां निर्माण केला नाहीं, अशी त्रिविध सृष्टि कां उत्पन्न केली? ईश्वर चांगला आहे, कृपाळू आहे, तर सर्वच सात्त्विक प्राणी निर्माण करून जिकडे तिकडे पुण्यकर्म आणि सुख यांनींच भरलेली सृष्टि निर्माण केली असती तर बरें झालें असतें. हा प्रश्न निरनिराळ्या रीतीनें सोडवितां येतो. पण सृष्टि हा एक खेळ आहे असें जें एक उत्तर " लोकवत्तु लीलाकैवल्यम्" या सूत्रांत बादरायणानें दिलें आहे तें मननीय आहे. खेळ विविधतेशिवाय होत नाहीं. उच्च नीच, सुखी, दुःखी हसणारा, रडणारा इत्यादि भिन्न प्रकारांनीं विविधता उत्पन्न होते. मुंबईस समुद्रकिनाऱ्यावर जशीं मुलें खेळतांना वाळूच्या खोल दऱ्या करतात, उंच पर्वत करतात, शहरें, नाले करतात आणि अशी विविध रचना करून शेवटीं घरीं जातांना पायांनीं सर्व एक करून निघून जातात, त्याप्रमाणें सृष्टिच प्रथम कां केली आणि वर ती अशी त्रिगुणात्मक कां केली याचें उत्तर 'लोकांप्रमाणें ही ईश्वरी लीला आहे, हा एक खेळ आहे' हें उत्तर योग्य दिसतें. वाईट सृष्टि उत्पन्नकर्ता निराळा सैतान पापाचरणाकडे प्रवृत्त करणारा, मानन्याची आवश्यकता नाहीं. आपल्या कामप्रवृतीनें

मनुष्य पाप करतो आणि ही प्रवृत्ति ईश्वरनिर्मित नसून कर्मानें उत्पन्न होते असा दुसरा सिद्धान्त आहे.

---

## ४ स्वर्ग आणि नरक

प्रारंभीं दिलेल्या प्रश्नांपैकीं ४ था प्रश्न असा आहे कीं, स्वर्ग आणि नरक खरे आहेत काय ? याचें उत्तर शें. ७६ लोकांनीं नाहीं असें दिलें आहे. नवीन भौतिक शास्त्रांच्या प्रगतींत एकंदर सृष्टीच्या निरीक्षणांत स्वर्ग आणि नरक हे कोठेंच दिसत नाहींत हें खरें आहे. त्याचप्रमाणें भौगोलिक परिशोधनांत पृथ्वीच्या कोणत्याहि भागांत स्वर्ग किंवा नरक यांचें अस्तित्व दिसत नाहीं. अर्थात् पुष्कळांस स्वर्ग, नरक नाहींत असेंच म्हणावें लागतें. हिंदूधर्माचें मत यासंबंधानें काय आहे याविषयीं आपण येथें विस्तारानें विवेचन करूं.

स्वर्ग आणि नरक यांची कल्पना पाप आणि पुण्य याचें फळ आपल्या या आयुष्यांत दिसत नाहीं यावरून साहजिक उत्पन्न होते. पाप करणाऱ्या मनुष्यास तत्काळ शिक्षा होत असती किंवा पुण्य करणाऱ्या मनुष्यास इहलोकांतच तत्काल किंवा उशिरा सुखसंपत्ति प्राप्त झाली असती तर स्वर्ग-नरकाची कल्पना अनवश्यक झाली असती. किंबाहुना उलट पापी लोक इहलोकीं सुख भोगतात आणि पुण्य करणाऱ्यांवर अनेक विपत्ति येतात असें वारंवार दिसतें. तेव्हां पापपुण्याचें फळ आहे कीं नाहीं हीच शंका उपस्थित होते. अर्थात् इहलोकानंतर पापपुण्याचें फळ मनुष्यास नरक व स्वर्ग यांत मिळतें असा सर्व धर्मांचा सिद्धान्त आहे. याच कारणासाठीं हिंदुधर्मांतहि स्वर्ग आणि नरक मानलेले आहेत. येथें केलेलें पुण्य स्वर्ग लोकांत भोगावयाचें " ते तं भुक्त्वा स्वर्ग-लोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति," आणि " संकरो नरकायैव," या दोन ठिकाणीं स्वर्ग-नरक

यांचा उल्लेख भगवद्गीतेंतच आहे. तथापि इतर धर्मांहून स्वर्ग-नरकाची कल्पना हिंदुधर्मांत कांहींशी भिन्न आहे. ख्रिस्तीधर्मांत असें मानलें गेलें आहे कीं, मनुष्याचा आत्मा मरणानंतर जजमेंट डे (निर्णयाचा दिवस) पर्यंत थडग्यांत राहातो. त्या दिवशीं ईश्वर सर्वांच्या पापपुण्यांचा निवाडा करून पुण्यवान् लोकांस स्वर्ग देतो, आणि पापी लोकांस नरकांत पाठवितो. स्वर्गामध्यें पुण्यवानांचें कायमचें वास्तव्य असून तेथें ते ईश्वर-सान्निध्यांत, ईश्वरसेवेंत, सर्व सुख उपभोगीत निमग्न राहातात; आणि नरकांत गेलेले आत्मे अनंत कालपावेतों नानाप्रकारचे हाल व दुःख भोगीत ईश्वरापासून सुटलेले तेथें राहातात. थोडक्यांत सांगावयाचें तर स्वर्ग आणि नरक ही गति शाश्वत असून त्यांतून कधींहि सुटका होत नाहीं, असें त्यांचें मत आहे. याच्या उलट हिंदुधर्मांत अशी कल्पना आहे कीं, त्या त्या पुण्यपापाचें फळ, सुख व दुःख, विशिष्ट अवधीचें भोगल्यानंतर मनुष्याचा आत्मा पुनर्जन्म पावतो; आणि या मृत्युलोकांत पुनः येतो. अर्थात् ही कल्पना जास्त युक्त आहे हें उघड आहे. जजमेंट डे लाखों वर्षांनंतर येणार तोंपर्यंत पापपुण्याचें फळ आत्म्यास मिळत नाहीं हें विलक्षण वाटतें; त्याचप्रमाणें जजमेंट डे-नंतर जें फळ मिळतें तेंहि अनंत काळ चालणारें असतें या कल्पनें-तहि थोडें वैगुण्य दिसतें.

पण या दोन्ही धर्मांच्या भिन्न प्रकारच्या कल्पनेंत कठिण प्रश्न आहे तो हा कीं, हा स्वर्ग आणि नरक आहे कोठें ? याचें उत्तर पाश्चात्य धर्मशास्त्रज्ञांसहि चांगलेंसें देतां येत नाहीं. कोठें तरी अनंत आकाशामध्यें स्वर्ग आणि नरक आहेत असेंच त्यांनीं मानलें आहे. या प्रश्नाचा उलगडा हिंदूधर्मांतहि योग्य प्रकारानें केलेला नाहीं. पौराणिकांची कल्पना तर चुकीची आहे. त्रिविष्टप म्हणजे तिबेट अशी एक वेडसर कल्पना अलीकडे निघाली आहे. पण तिबेटांत स्वर्गसुख

आहे असें कोणीं मानलें नाहीं व कोणासहि मानतां येणार नाहीं. पृथ्वी ही अनंत व सपाट आहे अशी पौराणिक कल्पना आहे; आणि हिमालयाच्या उत्तरेस दोन तीन आणखी पर्वतांच्या रांगा असून त्याच्या पलीकडे मेरु आहे व त्याच्यावर स्वर्ग लोक आहे. याच्या उलट भरतखंडाच्या दक्षिणेस पाताळ असून त्याच्या खालीं नरक आहे असें पुराणांतलें वर्णन आहे. पण हल्लीं सर्व पृथ्वीचा शोध लागलेला असून मेरु व पाताळ म्हणजे उत्तर व दक्षिण अमेरिका असें ठरलें आहे. अर्थात् उत्तर व दक्षिण ध्रुवाकडे स्वर्ग किंवा नरक नाहींत हें निश्चित झालें असल्यानें पौराणिक कल्पना चुकीची ठरते.

पण हिंदुधर्माची दुसरी पुढची कल्पना विशेष महत्त्वाची असून ती जास्त उदात्त व जास्त खरी असण्याचा संभव आहे. स्वर्ग-लोकाचा राजा इन्द्र खरा, पण इन्द्राहूनहि श्रेष्ठ देव असून त्यांचे भिन्न भिन्न लोक आहेत; अनंत आकाशांत जे अनेक तेजोमय गोल दिसतात त्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारचे योगसाधन करून सिद्धि पावलेले पुरुष जातात अशी कल्पना औपनिषदिक ग्रंथांतून आपल्या दृष्टीस पडते. सर्वांत श्रेष्ठ ब्रह्मलोक मानला जातो, पण या ब्रह्मलोकाहूनहि वरिष्ठ गति म्हणजे ब्रह्मीभावाची आहे. भगवद्गीतेंतहि असेंच वर्णन आहे. 'प्राप्य पुण्यकृतां लोकान् उषित्वा शाश्वतीः समाः। शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते'। येथें पुण्यकृतांचे अनेक लोक मानलेले स्पष्ट दिसतात, परंतु हे लोक कायमचे किंवा पक्के शाश्वत मिळणारे नसतात, तर पुनरावर्ति असतात. केवळ वासुदेवाला पोंचणारा पुरुष म्हणजे ब्रह्म झालेला पुरुष हाच शाश्वत मुक्त होतो. ब्रह्मगति हेंच 'यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम' असें मानलेलें आहे. "आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन। मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते॥".

ज्याप्रमाणें अनेक लोक पुण्यकृतांचे मानलेले आहेत, त्याचप्रमाणें दुष्कृत करणारांचेहि अनेक नरक आहेत असें मानलेलें आहे. आणि तेहि शाश्वत नसून पुनरावर्ति आहेत. आकाशांत अनंत दिसणाऱ्या तेजोगोलांत हे स्वर्ग व नरक कोणते आहेत हें सांगतां येणार नाहीं पण कांहीं ठिकाणीं सुखमय व कोठें दुःखमय स्थिति असणें संभवनीय आहे. अशा रीतीनें हिंदुधर्मामध्यें स्वर्ग आणि नरक व त्यासारखे इतर लोक याची कल्पना आहे.

स्वर्गनरकाचें ठिकाण कोठें आहे या प्रश्नाचें आणखी एक उत्तर हिंदुधर्मानें दिलेलें आहे. आणि तें उत्तर म्हणजे ‘ या पृथ्वीवर, याच ऐहिक लोकांत स्वर्ग आणि नरक आहेत ’ हें होय. पापपुण्याचें फल याच लोकांत आत्म्यास भोगावें लागतें असा पुनर्जन्माचा सिद्धान्त असून पापपुण्याच्या फलाच्या भोगण्यासाठीं इहलोकांतील भिन्नभिन्न पाप व पुण्य योनि आहेत असें हिंदुधर्म आणखी मानतो. असा पुनर्जन्माचा सिद्धान्त पाश्चात्य धर्मांत नाहीं. हिंदूधर्मांच्या उदात्त तत्त्वांपैकीं हें एक तत्त्व असून तें बौद्ध व जैन धर्मांतहि मानलें गेलें आहे. त्याचा पुढील प्रकरणांत विचार करूं.

---

## ५ पुनर्जन्म–सिद्धान्त

व पुनरुत्थानाच्या दिवशीं ईश्वर न्याय करणार आहे काय ? प्र० ६. पूर्वी सांगितल्याप्रमाणें पाप आणि पुण्य यांचें फळ कर्त्यास मिळालें पाहिजे हें सर्व धर्मांस मान्य आहे. तथापि तें केव्हां व कसें मिळतें याची कल्पना भिन्न धर्मांमध्यें भिन्न आहे. मागील प्रकरणांत ख्रिस्ती धर्माचा या विषयींचा सिद्धान्त सांगितला आहे. Doom's day अथवा ‘ निर्णयाचा दिन ’ या दिवशीं सर्वांचें पुनरुत्थान होईल. ईश्वर सर्वांच्या

पापपुण्यांचा निवाडा करून पुण्यवान् ठरतील त्यांस स्वर्गलोक व पापी ठरतील त्यांस नरक देईल हें ख्रिस्ती धर्माचें मत पूर्वीं सांगितलेंच आहे. प्रारंभींच्या प्रश्नांपैकीं सातवा प्रश्न याविषयींच आहे आणि शंभरांपैकीं ६७ नीं ईश्वर न्याय करणार नाहीं असें उत्तर दिलें. हिंदुधर्माची यासंबंधानें अशी कल्पना आहे कीं, मनुष्याचा आत्मा पापपुण्याच्या आशयासह या देहांतून जातो आणि त्या त्या पापपुण्याच्या फलाप्रमाणें तो उच्चनीच योनीमध्यें कांहीं काळानें पुन्हां जन्म घेतो. ईश्वरास निवाडा करण्याची जरुरीच नाहीं.

या सिद्धान्ताचें स्पष्टीकरण होण्यासाठीं आत्म्याची संसरणगति वेदान्तसूत्रांत उपनिषदांच्या आधारें कशी सांगितली आहे ती वर्णन करूं. ही संसरणकल्पना पाश्चात्य लोकांस चमत्कारिक वाटते; किंबहुना त्यांच्या मनानें केवळ मनुष्याच्या शरीरांतच soul अथवा आत्मा आहे; सजीव प्राणी किंवा वृक्ष यांच्यांत आत्मा नसतो. ( A cow has no soul ). परंतु हिंदुधर्माच्या दृष्टीनें सर्व सजीव शरीरांत आत्मा आहे (किंबहुना जडांत सुद्धां आत्मा आहे). प्रो. बोस यांनीं नुकतेच अनेक प्रयोग करून ही गोष्ट प्रयोगांनीं सिद्ध करून दाखविली आहे कीं, वृक्षांस देखील सुखदुःखांचा अनुभव दिसतो. आत्मा सर्व सजीवसृष्टींत कसा संसरण पावतो, हें छांदोग्य उपनिषदांत विस्तारानें सांगितलें आहे. ‘ शरीरं यदवाप्नोति यश्चाप्युत्क्रामतीश्वरः । गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ।’ असें भगवद्गीतेंतहि गंधाचा दृष्टान्त देऊन शरीरांत आत्म्याचें येणें व शरीरांतून जाणें सुंदररीतीनें वर्णिलें आहे. आत्म्याची ही गति द्विविध आहे. अर्चिरादि आणि धूमादि हे दोन मार्ग भगवद्गीतेंतहि वर्णिलेले आहेत. शरीरांतून निघाल्यावर आत्मा पंचतन्मात्रा आणि पापपुण्य यांचें आशयरूपी लोढणें गळ्यांत घेऊन रश्मिद्वारा वर अंतरिक्षांत जाऊन चंद्रमसापर्यंत

पोंचतो. परंतु ज्यांचें पाप जास्ती आहे ते चंद्रमसाहून पुन्हां परततात. किंबहुना योगभ्रष्टसुद्धां 'तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते' या वाक्याप्रमाणें पुढें न जातां मागें परततात. ते रश्मिमार्गानेंच पुन्हां परत येतात. याच कारणानें चंद्राला हिंदुधर्मांत पितृलोक मानला आहे. पृथ्वीवर आल्यावर आत्मा वृक्षकोटींत जातो आणि वृक्षकोटींतून बाहेर पडून अन्नाच्या द्वारें पुरुषाच्या शरीरांत जातो, आणि रेताच्या मार्गानें मातेच्या गर्भाशयांत पोंचतो. पुण्य चांगलें असल्यास त्यास मनुष्ययोनि प्राप्त होते. परंतु पाप अधिक असल्यास श्वशूकरादि अनेक पशुयोनींत त्याचा जन्म होतो. याप्रमाणें थोडक्यांत आत्म्याची अदृश्य गति हिंदुधर्मांत मानलेली आहे.

आत्मा शरीराहून भिन्न आहे हें मानल्यावर विशेष विचार करणाऱ्या मनुष्यास हा प्रश्न नेहमींच पडतो कीं, आत्मा शरीरांतून निघतो कसा व शरीरांत शिरतो कसा? प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यांची या विषयांत अशी कल्पना होती कीं, मनुष्याचे आत्मे शरीरांतून निघाल्यावर आकाशांत इतस्ततः परिभ्रमण करीत असतात; आणि केव्हांतरी गर्भिणी स्त्रीच्या श्वासोच्छ्वासाच्या मार्गानें गर्भांत प्रवेश करतात. ज्या वेळेस गर्भ पोटांत चलनवलन करतो, त्या वेळेस त्यांत आत्मा शिरला आहे असें ते मानीत. ही कल्पना वरील हिंदुधर्माच्या कल्पनेपेक्षां विशेष संभाव्य दिसत नाहीं. ख्रिस्ती धर्मामध्यें हा प्रश्न उपस्थित होतच नाहीं. कारण त्या धर्मांत आत्म्याचें संसरण मानलेंच नाहीं. मनुष्याच्या देहांतच आत्मा असतो; आणि तो देहांत नवीन उत्पन्न होतो. मृत मनुष्याचा आत्मा Doom's day पर्यंत थडग्यांतच राहातो, त्यास पुढें संसरण नाहीं. पण ग्रीक लोक आत्म्याचें शरीरांतून जाणें व येणें हें मानीत असत. गर्भिणी स्त्रीच्या पोटांत श्वासोच्छ्वासाद्वारें आत्मा शिर-

ण्याच्या कल्पनेपेक्षां अन्नाच्याद्वारें रेतांत आणि रेताच्या द्वारें गर्भाशयांत आत्मा जातो ही कल्पना जास्त सयुक्तिक आहे. किंबहुना हल्लींच्या शारीरिक शास्त्राच्या विज्ञानांत ही गोष्ट सिद्ध झाली आहे कीं, पुरुषाच्या प्रत्येक रेताच्या बिंदूंत जीव नसतो. कांहीं विशिष्ट बिंदूंतच जीव असून तेवढाच ( sperm ) रेतोबिंदु स्त्रीच्या रजोबिंदूंशीं संयुक्त होऊन जीव धारण करतो. एखाद्याच sperm मध्यें जीव धरण्याची शक्ति कां असावी, या प्रश्नाचें उत्तर वरील सिद्धान्तांत चांगलें मिळतें. तात्पर्य, अन्नाच्या प्रत्येक भागांत आत्मा असतो असें नाहीं. आत्म्याचें संसरण अशा रीतीनें त्याच्या कर्माशयाप्रमाणें निरनिराळ्या योनींत अन्नाच्या द्वारें कसें होतें हें वरील सिद्धान्तावरून स्पष्ट होतें. पंचमहाभूतांच्या तन्मात्राचे अवयव आत्म्याबरोबरच फिरतात. असें मानण्याचें कारण स्थूल शरीर धारण करण्याची शक्ति त्या तन्मात्रांमध्यें असते. जीव त्याहून भिन्न असल्यानें त्यांत नसते. यालाच सूक्ष्म शरीर अथवा लिंगदेह म्हणतात. वेदान्तसूत्रांत 'तदंतरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः' असें सूत्र आहे. दोन शरीराच्यामध्यें संसरण होत असतां आत्म्याच्याबरोबर पापपुण्यकर्माचे व पंचतन्मात्रांचें लोढणें असतें. या तन्मात्रांच्या कारणानें विशिष्ट शरीर बंनू शकतें.

असो तर; याप्रमाणें हिंदुधर्मांत आत्म्याच्या संसरणाचा सिद्धान्त असून सर्वच आत्मे या रीतीनें आपआपल्या पापपुण्यकर्मानुरूप निरनिराळ्या योनींत जन्म घेतात. या सिद्धान्ताचें महत्त्व नीतिशास्त्रदृष्ट्या फार मोठें आहे, आणि यामुळेंच हिंदुधर्माच्या सर्व मतांत, विशेषतः बौद्ध आणि जैन मतांत, हा कर्मसिद्धान्त मानला गेला आहे. या जन्मांत आपल्यास पापपुण्याचें फळ मिळत असल्याचें दृष्टिगोचर होत नाहीं; आणि पापपुण्याचें फळ सुख आणि दुःख हें मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. अर्थात् पुनर्जन्माची कल्पना प्राप्त होते. याशिवाय या लोकांत

जन्मतःच कांहीं प्राणी किंवा मनुष्यें सुखी, सद्गुणी व भाग्यवान् असतात; आणि कांहीं जन्मतःच दुःखी, दुर्गुणी व दुर्दैवी असतात. हें असें कां? याला उत्तर त्यांचें पूर्वजन्मकृत सुकृत किंवा दुष्कृत असें हिंदुधर्मांत दिलें आहे. ईश्वरानें त्यांस तसेंच निर्माण केलें म्हणावें तर ईश्वराच्या ठिकाणीं वैषम्य, नैर्घृण्य इत्यादि दोष लावावे लागतील. ही मोठी अडचण आहे. 'वैषम्यनैर्घृण्यप्रसंगात्' या वेदान्तसूत्रांत कर्मसिद्धाचें हेंच प्रयोजन दिलें आहें. 'नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः' असें भगवद्गीतेंतहि सांगितलें आहे. कोणाचें सुकृत किंवा दुष्कृत परमेश्वर घेत नाहीं. तें त्याचें कर्म आपोआप फळास येत असतें.

येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, "ज्याच्या त्याच्या पूर्वजन्मींच्या सुकृत-दुष्कृतानुरूप त्यास फळ मिळतें हें मानलें तरी अगदीं प्रारंभीं ज्या वेळेस सृष्टि निर्माण झाली त्या वेळेस प्रथमारंभीं सुकृत व दुष्कृत करण्यास परमेश्वरानें निरनिराळ्या रीतीनें मनुष्यांस कां लावलें ? त्यापूर्वीं सुकृत, दुष्कृत असणें शक्य नाहीं." या कठिण प्रश्नाचें उत्तर वेदान्तशास्त्रांत असें दिलें आहे कीं, कर्म हेंहि अनादि आहे. सृष्टीची उत्पत्ति आणि लयहि अनादि आहेत. हें रहाटगाडगें सारखें चालू आहे. जसें कालाचा आरंभ कधीं झाला हें सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें सृष्टि परमेश्वरानें प्रथम कधीं उत्पन्न केली हेंहि सांगतां यावयाचें नाहीं. भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें जगताची उत्पत्ति आणि लय, सकाळ आणि संध्याकाळ प्रमाणें सारखी चालू आहे. जगताचा लय झाला तरी त्या त्या वेळचा कर्माशय तसाच लीन रहातो आणि जगदुत्पत्तीच्या काळीं पुनः फलास येऊं लागतो. "भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते" असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे. तेव्हां काळ जर अनादि आहे तर कर्महि अनादि मानणें प्राप्त आहे आणि जगताची उत्पत्ति, जगतांतील व्यवहार, तसेंच आत्म्याचें संसरण यांचें रहाटगाडगें सारखें

चालू आहे. किंबहुना सृष्टीचा क्रम पुनःपुन्हां तोच येतो असें 'धाता यथा पूर्वमकल्पयत्' या श्रुति वाक्यांत सांगितलें आहे. म्हणजे जगाची कर्मासह उत्पत्ति आणि जगाचा कर्मासह लय ईश्वरामध्यें पुनःपुन्हां होत असतात. जगाचा कधीं लय होतच नाहीं. अशीं कांहीं लोकांची कल्पना आहे. पण मग जगताच्या उत्पत्तिप्रसंगीं कर्म भिन्न कां व उच्चनीच भाव कां त्याचें उत्तर मिळत नाहीं पूर्वमीमांसावादी जगाची उत्पत्ति किंवा लय मानीत नाहींत, पण त्यांच्याहि मतें आत्म्याचें संसरण चालू आहे.

मनुष्य पूर्व संचिताप्रमाणें या जन्मांत सुखदुःख भोगतो. किंबहुना या लोकांत जशी पूर्वसंचिताची गति असेल त्याप्रमाणें बुद्धि होऊन तो कर्म करीत असतो, असें मान्य केलें तर मनुष्य स्वतंत्र आहे, आणि त्याच्या कर्माची जबाबदारी त्याजवर आहे ही गोष्ट नाहींशी होते. सदाचारानें वागावें, कामक्रोधाच्या नादीं लागूं नये इत्यादि उपदेशहि व्यर्थ होतात, ही मोठी अडचण आपल्या समोर उभी राहते. Predestination आहे किंवा free will आहे, मनुष्य पूर्वकर्मपराधीन आहे किंवा त्यास कर्मस्वातंत्र्य आहे, हा मोठा वादाचा प्रश्न असून खिस्ती धर्माच्या तत्त्वज्ञान्यांत याजवर अनेक विवाद झाले व अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिले गेले. या प्रश्नाचा ऊहापोह येथें विस्तारानें करण्याचें कारण नाहीं. प्रयत्नवाद आणि दैववाद दोन्ही खरे आहेत, असें थोडक्यांत सांगतां येईल; दोघांची दृष्टीची भूमिका मात्र भिन्न आहे. एकच वस्तु दोन बाजूंनीं पाहिली असतां जशी एकदां पूर्वेस व एकदां पश्चिमेस दिसते त्याचप्रमाणें वृत्त घडून आल्यावर मागें नजर करून पाहिलें असतां predestination अथवा पूर्वसंचितवाद खरा; आणि वृत्त होण्याच्या पूर्वीं काय करावें या प्रश्नाचा विचार उपस्थित झाला असतां free will अथवा प्रयत्नवाद हा सिद्धान्त खरा आहे. दैव हें अदृष्ट असतें यामुळें त्याचा विचार

करणें कर्म करतेवेळीं शक्यच नाहीं. आणि यामुळें मनुष्यास कर्म-स्वातंत्र्य असून नीतीचा उपदेश योग्य तऱ्हेनें केला जातो. 'महाशनो महापाप्मा विद्धयेनमिहवैरिणम्। जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम॥.' कामरूप शत्रूचा तूं नाश कर असा उपदेश योग्य रीतीनें कर्मापूर्वीं भगवंतांनीं अर्जुनास केला. याशिवाय जन्मतःच जी उच्चावच स्थिति असते आणि जगाच्या व्यवहारांत आपल्या कर्माशिवाय जी आपत्ति आपल्यावर कोसळते त्यांची योग्य उपपत्ति पूर्वजन्मींच्या कर्माशिवाय लावतां येत नाहीं. या गोष्टी आपल्या प्रयत्नाच्या आटोक्याच्या बाहेरच्या असतात. आणि त्यास दैव अथवा ईश्वरी इच्छा असेंच म्हणावें लागतें. अशा वेळीं नुसतें अन्ध दैव किंवा accident म्हणण्यापेक्षां पूर्वसंचिताचें फल असें म्हणणें जास्त सयुक्तिक आणि कार्यकारण-परंपरायुक्त आहे.

कर्मसिद्धान्तानुरूप आत्मा आपआपल्या कर्मानुसार भिन्न भिन्न योनींतून कसा संसरण पावतो हें येथपर्यंत सांगितलें. या संसरणांतून मुक्त होणें म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटणें यास मोक्ष म्हणतात आणि ही आत्म्याची दुसरी गति आहे. कर्मयोगानें किंवा ज्ञानयोगानें किंबहुना भक्तियोगानें मनुष्य या अत्यंत निर्मुक्तीस पोंचतो असें भगवद्गीतेंत उपदेशिलें आहे. या गतींत आत्मा अर्चिरादि मार्गानें चंद्रमसापर्यंत जाऊन मागें फिरत नाहीं. छांदोग्यउपनिषदांत सांगितल्याप्रमाणें 'चंद्रमसो वैद्युतं तत्पुरुषोऽमानवःस एनां ब्रह्म गमयत्येष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपाद्यमाना इमं मानवमवर्तं नावर्तन्ते।. चन्द्रमसाच्या पलीकडे आत्मा जाऊन वैद्युत लोकास जातो. तेथें विद्युतरूपी पुरुष आल्यास ब्रह्मगतीस नेतो. या मार्गानें गेलेले आत्मे या मानवी भोवऱ्यांत पुनः परत येत नाहींत! शेवटची गति वैद्युत सांगितलेली आहे. यांत एका प्रकारें जगताच्या मुळाशीं अर्वाचीन भौतिक शास्त्रज्ञांनीं मानलेल्या

election शीं संबंध येतो, आणि ही गति खरोखरच शेवटची असली पाहिजे.

याहूनहि एक तिसरी गति छांदोग्यउपनिषदांत सांगितली आहे. प्रथम वैदिक यज्ञादि कर्माचें फळ स्वर्ग हें केव्हां भोगलें जातें याचा पूर्वीं उल्लेख आला नसला तरी तें चांद्रमस लोकापर्यंत भोगलें जातें असें म्हटलें पाहिजे. त्याचप्रमाणें इतर अनेक जीं पुण्यकर्में सांगितलीं आहेत व ज्यांच्याकरितां गोलोक, ब्रह्मलोक इत्यादि अनेक लोक कल्पिले आहेत त्या लोकांत पुण्याचा क्षय झाल्यावर चांद्रमस मार्गानें आत्मा पुनः पृथ्वीवर येतो; पण ज्यांचें पुण्य अगदीं थोडें असे निरनिराळ्या योनींतील आत्मे या दोन मार्गांनीं जातच नाहींत.ते थोडेसेच वर जाऊन या लोकांत पुनः परततात आणि हजारों क्षुद्र कीटकांच्या योनींत जाऊन 'जायस्व म्रियस्व' अशा रीतीनें अल्पायुषी होऊन वारंवार जन्ममरण पावतात.

आत्म्याचें संसरण या रीतीनें हिंदुधर्माच्या सर्व मतांमध्यें मान्य केलें गेलेलें आहे. जगताची रहाटी सारखी अविछिन्न कांहीं नियमित प्रकारानें चालली असली पाहिजे हें आपल्यास पटण्यासारखें आहे. पापपुण्याचें फल त्या त्या कर्मामध्यें आपोआप नियमानुसार भरलेलें आहे आणि त्याची क्रिया आपोआप होत जाते. हें यांतील इंगित आहे. ख्रिस्ती धर्मांत याच्या उलट judgment day ची कल्पना केलेली आहे ती यासाठीं बहुधा केलेली आहे कीं, मनुष्यानें जें पाप व पुण्य या जगतांत केलेलें असेल त्याची शहानिशा करून त्या त्या कर्माच्या फलाची चिकित्सा करून ईश्वर शेवटीं तारतम्यानें न्याय देणार आहे. अर्थात् यांत ईश्वराच्या न्यायीपणाची दृष्टि आहे व न्यायासनासमोर आरोपीस ज्याप्रमाणें आपला जबाब देतां येतो त्याप्रमाणें जजमेंट डेच्या दिवशींहि मनुष्यास जबाब विचारला जाईल व

त्याचा जबाब घेतला जाईल अशी कल्पना आहे. हिंदूधर्माच्या संसरण सिद्धान्ताप्रमाणें कर्माला ठराविक फल लावून दिलेलेंच आहे, आणि मनुष्यानें प्रच्छन्न रीतीनें पापें केलीं असतील तरी सूर्य चन्द्र 'उभे च सन्ध्ये' मनुष्याचें वृत्त पहात असतात व जाणत असतात असें मानलेलें आहे. ज्याप्रमाणें भौतिक सृष्टींत निरनिराळीं वस्तूंचीं कार्यें स्वभावतःच होत जात असतात त्याचप्रमाणें नीतीच्या सृष्टींत पापपुण्याच्या कर्मफलांचा भिन्न भिन्न परिणाम आपोआप होत असतो आणि त्यांची वजावाट होऊन निष्पन्न होणारी गति आपोआप ठरत असते. गणितांतील दृष्टान्तानें ही गोष्ट चांगली व्यक्त करतां येईल. एकाच बिंदूवर निरनिराळे forces निरनिराळ्या दिशेनें जोर करीत असतां जशी एक resultant गति आपोआप निघत असते, त्याप्रमाणें पूर्व संचिताच्या योगानें प्राप्त झालेल्या गतीनें जात असलेला आत्मा या जन्मांत निरनिराळ्या कर्मांच्या भिन्न शक्तीच्या व दिशेच्या जोराच्या आटोक्यांत येऊन त्याला एक विशिष्ट गति लागते हें समजण्यासारखें आहे. किंबहुना असेंहि हिंदूधर्मात मानलें आहे कीं 'अत्युत्कटैः पापपुण्यरिहैव फलमश्नुते.' पाप किंवा पुण्य अत्युत्कट असेल तर त्याचें फल याच जन्मांत ताबडतोब मिळतें. कोणीं खून केला तर त्याला लागलीच देहान्त शिक्षा मिळाल्यानें त्या खुनाचें फल पुढल्या जन्माकरतां उरत नाहीं. बॉम्बसारखा जबरदस्त आघात होऊन जसा एखादा अणु एकदम नष्ट होतो किंवा उडतो त्याप्रमाणें घोर पापाचा परिणाम पुढल्या जन्मीं भोगावयास लागत नाहीं. तात्पर्य, हिंदूधर्माचा कर्मानुरूप आत्मसंसरणाचा सिद्धान्त कार्यकारणपरंपरारूपी विचारासारखा आहे; इतकेंच नव्हे तर त्यांत नीतिमत्तेचा अत्यंत पुरस्कार केलेला आहे हें लक्षांत येईल.

---

# ७ श्रुतिस्मृतिप्रामाण्य.

ख्रिस्ती धर्मोपदेशकांस केलेल्या प्रश्नांपैकीं आठवा प्रश्न ( यांतच सातवा येशूच्या पुन्हा येण्याविषयींचा अंतर्भूत आहे ) असा आहे कीं, येशूच्या करारानंतर दुसरा धर्मग्रंथ होणार आहे काय? आणि त्याचें उत्तर होणार असें १८ जणांनीं दिलें व ६९ नीं नाहीं असें दिलें. शंभरांपैकीं बाकी १३ तटस्थ राहिले. अर्थात् ख्रिस्त्यांत हा प्रश्न जास्त वादग्रस्त दिसतो. याचें कारण समजण्यास ख्रिस्तीधर्माचा थोडासा इतिहास मनांत आणला पाहिजे. प्रत्येक धर्माला धर्मग्रंथ आणि धर्मोपदेशक हे असलेच पाहिजेत. धर्माचा मूळ उपदेश करणारा ग्रंथ व ग्रंथकार हे अतिशयित सामर्थ्याचे व अतींद्रिय ज्ञानाचे असले पाहिजेत हें उघड आहे. निदान त्यांस तसें मानलें तरच त्यांचा धर्म लोकांत प्रसृत होतो. बुद्ध, येशू, महंमद इत्यादि नवीन धर्मसंस्थापकांस याच रीतीनें अलौकिक बुद्धीचे व सामर्थ्याचे तत्तद्धर्मानुयायी मानतात व त्यांचे ग्रंथ अमानुष म्हणजे ईश्वरप्रणीत आहेत अशीच भावना ठेवतात. याच न्यायानें हिंदुधर्माभिमानी लोक ऋषींस अलौकिक सामर्थ्याचे अतींद्रियज्ञानाचे मानतात व त्यांनीं सांगितलेल्या श्रुतिस्मृतींस ईश्वरप्रणीत समजतात. हें बुद्धिगम्य किंवा ऐतिहासिक नसेल, पण असें मानल्याशिवाय त्या ग्रंथांस प्रामाण्य येणार नाहीं. हें गृहीत कृत्य ( postulate ) धरल्याशिवाय धर्मांत पुढें पाऊल टाकतांच येत नाहीं. याविषयीं जास्त विवेचन पुढें करूं. परंतु या बाबतींत सनातन हिंदुधर्मांत व इतर धर्मांत एक महदन्तर आहे. तें हें कीं हिंदुधर्म फार प्राचीन किंबहुना अज्ञातमूल असल्यानें तो कधीं सुरू झाला हें सांगतां येत नाहीं. श्रुतिस्मृतिप्रणेते ऋषि हे

सृष्टयारंभीं किंवा कृतयुगांत होऊन गेले असें हिंदुधर्माचें तत्त्व आहे. या उलट बुद्ध इ. स. पू. ५००, येशू, इ.सनारंभीं आणि महंमद इ.स. ६०० च्या सुमारें झाले आणि त्यांनीं तेव्हांचे जुने धर्म मोडून किंवा रद्द करून आपले धर्म प्रतिपादन केले. यावेळीं आपल्या पूर्वींच्या धर्मासंबंधें आणि धर्मप्रणेत्यांसंबंधानें त्यांनीं दोन प्रकारें सांगणें शक्य होतें. (१) पूर्वींचे धर्मप्रवर्तक भ्रान्त असून त्यांनीं सांगितलेला धर्म खोटा (२) ते धर्मप्रणेते त्या त्या काळापुरते होते, आतां या काळाला हा धर्म ईश्वरानें सांगितला आहे. बुद्धानें पहिला मार्ग स्वीकारिला. (जैन-धर्मानेंहि हेंच केलें ). श्रुतिस्मृति भ्रान्त धर्म सांगतात, यज्ञादिकर्म निष्फल आहे, वर्णाश्रम--व्यवस्था खोटी आहे, अर्थात् हे धर्म सांगणारे ऋषि अज्ञानी होते असेंच बुद्धानें सांगून आपला नवीन धर्म उपदेशिला. यामुळें त्याच्या मार्गांत अडचण उपस्थित झाली नाहीं. ख्रिस्तानें व महंमदानें दुसरा मार्ग स्वीकारिला. ज्या ज्यूलोकांत येशू उत्पन्न झाला त्यांच्यांत प्राचीनतर ज्यूधर्म चालत असून त्या धर्माचा मुख्य प्रणेता मोझेस होता. मोझेसच्या पूर्वींहि कांहीं ऋषि झाले होते असें ज्यू मानतात. या प्राचीन ऋषींविषयीं येशूची भावना चांगली असल्यानें हे ऋषि भ्रान्त होते व त्यांनीं उपदेशिलेला धर्म खोटा होता असें येशूस सांगतां येईना. त्यांच्या धर्मापैकीं बराच भाग त्यानें ठेविला आणि कांहीं विशिष्ट धर्म त्यानें नवे सांगितले. सृष्टयुत्पत्ति, ईश्वर, सैतान वगैरे गोष्टी त्यानें जुन्या ज्यूधर्मांतीलच घेतल्या. पण विवाहव्यवस्था सुधारून, पशुयज्ञ बंद करून, नवीन पूजाप्रार्थना इत्यादि बाबतींत त्यानें नवीन नियम सांगितले. अर्थात् येशूनें उपदेशिलेला करार नवा मानला जातो. New Testament शिवाय ख्रिस्ती लोकांत Old Testament 'जुना करार' हाहि बहुतेक मान्य आहे. नवीन करार सांगतांना येशूला असें म्हणावें लागलें कीं,

मोझिस वगैरे ऋषींना ( Prophets ) ईश्वराचीच प्रेरणा होती पण ती त्या काळापुरतीच होती. आतां माझ्यामार्फत ईश्वरानें नवीन आज्ञा केली आहे. पण या उपदेशांत हें गर्भित होतें कीं जर ईश्वर वेळोवेळीं भिन्न आज्ञा पाठवितो, तर येशूच्या करारानंतर पुन्हां दुसरी आज्ञा केव्हां तरी येईल. अशा रीतीनें हा प्रश्न ख्रिस्तीधर्मांत अत्यंत महत्त्वाचा उत्पन्न झालेला आहे आणि म्हणूनच १८ धर्मोपदेशकांनीं नवा धर्मग्रंथ येणार हें मान्य केलें. तथापि असें मान्य केलें तर धर्माला स्थैर्य राहत नाहीं; किंबहुना ईश्वर वेळोवेळीं भिन्न आज्ञा कशा पाठवितो याचेंच तर्कनिष्ठ मनुष्यास आश्चर्य वाटतें. मानवी कायद्या-प्रमाणें ईश्वरी कायदे वाटेल तेव्हां रद्द होऊन नवे प्रचलित होत नाहींत. अचेतन सृष्टींतील नियमहि कधीं बदलत नाहींत. तेव्हां येशूचा करार रद्द होऊन नवा धर्मग्रंथ येणार नाहीं असें पुष्कळ विचारी ख्रिस्ती धर्मोदेशकांस वाटतें; म्हणून साहजिकच ६९ धर्मो-पदेशकांनीं नाहीं असेंच उत्तर दिलें. पण येशूच्याच उपदेशांत पुढें मेसाया नांवाचा धर्मोपदेशक येणार आहे असें सांगितलें असल्यानें १३ जणांस अस्ति–किंवा नास्ति–पक्षी उत्तर देतां येईना. महंमदानें येशूच्या समतोलवृत्तीनें उत्पन्न झालेली ही अडचण पाहिली. त्यानेंहि परंपरागत ज्यूधर्माचा सृष्ट्युत्पत्ति वगैरे भाग घेतला आणि वेळोवेळीं ईश्वर धर्मोपदेशक पाठवितो हेंहि तत्त्व गृहीत केलें. पण त्यापासून उत्पन्न होणारी अडचण नष्ट करण्यासाठीं त्यानें असें प्रतिपादन केलें कीं, मी ईश्वराचा अन्तिम प्रेषित आहे, माझ्यानंतर कोणीहि प्रेषित येणार नाहीं. ( I am the last prhphat ). ज्यू धर्मांतील आदम, इब्राहिम, मूसा वगैरे पूज्यव्यक्ति त्यानें मानिल्या, किंबहुना येशूसहि त्यानें पूज्य मानलें, पण आपण ईश्वराची शेवटची आज्ञा सांगत आहों

असें प्रतिपादन करून त्यानें आपल्या उपदेशास स्थैर्य आणलें. अर्थात् मुसलमानी धर्मांत हा प्रश्न उपस्थित होत नाहीं.

ख्रिस्ती धर्मांत हा प्रश्न उपस्थित होत असल्यानें प्रत्यक्ष कशी अडचण उत्पन्न झाली याची हकीकत इतिहासांत मनोरंजक आहे. पुढें मेसाया येणार आहे या भाकिताचा फायदा घेऊन दोनचारदां अहंमन्य थोतांडी उपदेशक पुढें येऊन आपणच पूर्वी भाकित केलेला मेसाया आहोंत असें सांगून भाविक लोकांस फसवीत आले. असाच एक महत्त्वाकांक्षी उपदेशक बराच विजयी होऊन लोक आपल्या भोंवतीं जमवूं लागला. त्यावेळीं टर्कीच्या सुलतानचें राज्य एशिया मायनरमध्यें होतें. त्यानें हें बंड मोडून काढण्याकरितां त्या थोतांडी मेसायास पकडून कान्स्टांटिनोपल येथें आपल्यापुढें आणविलें; आणि "तूं खरा मेसाया असशील तर बंदूक तुझ्यावर चालविल्यावर, जसा येशू जिवंत राहिला तसा तूंहि राहशील." असें म्हणून शिपायास त्यावर गोळी झाडण्यास आज्ञा केली. तो खोटा मेसाया लागलीच दण्डवत् जमिनीवर पडून मी मेसाया नाहीं असें ओरडला. सुलतानानें त्याचा गुन्हा माफ करून त्यास आपल्या देवडीवर, त्यानें पुन्हा ढोंग माजवूं नये म्हणून, आमरण अडकवून ठेविलें. या इतिहासावरून जुन्या करारानंतर दुसरा धर्मग्रंथ होणार आहे हा सिद्धान्त किती घातक आहे हें प्रत्येकाच्या ध्यानांत येईल.

कोणत्याहि धर्माच्या उपदेशाला स्थैर्य येण्यासाठीं दोन कल्पनांची अत्यन्त आवश्यकता आहे. ( १ ) तो धर्म ईश्वरानें प्रेरित केला आहे आणि ( २ ) तो कायमचा उपदेशिलेला आहे, अर्थात् तो सनातन आहे, मानवी कायद्यांप्रमाणें रद्दबदल होणारा नाहीं. या दोन्ही गोष्टी प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें सत्य किंवा तर्काला पटणाऱ्या आहेत कीं नाहींत हा प्रश्न निराळा, पण त्या धर्माच्या स्थैर्यासाठीं मानल्याच पाहिजेत हें

निर्विवाद आहे. प्रत्येक धर्म याप्रमाणें आपल्या धर्मग्रंथास व धर्मोपदेशकांस ईश्वरप्रणीत व ईश्वरप्रेषित मानीत आला आहे आणि तो धर्म कायमचा अर्थात् न बदलणारा म्हणजे शाश्वत आहे असेंच मानतो. हिन्दुधर्मीय आपल्या धर्मग्रंथांस म्हणजे श्रुतिस्मृतींस याच रीतीनें ईश्वरप्रणीत मानतात; व धर्म सांगणाऱ्या ऋषींस अलौकिक दृष्टीचे समजतात. ही एक श्रद्धेची गोष्ट आहे हे पूर्वीं सांगितलेंच आहे; कारण येशूचें बायबल किंवा महंमदाचें कुराण हीं ईश्वरप्रणीत धर्म सांगतात तर ऋषींचे श्रुतिस्मृति ग्रंथ तद्विरोधी धर्म कसा सांगू शकतील आणि तसे असेल तर तेहि ग्रंथ ईश्वरप्रणीत कसे ही शंका तार्किक येथें उपस्थित करील. पण प्रथम गोष्ट ही कीं, हा प्रश्न श्रद्धेचा आहे आणि हिंदुधर्मीयांची श्रद्धा, आपले ऋषि व ऋषिप्रणीत श्रुतिस्मृति ग्रंथच खरा धर्म सांगतात अशीच असली पाहिजे. हिंदु धर्माचे उदात्त तत्त्व इतर धर्माहून या बाबतींत भिन्न, पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें, असें आहे कीं हिंदुधर्मतत्त्वाविरुद्ध इतर धर्माचे ग्रंथ जरी कित्येक गोष्टी सांगत असले तरी निष्ठेनें ते धर्म मानणारे लोकसुद्धां उत्तम लोकाला जातील. ( यो यां यां तनु भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति—भ.गी० ). आणि यांत तर्कदृष्ट्याहि चूक दिसत नाहीं. जसें खोटे कल्पित अंक घेऊन रीत बरोबर असल्यास गणिताचे उत्तर बरोबर येतें, त्याप्रमाणें ईश्वराचे अनन्यभावानें सेवन ही रीत जर बरोबर असेल तर ईश्वरप्राप्ति भ्रान्त धर्मानेंहि होईल. असो तर, हा प्रश्न श्रद्धेचा आहे आणि श्रुतिस्मृति ईश्वरप्रणीत आहेत ही हिंदुधर्मीयांची भावना युक्त आहे इतकेंच नव्हे तर अवश्यहि आहे. तें कसें हें आपण आणखी विस्तारानें पाहूं.

धर्माचा संबंध मुख्यतः ईश्वरस्वरूप, आत्म्याचें स्वरूप, आत्म्याची मरणोत्तर गति इत्यादि अतींद्रिय विषयाशीं आहे. या गोष्टी कोणत्याहि

इंद्रियजन्य ज्ञानानें जाणण्यायोग्य नाहींत. भौतिकशास्त्रें इंद्रियजन्य ज्ञानावरच अधिष्ठित असल्यानें या गोष्टींचा निर्णय करूं शकत नाहींत, त्यांनीं अद्याप निश्चय केला नाहीं आणि पुढेंहि त्या करूं शकणार नाहींत. स्पेन्सरसारखे महातत्त्ववेत्ते या गोष्टी अज्ञेय आहेत असेंच प्रतिपादतात. अर्थात् या गोष्टींविषयीं माहिती देणारे ऋषि अतींद्रिय ज्ञानाचेच असले पाहिजेत, निदान मानले पाहिजेत; व त्यांनीं ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या निश्चित व न बदलणाऱ्या अशाच असल्या पाहिजेत. आत्म्याचें स्वरूप आज एक सांगितलें आणि उद्यां दुसरें सांगितलें तर चालणार नाहीं, खोटेपणाचा आरोप येईल, ईश्वरभक्ति आज एका मार्गानें करावी म्हणून सांगितलें आणि तो मार्ग रद्द करून नंतर दुसरा सांगितला तरी चालणार नाहीं. दुसरा ऐच्छिक नवीन सांगतां येईल, पण जुना रद्द किंवा चुकीचा केव्हांच म्हणतां येणार नाहीं. तात्पर्य, केवळ धर्मविषयक गोष्टी सांगणारे ऋषि अतींद्रियज्ञानी असले पाहिजेत; किंवा मानले पाहिजेत आणि त्यांनीं सांगितलेले धर्म निश्चित व शाश्वत म्हणजे न बदलणारे असले पाहिजेत; निदान ते तसे आहेत असेंच मानिलें पाहिजे. ही श्रद्धेची गोष्ट मानली तरी ती धर्माच्या सत्यतेला व स्थैर्याला आवश्यक आहे. ज्या ऋषींना तुम्ही मानाल त्यांचा धर्म तुम्ही पाळतां असें ठरेल, मग ते ऋषि दयानंद का असेनात. ज्यांची दयानंदाच्या ठिकाणीं श्रद्धा आहे त्यांनीं दयानंद हे अतींद्रियज्ञानी होते आणि त्यांनीं सांगितलेला धर्म शाश्वत आणि सत्य आहे असेंच मानिलें पाहिजे. महंमदासंबंधानें मुसलमान असेंच मानतात आणि येशूसंबंधीं ख्रिस्ती असेंच मानतात. मग सनातन हिंदुधर्मीयांनीं ऋषि अतींद्रियज्ञानी होते, आणि त्यांनीं सांगितलेलें श्रुतिस्मृति ग्रंथ ईश्वरप्रणीत, न बदलणारे आहेत असें मानलें तर त्यांत चूक नाहीं किंबहुना हें अवश्य व युक्त आहे.

येथें अर्धवट विचाराचे हल्लींचें कित्येक सुशिक्षित हिंदु असें प्रतिपादितात कीं श्रुति अनेक आहेत, स्मृतिहि अनेक आहेत. निरनिराळे धर्म निरनिराळ्या वेळीं त्यांनीं प्रतिपादिलें आहेत, अर्थात् आपआपल्या काळाला अनुसरून त्यांनीं निराळें धर्म सांगितले आहेत, सध्यांच्या काळाला अनुसरून निराळा धर्म सांगणारी नवी स्मृति उत्पन्न होणें अवश्य आहे. इतर धर्मांत जसा एकच धर्म ग्रंथ आहे. तसा हिंदुधर्मांत नाहीं, हें एक वैगुण्य आहे खरें. चार वेद आणि अष्टादश स्मृति असून पुराणेंहि आणखी धर्मग्रंथ म्हणून घेतलीं तर अठरा पुराणें आहेत. हीं सर्व एका वेळीं किंवा एका ऋषीचीं असणें शक्य नाहीं. याशिवाय थोतांडी लोकांनीं केलेलीं उपपुराणें व उपस्मृत्या आहेतच. त्यांचे कित्येक प्रक्षिप्त भाग, ग्रंथ अनेक असल्यानें जुन्या ग्रंथांत घातले आहेत हेंहि मान्य करावें लागेल. सुभाषितकार म्हणतो "श्रुतिर्विभिन्ना स्मृतयोपि भिन्ना नैको ऋषिर्यस्य वचः प्रमाणम् धर्मस्य तत्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः" महाजन म्हणजे ( वाणी नव्हे ) मोठे लोक ज्या रीतीनें वागतात तसें वागा. धर्माचें तत्त्व गूढ आहे. आणि श्रुतिस्मृति अनेक आहेत. हिंदु धर्मांत देवहि अनेक दिसतात त्यामुळें सामान्य जनांची अशी धांदल होते आणि आक्षेपकांस निंदा करावयास फावतें. परंतु हिंदुधर्मांत असे देव अनेक असले तरी ईश्वर एक आहे, अनेक देव त्याचीच भिन्न रूपें आहेत,असें मानलें जातें तसेंच सर्व ग्रंथांतून एकच धर्म सांगितला आहे.त्याचीं भिन्न रूपें हे ग्रंथ भिन्न दाखवितात. पण विष्णु आणि गणपति भिन्न दिसले तरी एकच आहेत,त्याचप्रमाणें मनु आणि याज्ञवल्का एकच धर्म सांगतात, शब्द मात्र भिन्न दिसतात. तात्पर्य,स्मृत्या एकवाक्यतेनें लावल्या पाहिजेत असा हिंदुधर्मशास्त्र लावणारांचा सिद्धान्त योग्य आहे. त्याचप्रमाणें श्रुत्युक्त विधींत भेद दिसला तर तेथें

दोन्ही विधि विकल्पानें मानावें, असा आगम आहे, पण वस्तुस्थिति-वर्णनांत भेदच नाहीं हाहि आमचा सिद्धान्त आहे. उपनिषदांतून आत्म्याचें वर्णन भिन्न शब्दांनीं विरोधी दिसतें पण हा सर्व विरोध काढून समन्वय करून बादराणसूत्रानें एकच वेदान्तमत प्रतिपादन केलें आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. भिन्न काळांत किंवा ग्रंथांत आत्म्याचीं भिन्न रूपें नाहींत. असो, श्रुति आणि स्मृति असे दोन प्रकार धर्मग्रंथांचे कां असावे अशी पृच्छा जिज्ञासु वाचकांस येथें करतां येईल, त्याचें समाधान येथें दिलें पाहिजे. कोणताहि धर्म घ्या, त्यांत हा भेद आहेच. हा भेद हिंदुधर्माच्याच ग्रंथांत नाहीं. प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या मुखांतून निघालेलीं वाक्यें ऋषि ऐकून तीं उच्चारितात म्हणून त्यास **श्रुति** असें नांव आपल्या धर्मांत दिलें आहे. यांत प्रत्यक्ष ईश्वराशीं त्या वाक्यांचा संबंध जोडला आहे. बौद्धधर्मांतहि त्रिपिटक ( तीन पेट्या ) हा ग्रंथ भगवान् बुद्धाच्या तोंडांतून निघालेलीं वाक्यें ऐकून स्थविरांनीं (थेरानी) ग्रथित केला आहे. बुद्धानें कोणताच धर्मग्रंथ लिहिला नाहीं. हे त्रिपिटक बौद्धांची श्रुति होत. ख्रिस्तीधर्मांत येशूच्या तोंडून निघा-लेला उपदेश सेंट मायकेल, जॉन, पीटर वगैरेंनीं ऐकिला तो त्या त्या वेळच्या प्रसंगांच्या वर्णनासह या ऋषींनीं लिहून ठेवला. त्याचें बायबल झालें आहे. अर्थात् ही ख्रिस्त्यांची श्रुतिच आहे आणि हे सेंटजॉन वगैरे ऋषि होत. महंमदानें गुहेंत जें ईश्वरापासून ज्ञान संपादन केलें तें कुराणांत लिहिलें आहे. अर्थात् मुसलमानांची श्रुति कुराण आहे आणि ऋषि एकच महंमद आहे. या तिन्ही धर्मांत या श्रुतीनंतर स्मृत्या उत्पन्न झाल्या आहेत. कारण, श्रुतीनें कार्यभाग होत नाहीं. ईशप्रार्थना, गाथा वगैरे श्रुतींत असल्याकारणानें निश्चित रीतीनें विधिरूप धर्म सांगण्यास व कांहीं ठिकाणीं उपपत्ति व पूर्तता कर-ण्यासाठीं अन्य ग्रंथ जरूर लागतात. असे ग्रंथ स्थविरांनीं बौद्धधर्मांत,

फादर्सनीं ख्रिस्तीधर्मांत, आणि महंमदाच्या प्रत्यक्ष अनुयायांनीं, त्यासह ऐकिलेल्या गोष्टी स्मृतीनें लिहिले. मुसल्मानी धर्मांत या ग्रंथास हदीस म्हणतात. तात्पर्य, मूळ धर्मोपदेशकांशीं ज्यांचा संबंध आलेला असतो त्यांनीं स्मृतीवरून लिहिलेले ग्रंथ स्मृति होत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वक्त्याचें भाषण त्याच वेळीं लिहून घेतलेलें श्रुतिरूप आहे. त्यांत पुष्कळ ठिकाणीं गोष्टी सुटलेल्या असतात. निरनिराळे रिपोर्टर निरनिराळे मुद्दे टिपून घेतात हें प्रसिद्धच आहे. पण सर्वांची एकवाक्यता असते आणि सर्वांस एकत्र करून भाषण ठरवावयाचें असतें. त्याचप्रमाणें विद्वान् श्रोते घरीं जाऊन वक्त्याविषयीं माहिती असलेले त्याविषयीं जें नंतर प्रतिपादन करतात त्या स्मृत्या होय. त्यांत भेद दिसला तरी एकवाक्यतेनें त्यांवरून जो निष्कर्ष निघेल तो धर्म हें सांगावयास नकोच. तेव्हां श्रुति व स्मृति असे दोन प्रकारचे ग्रंथ प्रत्येक धर्मांत आहेत त्याप्रमाणें हिंदुधर्मांत आहेत. किंबहुना "श्रुतिस्मृतिविरोधे श्रुतिर्बलीयसी" हाच नियम प्रत्येक धर्मांत आहे आणि तो युक्तहि आहे. प्रसंगवशात् असा विरोध आला तर प्रत्यक्ष ऐकून त्याच वेळीं लिहिलेले रिपोर्ट अधिक विश्वसनीय आहेत; मागाहून लिहिलेले रिपोर्ट त्यापेक्षां कमी किंमतीचे होत. पण जेथें विरोध नाहीं तेथें श्रुतींचाच आशय स्मृति सांगतात किंवा श्रुतींत जें राहून गेलें आहे तें स्मृति सांगतात आणि ते प्रमाणच मानलें पाहिजे असें सर्व धर्मांत आहे. कुराणांत नसलेले हदीसमध्यें सांगितलें आहे तें प्रमाण मानलें पाहिजे. जैमिनिसूत्रांत स्मृतींनाप्रामाण्य श्रुत्यनुरोधानें आहे असें जें ठरविलें आहे तें योग्य आहे.

याप्रमाणें प्रत्येक धर्माला अपौरुषेय-प्रमाण ग्रंथ दोन प्रकारचे मानावे लागतात आणि हिंदुधर्मांत श्रुति आणि स्मृति यांना असेंच प्रामाण्य मानलें आहे. यास शब्दप्रमाण म्हणतात. ईश्वरी सामर्थ्य

असलेल्या ऋषींचीं हीं वचनें असून त्यांना स्वतःसिद्ध प्रामाण्य आहे. जसें हल्लींचे कायदे मानवी संस्थांनीं निर्माण केलेले प्रमाण आहेत पण ते बदलूं शकतात त्याप्रमाणें श्रुतिस्मृतींचें प्रामाण्य नाहीं. तीं वचनें कोणाहि मानवी संस्थेस बदलतां येणार नाहींत. नवी स्मृति पाहिजे असें जें कांहीं 'सुशिक्षित' म्हणतात, त्याचा अर्थच त्यांना कळत नाहीं. **स्मृति** शब्द अपौरुष प्रामाण्याचा ग्रंथ अशाच अर्थानें वापरणें शक्य आहे. नवी स्मृति होणार कशी? कोण अतींद्रिय ज्ञानवान् पुरुष आतां उत्पन्न होणार आहे किंवा या प्रगतीच्या विसाव्या शतकांत मानला जानार आहे? दयानंदास अशा प्रकारचा ऋषि आर्यसमाजी मानतात आणि ते लोक त्याच्या ग्रंथास स्वतःप्रमाण समजतात हें खरें आहे व योग्य आहे. सनातन हिंदुधर्मी लोक कलियुगांत कोणीहि ऋषि उत्पन्न होणार नाहीं, असेंच समजतात. एके प्रसंगीं एका वक्त्यानें "धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे" या गीतेच्या वचनाचा आधार घेऊन असें विचारलें कीं येथें स्पष्ट भगवंताचें **प्रत्येक** युगांत धर्म सांगण्यासाठीं मी अवतार पुनःपुन्हा घेईन असें आश्वासन आहे, तेव्हां नवा क़रार वारंवार येईल. बुद्ध, येशू, महंमद, दयानंद नवे करार सांगणारे आले तसा हिंदु धर्मांतहि कोणी नवी स्मृति सांगणारा येईल." पण त्यास मीं या वचनाचा अर्थ समजावून हा विषय विशद केला. 'धर्मसंस्थापना' याचा येथें अर्थ नवीन धर्म सांगणें नव्हे तर धर्माला **ग्लानि** येते म्हणजे कृतयुगारंभीं सांगितलेला धर्म सुटून भलताच धर्म चालू लागतो तेव्हां धर्माच्या पुन्हा **सम्यक्** स्थापनेसाठीं मी अवतार घेतों असें भगवंताचें येथें आश्वासन आहे. हिंदुधर्म श्रुतिस्मृति न बदलणाऱ्या आहेत असेंच सांगतो. भगवंतानें येथें तेंच सांगितलें आणि वस्तुतः श्रीकृष्णानें गीतेंत नवीन धर्म उपदेशिला नाहीं. अशी कल्पना होऊं नये. म्हणून

पुढें स्पष्टपणें " इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम " प्रारंभीं हा **अव्यय** न बदलणारा शाश्वत योग सूर्याला मीं सांगितला तो मध्यंतरीं नष्ट झाला म्हणून **तोच** मी पुन्हा सांगतों असें म्हटलें आहे. तात्पर्य, सनातन हिंदुधर्म नवी स्मृति होईल किंवा होऊं शकेल असें कधींहि मानीत नाहीं. स्मृतिवचनांचा अर्थ कोठें भलताच समजला जाऊन भलता आचार पडला असेल तर तो अर्थ नीट समजावून तुम्हांस नवीन आचार सांगतां येईल, पण स्मृतिवचन खोडून दुसरें वचन करतां येणार नाहीं. तात्पर्य, स्मृत्यर्थसारासारत्वावर नवीन **निबंध** ग्रंथ तुम्हांस करतां येईल; पण याज्ञवल्क्य–स्मृतीसारखी नवी **स्मृति** करतां येणार नाहीं. स्मृति करणें म्हणजे बाजारांतून कापड आणून आपल्या वाढलेल्या अंगाचा बेतून नवा कोट तयार करण्यासारखें नाहीं. स्मृति शब्दांतच कोणातरी अलौकिक दृष्टि असणाऱ्या ऋषिची आठवण असा अर्थ अभिप्रेत आहे. पटेल, बोस, सारडा वगैरे लोक अशा सामर्थ्याचे आहेत असें सनातन हिंदुधर्मी मानणार नाहींत. अलौकिक सामर्थ्याचे व अतींद्रिय ज्ञानाचे ऋषि वाटेल तेव्हां उत्पन्न होत नाहींत. किंबहुना वर सांगितल्याप्रमाणें कलियुगांत कोणीहि अशा सामर्थ्याचा पुरुष निर्माण होणार नाहीं असा आमचा सिद्धान्त आहे आणि तो कोणत्याहि सुशिक्षित बुद्धिमान मनुष्यास पटणाराहि आहे. तेव्हां नवीन निबंध पाहिजे, नवीन सारडा–**ॲक्ट** पाहिजे इत्यादि भाषा ठीक आहे. पण नवी स्मृति पाहिजे हें वाक्य असंबद्ध आहे.

' नवीन स्मृति पाहिजे ' या म्हणण्याच्या पोटीं आक्षेपकांची एक कल्पना अशी असते कीं, महाभारत इ. स. पू. ३०० सुमारें झालें. मनुस्मृति इ. स. पू. पहिलें शतक. याज्ञवल्क्य इ. स. पांचवें शतक, देवलस्मृति इ. स. आठवें शतक सिंध देशांत मुसलमानांनीं प्रलय

करून अनेकांस जबरदस्तीनें मुसलमान केलें त्या वेळीं—अशा लोकांस पुन्हां शुद्ध करून घेतलें त्या वेळीं—झालेली; असें स्मृत्यांचें ऐतिहासिक काळ संशोधकांनीं ठरविले आहेत. तेव्हां या काळाच्या भिन्न परिस्थितीस अनुरूप नवीन धर्म सांगणारा या कलियुगांतच आला पाहिजे; जसें वरील ग्रंथकर्ते या कलियुगांतच झाले तसा हाहि नवीन स्मृतिकर्ता होईल. पण वरील काळांचीं अनुमानें ऐतिहासिक आहेत आणि तींहि निश्चित नाहींत हें प्रथम सांगितलें पाहिजे. ऐतिहासिक अनुक्रम धर्मशास्त्रांत घेतां येत नाहीं. धर्मशास्त्रांत व्यास,याज्ञवल्क्य, देवल वगैरे ऋषि कलियुगांपूर्वीं झाले असें मानलें जातें. तें कां मानलें जातें याचें कारण प्रारंभीं सांगितलेंच आहे. श्रुति ईश्वरप्रणीत आहे किंवा येशूचें वचन ईश्वर—पुत्राचें आहे या विधानास तात्त्विकदृष्ट्या जरी कोणी आक्षेप घेतला तरी तीं विधानें धर्मविचारांत गृहीत धरलींच पाहिजेत. दुसरें असें कीं, धर्मशास्त्र सांगणारा देवल हा आठव्या शतकांत जरी ग्रंथ लिहितो तरी तो मानवी दृष्टीनें नव्हे तर ईश्वरप्रेरणेनें लिहितो असेंच हिंदुधर्मी लोक मानतात. हल्लींच्या काळांतहि कोणी अशा सामर्थ्याचा व प्रेरणेचा पुरुष आहे असें हजारोंनीं मानलें तर त्याचें वचन स्मृतिवचन होऊं शकेल. पण तें त्या हजारों लोकांना आर्यसमाजीयांनीं दयानंदास असें मानलें आहे. पण सनातनधर्मी हिंदु लोक कलियुगांत असा कोणी उत्पन्न होईल असें मानीतच नाहीं. अर्थात् हिंदुधर्माचें हें एक महान् तत्त्व आहे कीं नवी स्मृति यापुढें होणार नाहीं. चार वेद आणि याज्ञवल्क्योक्त अठरा स्मृत्या यांसच प्रामाण्य आहे. यांच्या जागीं अन्य करार अथवा स्मृति पुढें येणार नाहीं.

नवीन परिस्थितीप्रमाणें नवीन स्मृति पाहिजे या म्हणण्यांतहि कांहीं हंशील नाहीं. परिस्थिति बदलते आणि त्याप्रमाणें नवीन धर्म

पाहिजे असा या आक्षेपकांचा मोठा महत्त्वाचा मुद्दा आहे. पण तो निराधार, तर्कास न पटणारा आहे. आगगाड्यांच्या ऐवजीं विमानें चालूं लागलीं म्हणून धर्मदृष्ट्या परिस्थिति बदलली असें म्हणतां यावयाचें नाहीं. जोंपर्यंत मनुष्यस्वभाव हजारों वर्षांपासून आहे तसाच आहे, राग, द्वेष जोंपर्यंत पूर्वींप्रमाणेंच आहे, मनुष्य आपल्या पुत्रावर प्रीति करतो, दुसऱ्याच्या नाहीं, पुरुषास स्त्री आणि स्त्रीस पुरुष विवाह-निगडित हवा असून व्यभिचाराची जोंपर्यंत चीड आहे, तोंपर्यंत स्थिति बदलली असें म्हणतां येणार नाहीं. तसेंच ईश्वर नाहीं असें जोंपर्यंत सिद्ध झालें नाहीं, आत्मा व परलोक आहे असें जोंपर्यंत मानलें जातें, तोंपर्यंत धर्माचा मूळभूत भाग कसा बदलणार ? तात्पर्य धर्मपरिवर्तनाचें कारण कधींच उत्पन्न झालें नाहीं व होणार नाहीं; आणि म्हणूनच धर्म शाश्वत आहे व शाश्वत मानला पाहिजे हें उघड आहे.

धर्माचा मुख्य संबंध पारलौकिक विषयांशीं आहे हें वर आलेंच आहे. धर्मग्रंथांत ऐहिक गोष्टींविषयीं जे उल्लेख व नियम असतात ते आनुषंगिक आहेत आणि त्यासंबंधीं परिस्थिति बदलते ही गोष्ट मान्य केली पाहिजे. यासाठींच स्मृतिग्रंथांतून, अदालती न्याय, अपराध, देणें घेणे वगैरे बाबतींचे नियम असतात ते बदलण्यास हरकत नाहीं. किंबहुना हल्लीं इंग्रजसरकारच्या राज्यांत ते बदलले आहेत. त्याबद्दल हिंदुधर्मीयांनीं कधीं हरकत घेतली नाहीं. कारण हे धर्मसंबंधाचे नियम नाहींत. पण कांहीं बाबतींत धर्म आणि व्यवहार या दोहोंचा संबंध येतो. कांहीं गोष्टी निव्वळ पारलौकिक आणि कांहीं निव्वळ ऐहिक असतात; पण कांहीं पारलौकिक व ऐहिक अशा असतात. मुख्यतः विवाहसंस्था आणि वारसाचे नियम हे अशा द्विविध प्रकारचे मानले गेले आहेत आणि यांचा समावेश, कायद्याच्या भाषेनें बोलावयाचें तर

'वैयक्तिक कायदा 'या सदरांत होतो. या बाबीसंबंधानेंच मुख्यतः नव्या स्मृतीची आवश्यकता नव्या संस्कृतीच्या लोकांस भासते. खिस्त्यांचा Personal Law त्यांच्या बायबलांत सांगितला आहे आणि मुसलमानांचा त्यांच्या कुराणांत. अर्थात हिंदूंचा Personal law वैयक्तिक कायदा त्यांच्या स्मृत्यांत सांगितलेला आहे हा कांहीं वेडेपणा नव्हे. आणि हिंदूंनीं इंग्रजांस आपला स्मृत्युक्त कायदा बदलण्यास अधिकार दिला नाहीं हेंहि इतर धर्मांप्रमाणेंच झालें आहे. इंग्रजी राज्यकर्त्यांनींहि शहाणपणानें व समतोल बुद्धीनें प्रत्येक-धर्मीयांस आश्वासन दिलें आहे कीं तुमचा विवाहादि वैयाक्तिक्त कायदा तुमच्या धर्मशास्त्राप्रमानें चालवूं. आणि याच कारणानें अदालतींतून हिंदु लॉ, हिंदु स्मृत्यादि धर्माप्रमाणें चालतो. ही स्थिति बदलून विवाहादि संबंधात नवी स्मृति लागू करण्याची या नवीन दृष्टीच्या लोकांची आकांक्षा आहे. बालविवाहानें प्रजा फार निःशक्त होते अशा सबबीवर सारडा कायदा धर्मशास्त्रांत हात घालीत आहे. यासंबंधानें या लोकांस हिंदुधर्मानें स्पष्ट बजाविलें पाहिजे कीं हिंदुधर्मांत इतर खिस्ती, मुसलमानी वगैरे धर्माप्रमाणें विवाह 'Sacrament' 'पवित्र धर्मविधि' मानला आहे. 'Contract' केवळ मानवी करार नाहीं. अर्थात् या संबंधानें कोणताहि फेरबदल करणें धर्मबाह्य आहे. धर्मशास्त्र—वचनानेंच कोर्टांत न्याय झाला पाहिजे. नवे कायदे करणें अन्याय्य आहे. कुराणाच्या आज्ञेंत हात घालण्याची गोष्टसुद्धां मुसलमानांस खपत नाहीं, म्हणूनच मुसलमान लोक बलवान् आहेत; आणि हिंदु लोक अत्यंत दुर्बल धर्मभावनेचे असल्यानें दुर्बलच आहेत.

नवीन दृष्टीच्या लोकांस जसा हा उपदेश करणें जरूर आहे तसा जुन्या दृष्टीच्याहि लोकांस एक इषारा देणें येथें प्राप्त आहे. हिंदुधर्मांत धर्मग्रंथ अनेक आहेत, यामुळें धर्माला दुर्बलता आहे हें प्रारंभीं सांगि-

तलेंच आहे, पण या संख्येंत केवळ अंधश्रद्धेनें आणखी भर टाकणें अहितकारक आहे. श्रुति ( चार ) आणि स्मृति ( अष्टादश याज्ञवल्क्योक्त ) यांचें प्रामाण्य मानलेंच पाहिजे. पण उपस्मृत्या किंवा निबंधोक्त अनुपलब्ध स्मृतिवचनें स्वत:प्रमाण मानणें म्हणजे वाटेल त्यानें वाटेल तें संस्कृत वाक्य बनवून स्मृति–वाक्य म्हणून पुढें करण्यास सन्धि देणें आहे. अमुक वाक्य अमुक स्मृतींत आहे कीं नाहीं असा वाद उपस्थित झाल्यास त्या स्मृती ग्रंथास अलवरसारख्या प्राचीन प्रसिद्ध ग्रंथसंग्रहांतून आणून पाहून निश्चय करावा. वाटेल तें वाक्य मानूं नये. तसेंच पुराणांस स्वत:प्रमाण किंवा आर्षेय प्रमाण मानूं नये. कारण पुराणांची प्रवृत्ति वंशउत्पत्ति इत्यादि सांगण्यासाठीं आहे धर्मशास्त्र सांगण्यासाठीं नाहीं. ‘ श्रुतिः स्मृतिः सदाचारः ’ इत्यादि याज्ञवल्क्य वचनांत त्यांचें नांव नाहीं. ‘सदाचार’ या शब्दांत त्यांचा अन्तर्भाव केल्यास स्मृतिविरोधे पुराणांस प्रामाण्य नाहीं हें प्राप्तच आहे. जेथें स्मृत्या कांहीं सांगत नाहींत तेथें पुराण घ्यावयाचें आहे. वरील दोन्ही गोष्टी सोडल्या तरी निबंधग्रंथांचे जे कित्येक अन्धश्रद्धावान् शास्त्री प्रामाण्य मानतात, तें तर बिलकुल मानता येत नाहीं. निबंधकार म्हणजे एक शास्त्री आहे. त्याचे मत स्मृतिवचनावरून जें पुढें आलें आहे तें योग्य नाहीं असे प्रतिपादन करण्याचा अधिकार कोणासहि आहे. निर्णयसिंधूमध्यें अमुक एक मत दिलें आहे म्हणून तें मानलेंच पाहिजे असा खरा सनातन–धर्मवादी आग्रह धरणार नाहीं. ‘स्मृति–वचनां’वरून दुसरा शास्त्रार्थ होऊं शकत असेल तर हिंदुधर्मीयांनीं जरूर मानावा. अशा प्रकारें डोळे मिटून जुन्यास चिकटून बसणें गैर आहे. स्वतः प्रमाण ऋषिवचनांची मर्यादा स्मृत्यापर्यंत आहे. दयानंदानें वैदिक संहितेपर्यंतच मानली, यामुळें त्यांचें मत हिंदु पण सनातनी हिंदुधर्माचें नव्हे. असो तर, वाटेल तें संस्कृत

वाक्य निबंधग्रंथांतील प्रमाण असा आग्रह वेडेपणाचा आहे. प्रारंभीं सांगिल्याप्रमाणें प्रथम धर्मप्रवर्तकाचे किंवा त्याच्या निकटवर्ती अनुयायांचें वाक्य अर्थात् श्रुतिस्मृति याना स्वतःप्रामाण्य आहे, एवढाच हिंदु धर्मीयांचा इतर धर्मीयांप्रमाणें सिद्धान्त आहे. आणि बहुतेक खिस्ती ज्याप्रमाणें येशूच्या नव्या करारानंतर दुसरा करार येणार नाहीं असें मानतात, त्याचप्रमाणें हिंदुधर्मीय लोक नवी स्मृति होणें शक्य नाहीं असेंच मानतात. श्रुतींत चाऱ्ही वेदांच्या संहिता आणि ब्राह्मणें व स्मृति शब्दांत गृह्यसूत्रें, धर्मसूत्रें, महाभारत आणि अष्टादश स्मृत्या यांचा अन्तर्भाव होतो अशी स्पष्ट मर्यादा आहे. इतर पुराणादि ग्रंथांचीं वचनें स्वतः प्रमाण नाहींत म्हणजे मानलींच पाहिजेत असें नाहीं. विवाह, दाय, पालक इत्यादि बाबतींत वरील श्रुतिस्मृतींतून निघणारे नियम ऐहिक सुखालाहि कारण आहेत ही गोष्ट शेवटीं आणखी सांगितली पाहिजे. हिंदुधर्म ऐहिक व पारमार्थिक दोन्ही कल्याणांचा विचार करतो ही गोष्ट उताळू धर्मसुधारकांनीं लक्षांत ठेवावी. याविषयीं विस्तारानें चर्चा करणें येथें शक्य नाहीं.

---

## ८ प्रार्थनेनें कुदरत बदलते काय ?

### ( अर्थात् चमत्काराची मीमांसा )

अमेरिकेंतील खिस्ती धर्मोपदेशकांस विचारलेल्या प्रश्नांपैकीं हा शेवटचा प्रश्न आहे, व तो प्रश्न सर्व धर्मांत उपस्थित होतो. या पूर्वीचा एक प्रश्न असा आहे कीं येशूच्या फांशीनें मनुष्याचे गुन्हे माफ झाले काय? हें खरें. पण तो केवळ खिस्ती धर्माचा आहे, अन्य

धर्मांत येत नाहीं. परमेश्वरानें आदम आणि ईव्ह हें मनुष्याचें जोडपें उत्पन्न करून त्यांस ईडनच्या बागेंत सर्व सुखांत ठेविलें. पण ईव्हनें ईश्वराच्या आज्ञेविरुद्ध ज्ञानवृक्षाचें फळ सैतानाच्या चिथावणीनें खाल्लें, तेव्हां ईश्वरानें त्यांस दुःखमय संसारांत लोटून दिलें. ईव्हच्या पापांमुळें पुढची मनुष्य--प्रजा, ईव्हपासून उत्पन्न झाल्यानें, जन्मतः पापी आहे असा सिद्धान्त ख्रिस्ती धर्मांत मान्य झाला आहे. या मनुष्याच्या जन्मतः पापाबद्दल येशूनें मरणान्त प्रायश्चित्त घेतल्यानें मनुष्याचे सर्व गुन्हे माफ झाले असें आणखी ख्रिस्ती धर्माचें मत आहे. अर्थात् येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, ईव्हच्या पापामुळें तिची प्रजा जन्मतः पापी आहे काय? आणि एकाच्या पापाबद्दल दुसऱ्यानें प्रायश्चित्त घेतलेलें चालेल काय? कांहीं रोग (अर्थात् पाप) आईबापांपासून प्राप्त होतात तसेंच एकाच्या दंडाबद्दल दुसऱ्यानें दंड दिलेला चालतो हें आपण संसारांत पाहतों. पण परमेश्वराच्या न्यायी अमलांत असें चालावें कीं काय? असा हा प्रश्न आहे. साहजिकच नकारार्थी उत्तरें जास्त म्हणजे ६१ आलीं आणि होकारार्थी कमी म्हणजे २९ आलीं. १० तटस्थ राहिले. हिंदुधर्मानें कर्मसिद्धान्त मानल्यानें प्रत्येक जीव आपल्या संचित व क्रियमाण स्वकर्मानें बद्ध आहे, म्हणजे दुसऱ्याचें कर्म त्यास बाधूं शकत नाहीं; अर्थातच त्यास सोडवूंहि शकत नाहीं असें हिंदुधर्माचें या प्रश्नावर मत आहे. तेव्हां या प्रश्नाबद्दल जास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं. पण कुदरत म्हणजे सृष्टीचे नियम किंवा तिची गति, ज्या वेळेस आपल्यावर संकट येतें त्या वेळेस मनुष्य ईश्वराची प्रार्थना करितो आणि त्या संकटापासून मुक्त होण्याचा प्रयत्न करतो, त्या वेळेस, बदलूं शकते काय? हा प्रश्न सर्व धर्मांत सारखाच उपस्थित आहे. एक उदाहरण घेऊं. ज्ञानेश्वरानें

सच्चिदानंद बाबा यांस ते मृत झाले असतांहि त्यांच्या कुटुंबाच्या विलापानें दयार्द्र होऊन, जिवंत केलें अशी कथा आहे तेव्हां ज्ञानेश्वरांच्या ईशप्रार्थनेनें मेलेला मनुष्य जिवंत होऊं शकतो काय? येशूनें डोळे गेलेल्या एका आंधळयास डोळस केलें व समुद्रांत बुडत असलेल्या एका तारूस तुफान शांत करून वांचविलें इत्यादि चमत्कारांचें बायबलांत वर्णन आहे. येथें कदाचित् कोणी असें म्हणूं शकेल कीं कुदरतीनें म्हणजे सृष्टिव्यापारानें घुटमळणारा पण न गेलेला जीव पुन्हां आलासा वाटला, डोळे त्यांत बोटें फिरविल्यानें बरे झाले, किंवा वादळ आपोआप शांत झालें, येथें कुदरत बदललीच नाहीं. पण ज्ञानेश्वरानें रेड्याकडून वेद म्हणविला किंवा येशू पाण्यावर चालत गेला येथें स्पष्ट कुदरत बदलली असेंच म्हणतां येतें. तेव्हां असा चमत्कार परमेश्वराच्या प्रार्थनेनें होतो काय हा प्रश्न आहे. किंबहुना हिंदुधर्मानें कर्मसिद्धान्त मानला आहे त्याप्रमाणें जें कांहीं मनुष्याच्या आयुष्यांत होतें तें प्राक्तन कर्माप्रमाणें होणारच असें जर ठरलें आहे तर जपजाप, अनुष्ठानें किंवा परमेश्वराचा धांवा करण्यापासून प्राक्तनकर्मानें होणारी गोष्ट कशी बदलणार? ( येथें चमत्कारच झाला पाहिजे असें नाहीं; कारण निरानिराळया आपत्ति कुदरतीप्रमाणेंच येणाऱ्या कशा टळणार? ) असा प्रश्न उपस्थित होतो; पण तो उत्तर देण्यास कठिण नाहीं. कारण पूर्वीं आपण असें उत्तर दिलेंच आहे कीं प्राक्तन काय आहे हें वृत्त घडण्यापूर्वीं आपणांस ठाऊक नसल्यानें प्रयत्नवाद सिद्ध आहे आणि अशा प्रयत्नांत ईश्वराची प्रार्थना हा एक सर्व धर्मांत मान्य केलेला प्रयत्न आहे, तेव्हां तुम्ही ईश्वराची प्रार्थना कराल आणि नंतर, येणार असें वाटत असलेली, आपत्ति टळणार असेंच तुमच्या प्राक्तनांत असल्याचें कां मानूं नये? असो, हें उत्तर जरी योग्य असलें तरी ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष कुदरत सृष्टिनियम बदललेले

वर्णिले आहेत त्या ठिकाणीं ते बदलूं शकतात काय, असा हा प्रश्न महत्त्वाचा आहे आणि हल्लींच्या भौतिक शास्त्रांच्या प्रगतीच्या काळांत पाणी बुडवीत नाहीं किंवा अग्नि जाळीत नाहीं असें कधीं होणार नाहीं, वाटेल तशा प्रार्थनेनें किंवा वाटेल त्या महान् साधूच्या आशीर्वादानें हें होणार नाहीं असाच सिद्धान्त बहुतेक सर्वत्र मान्य झाला आहे. अर्थात् या प्रश्नावर "कुदरत बदलतच नाहीं' असें शंभरापैकीं ५७ खिस्ती धर्मोपदेशकांनीं मत दिलें. 'बदलते' असें २१ नीं दिलें आणि २२ तटस्थ राहिले, यांत आश्चर्य नाहीं. या संबंधांत हिंदुधर्मानें काय मानलें आहे हें आपल्यास पाहणें आहे. या प्रश्नासंबंधें पूर्वीं विविधज्ञानविस्तारांत मीं दोन लेख प्रसिद्ध केले होते, एका व्याख्यानाच्या आधारें प्रसिद्ध केलें होतें तेंच येथें मी देतों. त्यांत या प्रश्नाची विस्तारपूर्वक चर्चा केली असून चमत्कार होणें शक्य आहे कीं नाहीं म्हणजे कुदरत बदलणें शक्य आहे काय आणि शक्य असेल तर त्याची उपपत्ति काय? या दोन प्रश्नांसंबंधीं विवेचन केलें आहे तेव्हां हे दोन लेख येथें दिले असतां कार्यभाग होईल.

## १ चमत्कारांची शक्यता.

परमेश्वरानें निर्माण केलेल्या या निसर्गनियमबद्ध सृष्टींत चमत्कार होतात कीं नाहींत, होत असतील तर ते कसे होतात आणि त्यांची उपपत्ति काय हा प्रश्न प्रत्येक साशंक व चौकस मनुष्याच्या मनापुढें नेहमीं उभा राहतो. पाश्चात्य भौतिक शास्त्रांची माहिती थोडी तरी ज्या मनुष्यास आहे त्यास बहुधा चमत्कार म्हणजे एक थोतांड आहे असेंच वाटतें. पण भौतिक शास्त्रांची माहिती नसलेल्या मनुष्यासहि, जर तो जगताच्या व्यवहाराकडे चाणाक्ष दृष्टीनें पाहणारा

असेल, तर जगताच्या रहाटीच्या विरुद्ध कधीं तरी कांहीं गोष्टी होत असतील हें असंभनीय वाटणें साहजिकच आहे. असें असून प्रत्येक काळांत, प्रत्येक देशांत, प्रत्येक धर्मांत चमत्कारांच्या गोष्टी झाल्या असल्याबद्दल दंतकथा किंबहुना ऐतिहासिक दाखले उपलब्ध आहेत व त्यांजवर हजारों लोकांचा विश्वास आहे. हा विश्वास केवळ भ्रम आहे काय? ही शंका सन्मान्य व विचारार्ह आहे. अमुक एक कल्पना सार्वत्रिक किंवा लाखों लोकांच्या डोक्यांतील आहे म्हणून ती खरीच असली पाहिजे असें नाहीं. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते ही गोष्ट अलीकडे सिद्ध झाली असून यापूर्वीं हजारों वर्षे सार्वत्रिक समज असाच होता कीं, सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरतो. पण हा सार्वत्रिक समज भ्रममूलक होता, याजबद्दल आतां कोणासहि शंका उरली नाहीं. सारांश, सर्व किंवा लाखों मनुष्यांच्या डोक्यांत एखादी कल्पना उत्पन्न होणें हें त्या कल्पनेच्या सत्यतेचें प्रमाण नव्हे. यासाठीं चमत्कार होतात कीं नाहीं व होव असतील तर ते कां व कसे होतात, हें एक मोठें गूढ आहे, व या गूढाचा विचार आपल्यास ऐतिहासिक आलोचनानें व प्रतिष्ठित तर्कास युक्त किंवा अयुक्त या दृष्टीनें शांतपणें केला पाहिजे.

या विषयाचा साग्र विचार पाश्चात्य पंडितांनीं केला आहे, ही गोष्ट आपल्यास फायदेशीर आहे. चमत्कारांच्या गोष्टी हिंदुस्थानांतच किंवा पौर्वात्य देशांतच जर रूढ असत्या तर पाश्चात्य देशांतील तत्त्ववेत्त्यांनींसुद्धां 'Eastern mendacity' व 'Eastern superstition' म्हणजे प्राच्य लोकांचा खोडसाळपणा व प्राच्य लोकांचा भोळसटपणा ह्या सदरांखालीं तेव्हांच त्या निकालांत काढल्या असत्या. पण सुदैवानें म्हणा किंवा दुर्दैवानें म्हणा, चमत्कारांच्या गोष्टी पाश्चात्य देशांतहि प्रचलित आहेत. इतकेंच नव्हे तर जो ख्रिस्ती धर्म पाश्चात्य

राष्ट्रांनीं अंगीकारिला आहे, त्याच्या ऐन मुळाशींच चमत्कार असल्यानें त्यांस चमत्कार मान्य करावे लागले आहेत. यासाठीं चमत्कार कसे होतात, या प्रश्नाचा विचार त्यांनीं आपल्या नेहमींच्या कुशाग्र बुद्धिमत्तेनें केला आहे. या प्रश्नासंबंधीं पाश्चात्यलोक व आम्ही, इंग्रजी भाषेनें बोलावयाचें तर, एका बोटींत बसलों आहों. ख्रिस्ती धर्माचे अभिमानी कांहीं म्हणोत, माझ्या मतें तरी ते व आम्ही या बाबतींत समस्थितींत आहोंत; आणि बुडूं तर दोघे एकदमच बुडूं, अशी या प्रश्नाची स्थिति आहे. अशा परिस्थितींत पाश्चात्य विद्वानांनीं या प्रश्नासंबंधानें जो विचार केला आहे तो आपल्यास उपयुक्त व मननीय आहे. या विषयाचा त्यांनीं अनेक वर्षांपासून सांगोपांग ऊहापोह केला असून तो अनेक विद्वानांच्या ग्रंथांत पाहावयास सांपडतो. अलीकडच्या काळापर्यंत या विषयावर त्यांच्या काय काय कल्पना झाल्या आहेत हें कोणास पाहणें असेल, तर Miracles अथवा चमत्कार या शब्दाखालीं दिलेला Encyclopædia Britannica या जगन्मान्य पुस्तकांतील लेख पहावा. असो, पाश्चात्यविद्वानांच्या चर्चेचा व आपल्या इकडील प्राचीन ग्रंथांतील चर्चेचा समन्वय करून या विषयासंबंधें माझीं मतें काय आहेत हें मी या लेखांत आपल्या धर्मबांधवांपुढें मांडण्याचा प्रयत्न करीत आहें.

प्रथमदर्शनीं ही गोष्ट नमूद व कबूल करावी लागेल कीं चमत्कारांसंबंधानें ज्या गोष्टी आपण इतिहासांत वाचतों किंवा प्रत्यक्ष पाहतों किंवा कर्णोपकर्णी ऐकतों, त्यांत शेंकडा नव्याण्णव नसल्या तरी नव्वद गोष्टी खोट्या किंवा भ्रममूलक असतात. ही स्थिति आपल्या इकडेच नसून सर्व देशांची व लोकांची आहे. याचा दोष प्राच्य लोकांवरच लादण्यासारखा नसून तो सर्व मनुष्यजातीवरच लादला पाहिजे व लादणें शक्य आहे. Human mendacity आणि

Human sperstition हींच कारणें या दोषांच्या मुळाशीं आहेत असें मानण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. शेंकडा पन्नास माणसें वाईट असा एक ठोकळ तर्क केला, तर पन्नास वाईट माणसांपैकीं पंचवीस भोळीं व पंचवीस लबाड असतात. भोळ्या माणसांच्या भोळसर-पणाचा फायदा घेऊन आपलें पोट भरणारे शेंकडा पंचवीस लोक प्रत्येक समाजांत व देशांत सांपडतील व यामुळें साधु अथवा सिद्ध यांचा यत्किंचित्‌हि दोष नसतां साधकांचा लोभ व शिष्यांचा भोळ-सरपणा या दुहेरी पायांवर चमत्कारांच्या हजारों इमारती उभारल्या गेल्या आहेत, ही गोष्ट प्रांजलपणें कबूल केली पाहिजे. अशा प्रका-रची स्थिति पाश्चात्य देशांतहि आहे; निदान होती यांत शंका नाहीं. ख्रिस्ती धर्माचा इतिहास वाचला म्हणजे किती तरी चमत्कारांच्या खोट्या गोष्टी स्वार्थी लोकांनीं भाविक लोकांच्या फसवणुकीसाठीं बनविल्या हें पाहून आश्चर्य वाटतें. हिंदुस्थानांतील लोकांपेक्षांहि पाश्चात्य देशांतील बाराव्या तेराव्या शतकांतील लोक अज्ञानी व भोळसर होते असें दुर्दैवानें म्हणावें लागतें. एक ग्रंथकार लिहितो:—

'It is confessed that the mediæval records contain a vast mass of false and spurious miracles, so vast indeed that those who wish to claim credence for some particular ones, virtually abandon the great body as indefensible ( Mozely on Miracles ). म्हणजे, " मध्यकाळांतील लेख खोट्या व काल्पनिक चमत्कारांनीं भरलेले आहेत, इतके कीं, त्यांपैकीं कांहीं खरे आहेत, असें म्हणणारांस सुद्धां सर्वच असमर्थ-नीय म्हणून सोडून देणें भाग पडतें. " ( मॉझले ऑन मिरॅकल्स ). अशा प्रकारचे खोटे चमत्कार तिकडे बनविले गेले याचीं दोन कारणें या ग्रंथकारानें दाखविलीं आहेत तीं येथें नमूद करण्यासारखीं

आहेत. सर्व खिस्ती लोकांवर धार्मिकच नव्हे तर राजकीय सत्ताहि पोपांना आहे, असें मत प्रस्थापित करण्यासाठीं पोपांच्या अशा मताच्या अभिमानी अनुयायांनीं खोटे चमत्कार घडवून आणिले आहेत. सत्तेची प्रबल इच्छा मोठमोठ्या सन्मान्य मनुष्यासहि सन्मार्गापासून कशी च्युत करते याचे अनेक मनोरंजक दाखले आपल्यास पोपांच्या इतिहासांत सांपडतात. दुसरी गोष्ट अशी कीं कोणताहि सेंट अथवा संत ( हे दोन्ही शब्द आर्यभाषांतील असून एकवर्णी व एकार्थी आहेत ) म्हटला म्हणजे त्याच्या हातून चमत्कार झालेच पाहिजेत अशी तिकडील लोकांची समजूत होती. Canonisation अथवा संतमालिकेंत नांव पडणें हें संताच्या अंगीं चमत्कार करण्याचें सामर्थ्य होतें की नाहीं या गोष्टीवर अवलंबून असे; आणि यामुळें ठिकाठिकाणच्या पूज्य व मान्य असलेल्या संतांविषयीं खोट्या चमत्कारांच्या गोष्टी बनविल्या जात किंवा कल्पिल्या जात. वर दिलेलीं दोन्ही कारणें सर्व देशांतील लोकांस व त्यांतहि हिंदुस्थानास लागू आहेत हें चाणाक्ष वाचकांस निराळें सांगावयास नको. सदाचरण, भूतदया, आत्मनिग्रह इत्यादि सद्गुणांसच भुलून बहुतेक जनसमाज संतांच्या चरणीं लागत नाहीं, तर संतांच्या आशीर्वादांत कांहीं तरी अलौकिक सामर्थ्य आहे अशा प्रकारच्या कल्पनेनेंच लोक संतांच्या दर्शनास जातात व त्यांस पूजितात हें आपण इकडेहि पाहतों. कांही तरी अद्भुत शक्ति अंगीं असेल तरच तो संत असें बहुजनसमाजास वाटतें आणि यामुळेंच एखाद्या खरोखर सन्मान्य संताची थोरवी प्रसिद्ध करण्याच्या हेतूनें साधक लोक चमत्कारांच्या अनेक खोट्या गोष्टी प्रचलित करतात. असो, चमत्कारांच्या खोट्या गोष्टी प्रचलित होण्यास साधकांची लुच्चेगिरी पाहिजेच असें मात्र नाहीं. मनुष्याच्या केवळ भोळसरपणाच्या एकेरी पायावरहि चमत्कारांच्या हजारों

कल्पित गोष्टींच्या इमारती रचल्या जातात हेंहि येथें नमूद केलें पाहिजे. किंबहुना अशाच प्रकारच्या गोष्टी पुष्कळ असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा भोळसरपणा पूर्वेकडील व पश्चिमेकडील, खिस्ती व इतर-धर्मी, सुशिक्षित व अशिक्षित, गतकालीन व आधुनिक, अशा सर्व प्रकारच्या लोकांत दृष्टीस पडतो. तो केवळ मानुष्यकाचा नैसर्गिक दोष आहे. या दोषाच्या मदतीस मनुष्याचे इतर मनोविकारहि येतात हें सहज आहे. पूर्वोक्त ग्रंथकाराच्या पुस्तकांतून आपण आणखी एक उतारा भाषान्तर रूपानें घेऊं.

"याप्रमाणें जिज्ञासा, कल्पकता, दुःख, अगतिकता, आलस्य अशा अनेक मनोविकारांच्या एकीकरणानें मनुष्यास चमत्कारांचा आधार घेण्यास लाविलें आहे. भावि कालाचीं गुह्यें जाणण्याच्या प्रबल इच्छेनें, प्रत्यक्ष जगापलीकडील अविभाज्य जगांत काय चाललें आहे हें पाहण्याच्या लालसेनें, आणि दुर्दैवाचे तडाखे किंवा अपरिहार्य रोग यांच्या दुःखापासून मुक्तता मिळविण्याच्या हेतूनें मनुष्यास या चमत्काराच्या आश्रयाकडे धांव घेण्यास प्रवण केलें आहे. ही चमत्काराकडे धांवण्याची प्रवृत्ति खिस्तीपूर्व लोकांत, खिस्ती लोकांत व भौतिक-शास्त्राभिमानी आधुनिक लोकांत सारखी अव्याहत दिसून येते. खिस्त-पूर्व मूर्तिपूजकांत चमत्कारांचा सारखा प्रवाह भविष्य कथन करणें, भूतें काढणें किंवा इस्क्युलेपियसाच्या देवळांत रोग बरें झालेल्या लोकांचें गर्वोक्तीनें उल्लेख करणें—या स्वरूपानें आपल्यासमोर दृष्टीस पडतो. खिस्तधिर्माच्या प्रसारानंतरहि ह्याच मनुष्यस्वभाच्या नैसर्गिक दोषांनीं हाच चमत्कारांचा क्रम (भविष्य सांगणें, भूतें काढणें, रोग बरा करणें) अव्याहत चालू राहिला. हल्लीं भौतिकशास्त्राचा करडा अम्मल चालू असतांहि मनुष्यस्वभावानें याच भौतिकशास्त्राचा व नवीन तत्त्वज्ञानाचा आधार घेतला आहे; आणि ( चमत्कारांचा चमत्कार हा कीं )

मनुष्याच्या आत्म्याविषयीं एक ऑकल्ट लॉ शोधून काढला गेला असून या अदृश्य नियमाच्या पायावर अदृश्य जगाशीं अगदीं अप्रतिहत व्यवहार सुरू करण्यापर्यंत, सुपरनॅचरॅलिझमची इमारत उभारली जाऊन, त्याची मजल पोंचली आहे. तात्पर्य, मनुष्यस्वभावाचा नैसर्गिक भोळसरपणा जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत सर्व स्थितींत खोट्या चमत्कारांचा प्रवाह सदोदित चालू राहणार हें निर्विवाद आहे. "

असो, ज्या चमत्कारांच्या गोष्टी आम्ही वाचतों, ऐकितों किंवा पाहतों त्या बहुधा बनावट किंवा काल्पनिक असतात हें जर खरें आहे, तर चमत्कार होतच नाहींत असें मानल्यास काय हरकत आहे असा प्रश्न येथें उपस्थित होतो. माझ्या मतें असा सिद्धान्त जर कोणी आपल्या मनाशीं ठाम करील तर तें अन्याय्य किंवा अहितकर होणार नाहीं, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. चमत्कार होत नाहींत, असा सिद्धांत कायम करून मनुष्य व्यवहारांत वागेल किंवा परमार्थांत शिरेल, तर त्यास नुकसान पोंचणार नाहीं; किंवा तो दोषास पात्र होणार नाहीं, हें वरील स्थितीवरूनच निष्पन्न होतें. जर शंभर रुपयांत एखादाच रुपया खोटा लागत असेल तर रुपये व्यवहारांत खरेच मानले पाहिजेत; पण शेंकडा नव्वद रुपये खोटे निघूं लागले, तर व्यवहारांत असे रुपये कोणी हातीं धरणार नसल्यास ते नुकसानकारक होणार नाहीं; किंबहुना त्यास कोणी दोषहि देणार नाहीं. भौतिक शास्त्रांच्या अभिमानानें ग्रस्त असलेल्या पाश्चात्य लोकांनीं प्रायः हाच सिद्धान्त आपल्या मनाशीं ठरविला आहे हें आपल्यास उघड दिसत आहे. या कल्पनेपासून त्यांस कोणत्याहि प्रकारचें नुकसान झालेलें नाहीं. ईशभक्ति व सदाचरण यांस चमत्कारांची मदत पाहिजेच असेंहि म्हणतां येत नाहीं; यामुळें असा सिद्धान्त धर्म अथवा नीति यांच्या दृष्टीनें दूषणार्ह होईल असेंहि म्हणण्यास जागा नाहीं.

ख्रिस्ती धर्माचा अभिमान व वर निर्दिष्ट केलेली पाश्चात्यांची मनोवृत्ति, यांच्या सम्मेलनामुळें तिकडील ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं या बाबतींत एक तोड काढली आहे ती येथें नमूद करण्यासारखी आहे. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, चमत्कार करण्याची शक्ति ईश्वरपुत्र येशू यास होती, हें तर मान्यच आहे; पण त्यानें ती अपॉसल अथवा बारा प्रेषितांसच दिली होती, यामुळें फक्त प्रेषितांच्या काळांतच चमत्कार झाले; पुढें झाले नाहींत किंवा होणें शक्य नाहीं. Apostolic age अथवा प्रेषितांचा काळ संपल्यानंतर जगतांत चमत्कार करण्याची शक्ति राहिली नाहीं, अशी जी तोड पाश्चात्यांनीं काढली आहे ती म्हणजे आपल्यास नवी आहे असें नाहीं. आपल्या इकडेहि कलिकालाची कल्पना आहेच. कलियुगांत देव, ऋषि, मंत्र, सामर्थ्यहीन झाले आहेत, ही कल्पना आपल्या लोकांत प्रसिद्ध आहे. कलियुगाचा पूर्ण अम्मल पांच हजार वर्षांनंतर व्हावयाचा आहे; तीं पांच हजार वर्षें नुकतीच झाली आहेत. इ. स. १९०० हाच कलियुगाचा पूर्ण प्रवृत्तिकाल असें ठोकळपणें धरलें तर विसाव्या शतकापासून चमत्कार होणें शक्य नाहीं, असा आपल्याइकडेहि सिद्धान्त बांधण्यास हरकत नाहीं. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास इत्यादि सर्वमान्य संत यापूर्वी होऊन गेले आहेत. यामुळें 'स्थितस्य समर्थनम्' या दृष्टीनें व इकडे हल्लीं दिसून येणाऱ्या अनेक प्रकारच्या लोकांच्या वेडगळ प्रवृत्ति बंद करण्याच्या हेतूनें, आपल्या इकडील विद्वानांनीं असा सिद्धान्त आपल्या मनाशीं दृढ केला तर तें दूष्य किंवा बाधक होईल असें म्हणतां येणार नाहीं. सारांश, यापुढें चमत्कार होणार नाहींत अशी दृढ समजूत कोणी धरून बसेल तर त्यास माझ्या प्रांजळ मतानें प्रत्यवाय नाहीं.

एवढा जरूरी उपोद्घात करून आपण आपल्या मुख्य विषयाकडे वळूं. हा उपोद्घात आपल्या विषयाच्या उपक्रमाकरितांहि उपयुक्त आहे. चमत्कार हल्लींच्या काळीं होत नाहींत, हें मत जरी व्यवहारदृष्ट्या मान्य व श्रेयस्कर असलें, तरी परमार्थतः विचार करणाऱ्यापुढें असा एक प्रश्न उपस्थित होतो कीं पूर्वकाळीं तरी चमत्कार होत होते काय ? आणि होत होते तर ज्या अर्थीं सृष्टीची रचना मध्यंतरीं बदललेली नाहीं, त्या अर्थीं हल्लीं चमत्कार होणें कां बंद व्हावें ? वरील उपोद्घातावरूनच याप्रमाणें आपला विषय चांगला उपन्यस्त होतो आणि म्हणूनच परमार्थदृष्टीनें या विषयाचा विचार करणें भाग आहे. या विचाराच्या आरंभीं चमत्कार शब्दाची योग्य व्याख्या झाली पाहिजे हें उघड आहे. चमत्काराची पाश्चात्य पंडितांनीं केलेली व्याख्या अशी. सृष्टीच्या ज्ञात निसर्गसिद्ध अथवा अनुभवसिद्ध नियमाच्या विरुद्ध एखादी गोष्ट होणें म्हणजे चमत्कार होय. कार्य दिसतें आणि कारण दिसत नाहीं, अशी एक चमत्काराची व्याख्या होऊं शकेल; पण ती अपुरी आहे. गारुडी रुपया काढतो त्यावेळेस कार्य आपल्यासमोर दिसतें, पण कारण दिसत नाहीं. असें असूनहि हा चमत्कार आहे असें आपण म्हणत नाहीं. कारण ज्ञात नियमाविरुद्ध गारुड्यानें रुपया उत्पन्न केला नाहीं, अशी आपली खात्री असते व गारुड्यासहि ती गोष्ट कबूल असते. सारांश, ज्ञात सृष्टिनियमाविरुद्ध एखादी गोष्ट होण्यांतच चमत्काराचें चमत्कारत्व आहे. येथें ज्ञात शब्द महत्त्वाचा आहे. नियमाविरुद्ध सृष्टींत कोणतीच गोष्ट होत नाहीं, हें उघड आहे, म्हणून चमत्कारहि कांहीं नियमानुसार होतात; पण तो नियम ज्ञात नाहीं. चमत्काराची उपपत्ति लावणें म्हणजेच तो नियम शोधून काढणें होय. ही उपपत्ति जोंपर्यंत सर्वांनुमतें ठरली नाहीं तोंपर्यंत चमत्कार ज्ञातनियमाविरुद्ध होतात ही व्याख्याच मान्य करावी लागेल, हें उघड

आहे. या व्याख्येनें पुष्कळशा गोष्टी ज्या हल्लीं आपणांस चमत्कारशा वाटतात, त्या चमत्कार नाहींत असें ठरतें. चमत्कारांचे नेहमींचे प्रकार म्हटलें म्हणजे पूर्वीं सांगितल्याप्रमाणें भविष्य सांगणें, भूत काढणें आणि रोग बरा करणें हे होत. याशिवाय कित्येक प्रकार आहेत; पण ते याच पंक्तीचे आहेत. पण या गोष्टी खरे चमत्कार नव्हत. तें कसें हें आपण पाहूं. प्रथम रोग बरा करणें हाच प्रकार घेऊं. एखादा रोगी Esculapius म्हणजे ग्रीक लोकांचा अश्विनी-कुमार, याच्या देवळांत नेऊन ठेविला आणि तो औषधाशिवाय बरा झाला, तर हा चमत्कार नव्हे. कारण औषधाशिवाय बरें होणें हें निसर्गनियमाच्या विरुद्ध नाहीं. देहाची प्रवृत्ति रोग बरा करण्याकडेच साधारणतः असते आणि यामुळें अनेक उदाहरणें, मनुष्य औषधावांचून बरा झाल्याचीं आपण पाहतों. बरें, Esculapius च्या देवळांत नेऊन ठेविलेले सर्वच रोगी बरे झाले असते, तर तो त्या देवाचा चमत्कार होय असें म्हणतां आलें असतें. पण जे रोगी देवळांत मेले त्यांची नांवें कोठें लिहिलीं गेलीं आहेत ? ते आपल्या दैवानें अथवा देवाच्या आगळिकेनें अर्थात् आपल्या अपराधानें मेले असा विचार करून भाविक लोक देवावर दोष देत नाहींत. जे. बरे झाले ते मात्र त्या देवानें बरे केले असें समजलें जाऊन त्यांचा दाखला गर्वानें देवळाच्या भिंतीवर नमुद केला जातो. सारांश, जसा आपण साधारण जगांत नियम पाहतों कीं रोगी औषधाशिवाय बरे होतात व कांहीं होत नाहींत, तोच प्रकार Esculapius च्या देवळाचा आहे. यामुळें यांत चमत्कार नाहीं हें उघड आहे. हाच विचार भूत काढ-ण्याच्या गोष्टीस लागू आहे. अगोदर भूतच जर काल्पनिक आहे, तर भूत काढणें साहजिक काल्पनिक आहे. भूतांचें अस्तित्व केवळ कल्पनेंत आहे हें अन्वयव्यतिरेकावरून सिद्ध करतां येईल. ज्या

ठिकाणीं लोकांत भुतें आहेत अशी कल्पना असते त्या ठिकाणीं भूतें असतात. ज्या ठिकाणीं भूतें नाहींत अशी लोकांची दृढ समजूत असते, त्या ठिकाणीं तीं नाहींशीं होतात. भूतांच्या संचाराच्या कल्पना सर्व देशांत, सर्व काळांत, सर्व प्रकारच्या सुशिक्षित व अशिक्षित लोकांत असतात; पण यामुळें त्या खऱ्या असें मानण्याचें कारण नाहीं, हें प्रारंभीं दाखविलेंच आहे. भूतसंचाराचीं सर्व उदाहरणें कपट-मूल किंवा भ्रममूल असतात असें माझें ठाम मत आहे. अनेक लोकांच्या तोंडून अनेक प्रकारच्या भूतसंचाराच्या गोष्टी आपण ऐकतों. हाताला अदृश्य रीतीनें कडकडून चावा घेतलेला दिसणें, कपडे एकाएकीं पेटतात, भांडीं आपोआप अस्ताव्यस्त होतात, एखादें लहान मूल आढ्यावर नेऊन ठेवलें जातें, इत्यादि अनेक प्रकारचे चाळे आपण ऐकितों, किंवा पाहतों; पण अशा गोष्टींत भूतानें आविष्ट केलेल्या बहुधा बायका असतात आणि त्या सर्व प्रकारें आपल्यास पूज्य व सन्माननीय असल्यानें त्यांचें कपट अथवा त्यांचा भ्रम शोधून काढण्याच्या खटपटीस आपण बसत नाहीं, यामुळें आपला अधिक गोंधळ होतो. पण या सर्व गोष्टी मनुष्यानें केलेल्या असतात, त्या भूतचेष्टा नव्हेत, हें पक्कें ध्यानांत ठेविलें पाहिजे; व त्याप्रमाणें शोध केल्यास अनुभव येतो हें कित्येकांच्या पाहण्यांत असेल. कांहीं ठिकाणीं मेंदूचा अथवा मनाचा विक्षेप खरोखरच होऊन मनुष्य भ्रमिष्ट होतो व वेडेवेडे चाळे करतो किंवा मूक वाचारहित होतो; पण तो बरा होणें म्हणजे चमत्कार नव्हे. मनाचा रोग मनाला औषध पोंचल्यानें बरा होतो हें साहजिक आहे. प्रसंगवशात् भावना, भक्ति, सत्समागम, सदुपदेश इत्यादि कारणांनीं मनाचा बिघडलेला कांटा पुन्हां ठिकाणावर बसतो आणि भूतानें आविष्ट झालेला रोगी बरा होतो.

रांतीं दिसून येईल. भविष्य सांगणें हा एक चमत्कार आहे खरा; पण भविष्यरूपानें सांगितलेल्या गोष्टी नेहमींच्या नियमाप्रमाणें घडून येणाऱ्या असल्यामुळें चमत्कारांत घालतां येत नाहींत. एखाद्या साधूनें सांगितलें कीं तुला मुलगा होईल, किंवा तुला बढती मिळेल, किंवा तुझें चोरीस गेलेलें द्रव्य तुला परत मिळेल, किंवा तुझा मुकदमा चालला आहे त्यांत तूं जिंकशील, ( बहुधा असाच आशीर्वाद घेण्याच्या इच्छेनें लोक साधूकडे जातात !!! ) आणि त्याप्रमाणें गोष्टी घडून आल्या तर तो चमत्कार नव्हे; कारण या गोष्टी घडण्याचा प्रकार कोणत्याहि सृष्टीच्या नियमाच्या विरुद्ध नाहीं. मुलगा होणें, बढती मिळणें, चोरी सांपडणें, किंवा मुकदमा जिंकणें हें नेहमींच्या रहाटींतीलच आहे. यांत चमत्कारचा भास होतो तो इतकाच कीं साधूस घडून येणाऱ्या गोष्टी अगोदर कळल्या किंवा त्याच्या आशर्विादानें त्या तशा झाल्या. पण चिकित्सक मनुष्यास येथें शंका घेण्यास जागा आहे. झाल्या गोष्टी सांगितल्याप्रमाणें घडल्या त्या काकतालीय न्यायानें कशावरून नाहीं घडल्या? टिटानिक आगबोट बुडाली त्या वेळेस कोणी एकास एका मनुष्यानें ही बोट बुडेल यांत तूं जाऊं नकोस असें सांगितलें आणि त्याप्रमाणें तो त्या बोटीनें गेला नाहीं असें प्रसिद्ध झालेलें वाचकांस स्मरत असेल. अशा ठिकाणीं सांगणारा मनुष्य कोणी भविष्य जाणणारा सत्पुरुष होता असें कोणीहि मानीत नाहीं. अनुष्ठान, जपजाप्य इत्यादि प्रकारांतहि हीच शंका उत्पन्न होणारी असून तिचें समाधान होणें अशक्य आहे. या सर्व प्रकारांत, सरळ होणाऱ्या गोष्टींसाठींच अनुष्ठान वगैरे होत असल्यानें त्या चमत्कारांत समाविष्ट होऊं शकत नाहींत. शिवाय पर्जन्य पडणें किंवा मनुष्य सांपडणें किंवा रोग बरा होणें इत्यादि गोष्टी घडल्या त्या बोलाफुलास गांठ या न्यायानें कशावरून घडल्या

नाहींत असें वादी प्रतिवादन करील तर त्यास उत्तर देण्यास किंवा त्याच्या शंकेचा परिहार करण्यास काय साधन आहे? सारांश; भविष्य सांगणें, भूत काढणें, रोगी बरा करणें, अनुष्ठानानें कार्य सिद्ध होणें इत्यादि गोष्टी खरे चमत्कार नव्हेत; ही गोष्ट आपल्यास मान्य करावी लागेल. हेंच विधान कांहीं गोष्टी विलक्षण रीतीनें घडतात तेथें चमत्काराचा भास होतो त्या ठिकाणींहि लागू पडतें. उदाहरण, कांहीं वर्षांपूर्वी अकोल्याजवळ झालेल्या रेल्वेच्या अपघातांत आपले सन्मान्य मित्र मोरो केशव दामले व त्यांची पत्नी दुर्दैवानें मरण पावलीं पण त्यांची एक लहान मुलगी त्या अपघातांतून वांचली. ती जागी असून दाराशीं उभी होती. गाडीच्या पहिल्या टकरींत दरवाजा आपोआप उघडला जाऊन ती लहान असल्यानें चेंडूसारखी बाहेर उडाली आणि जिवंत राहिली. या ठिकाणीं She miraculously escaped असें आपण म्हणतों. पण हा Miracle शब्दाचा उपयोग मुख्यार्थानें नाहीं, हें उघड आहे. तो अतिशयोक्तीनेंच येथें केला आहे. She providentially escaped असेंच येथें म्हटलें पाहिजे. सारांश Miracle आणि Providence यांत फरक आहे. मराठींत म्हणावयाचें तर ती मुलगी चमत्कारानें वांचली हें म्हणणें केवळ अतिशयोक्तीचें आहे. कारण तिचें वांचणें सृष्टिनियमाच्या विरुद्ध नव्हतें. ती मुलगी सुदैवानें जागी असून दरवाज्याशीं उभी होती; म्हणून **सुदैवानें** वांचली असेंच म्हणणें योग्य होईल. सारांश, चमत्कार म्हणजे ज्ञातसृष्टिनियमाच्या विरुद्ध घडलेली गोष्ट, हीच व्याख्या योग्य व मान्य करण्यासारखी आहे. अन्य प्रसंगीं चमत्काराभास आहे हें उघड आहे. अशी व्याख्या घेतली तरच आपल्यापुढें कोडें आहे, नाहीं तर नाहीं हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. निसर्ग–नियमांनीं बद्ध झालेल्या सृष्टींत चमत्कार घडतात किंवा नाहीं हें जें गूढ आरंभीं दिलें

आहे, त्याचें गूढत्व याच व्याख्येनें आहे. नियमबद्ध सृष्टींत नियमविरुद्ध गोष्टी घडतात कीं काय हा प्रश्न या व्याख्येमुळेंच उपस्थित होतो, हें चाणाक्ष वाचकांस ज्यास्त विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

चमत्काराच्या योग्य व्याख्येला उतरतील अशीं चमत्कारांचीं दोनचार उदाहरणें दिलीं म्हणजे हा विषय वाचकांच्या ध्यानांत येईल. ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद म्हणविला हा चमत्कार होय. जनावरास माणसाची भाषा येणें ही गोष्ट सृष्टीच्या नियमाविरुद्ध आहे, तेव्हां रेड्यानें मनुष्यासारखें बोलावें, किंबहुना वेद पठन करावा, कीं जें मनुष्यास सुद्धां कष्टानें साध्य आहे, हा चमत्कार होय. तुकारामबोवा सदेह अदृश्य झाले हा चमत्कार होय. श्रीमच्छंकराचार्यांनीं तप्तधातुरस उसाच्या रसाप्रमाणें तोंड न भाजतां पान केला हा चमत्कार होय. द्रौपदीसतीचें एक वस्त्र दुःशासनानें ओढून काढावें तों दुसरें ती नेसलेलीच असे हा चमत्कार होय. परीक्षित् मृत जन्मला असतां श्रीकृष्णाच्या आशीर्वादानें जिवंत झाला हा चमत्कार होय. अन्यधर्मांतून उदाहरण घेणें तर ख्रिस्तीधर्माचें उदाहरण आपल्यासमोर उभें राहतें. येशू क्रूसावर चढविला जाऊन ठार मारला गेला असतां व त्याचें प्रेत पुरलें गेलें असतां तो पुन्हां जिवंत होऊन अपॉसलस् अथवा प्रेषित यांच्या समक्ष आकाशांत गेला, हा चमत्कार होय. ख्रिस्तीधर्म खरा म्हणणाऱ्या कित्येकांस एके प्रसंगीं परधर्मी अधिकाऱ्यांनीं शिक्षा देऊन त्यांच्या जिभा कापल्या असतांहि ते बोलत राहिले, अशी आख्यायिका गिबनच्या इतिहासांत दिलेली आहे; हा चमत्कार होय. मुसलमानी धर्मांतील अवलियांच्या हातून अनेक चमत्कार घडल्याच्या गोष्टी आपण ऐकतों. पण ते नेहमींच्या तऱ्हेचे म्हणजे भविष्य सांगणें, भूत काढणें, रोग बरा करणें इत्यादि प्रकारचे अस-

तात. एक गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. महंमद पैगंबरानें चमत्कार केले नाहींत, असें Historians' Histoy of the World मध्यें वाचल्याचें मला स्मरतें. महंमदास पुष्कळ लोक असें म्हणत कीं, " ज्याप्रमाणें अब्राहाम, मोझेस, येशू इत्यादि पूर्व प्रेषितांनीं चमत्कार केले, त्याप्रमाणें तूं कां करून दाखवीत नाहीस ? तूं जर परमेश्वराचा प्रेषित आहेस, तर तुला असे चमत्कार करून दाखविणें जरूर आहे." यावर महंमदाचें असें उत्तर असे कीं, " मी तुम्हांस कुराण आणून दिलें आहे, हाच चमत्कार बस्स आहे. याशिवाय अन्य चमत्कार करण्याची जरूरी नाहीं. " महंमदाचीं एकंदर मतें मोठीं करडी व निश्चयाची असत. खोट्या चमत्कारांनीं साधूंचें व मूर्तींचें स्तोम कसें माजविलें जातें, हें ख्रिस्ती धर्माच्या तत्कालीन स्थितीवरून त्याच्या लक्षांत आलें असावें आणि यामुळेंच त्यानें चमत्कार केले नसावेत. माझी पूजा करूं नका, माझी मूर्ति करूं नका, किंबहुना माझें चित्र काढूं नका, असा त्यानें आपल्या अनुयायांस करडा नियम घालून ठेविला आहे, हें प्रसिद्धच आहे. असो; महंमदाचा कटाक्ष याप्रमाणें चमत्काराविरुद्ध होता, तरी पूर्वप्रेषितांनीं केलेले चमत्कार त्यास मान्य होते असें दिसतें; आणि मुसलमानी धर्मांतील अवलियांनीं करामत अगर चमत्कार केल्याच्या कित्येक गोष्टी प्रचलित आहेत हें सर्वांस ठाऊक आहे.

वरील उदाहरणावरून चमत्कारांचें खरें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येईल. तर आतां प्रश्न असा कीं हे चमत्कार खरोखर घडले किंवा ह्या केवळ तत्कालीन भाविक लोकांच्या कल्पना ? हा प्रश्न अस्तिपक्षी उलगडला तर पुढें उत्पन्न होणारे प्रश्न पुढें विचारूं. रेड्याच्या मुखानें वेद म्हणविणें किंवा मृत मनुष्याचा जिवंत मनुष्य होणें हें

घडलेंच नाहीं तर तें घडलें कसें हें गूढ उरतच नाहीं. तेव्हां हे चमत्कार खरोखर घडले किंवा नाहीं हा येथें प्रश्न प्रथम आहे. तो केवळ पुराव्याचा अथवा ऐतिहासिक समालोचनाचा आहे हें उघड आहे. अमुक एक गोष्ट झाली कीं नाहीं हें ठरविण्यास विश्वसनीय साक्षिपुरावा पाहिजे. ती गोष्ट ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिली अशा लोकांचा पुरावा पाहिजे व ते लोकमान्य व भरंवशालायक असले पाहिजेत. प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टी विश्वसनीय माणसानें लिहून ठेविल्या म्हणजे तो इतिहास झाला. तोंडी पुरावा पहिल्या नंबरचा व लेखी म्हणजे ऐतिहासिक पुरावा दुसऱ्या नंबराचा हें उघड आहे. पण तोंडी प्रत्यक्ष पुरावा पाहिजेल त्या काळासंबंधाचा कसा मिळणार ? तो लेखी ऐतिहासिकच मिळणार, म्हणजे दुसऱ्या दर्जाचा अर्थात् ऐकींव असणार; व अशा रीतीनें ऐकिवांची परंपरा वाढत जाणार. अशा बाबतींत पुरावा कसा पाहिजे, यासंबंधाची विस्तृत चर्चा पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनीं केली आहे, ती येथें देणें शक्य नाहीं. विरुद्ध-मतवादी ' ह्यूम ' प्रभृत्ति विद्वान् या ठिकाणीं प्रथमच कसे अडून बसतात, तें मात्र येथें सांगितलें पाहिजे. ते म्हणतात " एखाद्या मनुष्यानें मला येऊन सांगितलें कीं ' क्ष ' पाण्यावर चालत गेला हें मीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें तर तें मी खोटे म्हणेन. दोन मनुष्यांनीं सांगितलें कीं तें आम्ही पाहिलें तरी मी तें खोटें म्हणेन; हजार मनुष्यांनीं सांगितलें तरी खोटें म्हणेन; सांगणारीं मनुष्यें किती सचोटीचीं असलीं तरी मी तें खोटें म्हणेन. " साधारण व्यवहारांत किंवा अदालतींत आलेल्या पुराव्याच्या मान्यामान्यतेच्या विचाराच्या वेळीं अशाप्रकारचा अवष्टंभ न्याय्य आहे हें कबूल केलें पाहिजे. सृष्टिनियमाच्या विरुद्ध सूर्य पश्चिमेस उगवतांना मी पाहिला इत्यादि विधान मान्य साक्षिदाराचें असलें तरी अग्राह्य होय. ही गोष्ट व्यावहारिक विचारांत अथवा अदालतींत मान्य करावी

लागेल व केलीहि जाते. पण जेथें वादाचा मुद्दा, सृष्टीच्या नेहमींच्या अनुभवाविरुद्ध गोष्टी घडतात कीं नाहीं हाच असेल, तेथें असा पुरावा अग्राह्य कसा ठरवितां येईल? वादाचा मुद्दा हाच आहे कीं, सृष्टीच्या नियमाविरुद्ध गोष्टी होतात कीं नाहीं? तेव्हां अशी गोष्ट आम्ही पाहिली असें प्रत्यक्ष पाहिलेल्या साक्षिदाराच्या सांगण्याशिवाय याची सत्यासत्यता कशी पटणार? अशी गोष्ट कां होते हा प्रश्न पुढचा आहे; तो तुम्हांस सुटत नाहीं म्हणून अशी गोष्ट होतच नाहीं असें म्हणणें कसें चालेल? प्रथम प्रत्यक्ष अनुभव आणि मग त्याची मीमांसा हाच तत्त्वविवेचनाचा मार्ग आहे. तर प्रत्यक्ष अनुभव आला कीं नाहीं याबद्दलचा साक्षिपुरावा ग्राह्य आहे हें उघड आहे. तो भरंवशाचा आहे कीं नाहीं हें न्यायासनानें म्हणजे प्रत्येक मनुष्याच्या अंतर्मनानें ठरवावयाचें आहे.

चमत्कार झाल्याची साक्ष देणारे आप्त साक्षिदार भ्रमानें बोलतात असा एक तर्क सदर साक्षीचा परिहार करण्यासाठीं कित्येक तत्त्ववेत्त्यांनीं केला आहे. पैठणच्या ब्राह्मणांनीं रेड्याच्या तोंडून वेद ऐकिला किंवा अपॉसल्स्नीं येशूस जिवंत होऊन आकाशांत जातांना पाहिलें, या ठिकाणीं त्या त्या लोकांस तसा भास झाला, वास्तविक गोष्ट तशी झाली नाहीं असें मानावें, असें कित्येक तत्त्ववेत्ते म्हणतात; पण तें सयुक्तिक नाहीं. एक तर साक्षिदाराच्या विश्वसनीयतेबद्दल तुम्हांस शंका नसूनहि अशा तर्कानें तुम्ही ती विश्वसनीयता अन्य तऱ्हेनें खोडून टाकतां. आणि दुसरी गोष्ट अशी कीं, एक चमत्कार नाहींसा करण्यासाठीं दुसरा चमत्कार तुम्ही उत्पन्न करतां; म्हणजे अनेक हुशार व बुद्धिवान् माणसांचा कांहीं तरी भ्रम होणें हा तरी सृष्टिनियमाविरुद्ध चमत्कार नव्हे काय? असा भ्रम उत्पन्न करण्यासाठीं कोणी कांहीं यांत्रिक साधन तयार ठेविलें होतें

असें तर तुम्हांस म्हणतां येत नाहीं. एकोणिसाव्या शतकांत तयार केलेला फोनोग्राफ ज्ञानेश्वरानें रेड्याच्या पोटांत लपविला होता असें तर तुमचें म्हणणें नाहीं ? असें असेल, तर हा एक अन्य चमत्कारच होय. सारांश, एक आणखी चमत्कार उत्पन्न करण्यांत फायदा कोणता ? मान्य साक्षिदारांच्या साक्षीची अन्य तऱ्हेनें वासलात लावण्याचा यत्न न करतां त्यांच्या साक्षीचा आपण विचार केला पाहिजे हें उघड आहे.

हजारों खोट्या चमत्काराच्या गोष्टींबरोबर दहापांच खऱ्या चमत्कारांच्या गोष्टी असतात, अशा स्थितींत साक्षिदार भरंवशालायक आहेत कीं नाहींत हें ठरविणें फार कठिण आहे, ही गोष्ट कबूल आहे. तसेंच अमुक साक्षिदार भरंवशालायक आहे, अमुक नाहीं, हें ठरविणें न्यायाधिशाच्या समजुतीवर अवलंबून असतें; यामुळें हा एक प्रकारचा श्रद्धेचा प्रश्न होतो, हेंहि कबूल आहे. तिसरें, ज्याप्रमाणें निरनिराळे न्यायाधीश साक्षिदारांच्या विश्वसनीयतेसंबंधें निरनिराळीं मतें देतात, त्याप्रमाणें पुढें येणाऱ्या पुराव्यासंबंधानें निरनिराळीं मतें पडण्याचा संभव आहे, हें तितकेंच खरें आहे. पण या अडचणी प्रत्येक मुकदम्यांत उपस्थित होतात व त्यामुळें कोणत्याहि मुकदम्याचा निकाल थांबला आहे असें नाहीं. यासाठीं त्रयस्थ दृष्टीनें विचार केला असतां असें म्हणतां येईल कीं, ज्याअर्थीं प्रत्येक देशांत, प्रत्येक धर्मांत, सन्माननीय लोक चमत्कार घडून आल्याची साक्ष देतात, त्याअर्थीं चमत्कार म्हणजे सृष्टीच्या नियमाविरुद्ध गोष्टी कधीं कधीं घडतात. आतां ख्रिस्ती न्यायाधीश ज्ञानेश्वरानें केलेल्या चमत्काराबद्दलचा पुरावा अविश्वसनीय म्हणतील तर उलटपक्षीं अनेक हिंदु न्यायाधीश येशूच्या पुन्हा जिवंत होण्यासंबंधाचा पुरावा अविश्वसनीय असें म्हणतील. पण हिंदु किंवा ख्रिस्ती या दृष्टीनें या विषयाकडे न पाहतां तटस्थ वृत्तीनें विचार करणारास दोन्ही पुरावे

मान्य कां करूं नयेत हें सांगतां येणार नाहीं. सारांश, अनेक देशांतील पुराण्यांवरून चमत्कार घडतात असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

आतां हे साक्षिदार आपल्यापुढें प्रत्यक्ष येत नाहींत हा एक महत्त्वाचा फरक या प्रश्नांत व नेहमींच्या मुकदम्यांत आहे हें उघड आहे. प्रत्यक्ष माहिती सांगणारा साक्षिदार समक्ष आला म्हणजे त्याची हकीकत उलट प्रश्नांनीं तपासून जांचतां येते; तशी येथें येत नाहीं ही एक मोठी गौणत्वाची गोष्ट आहे. अशा गोष्टीसंबंधाचे साक्षिदार आपल्यापुढें नाहींत; त्यांचें मत नमूद असलेले ग्रंथ आपल्यापुढें आहेत; ते नमूद करणारे ग्रंथकारहि नाहींत. सारांश, साक्षिदारांच्या प्रत्यक्ष लिहून ठेवलेल्या हकीकतीच्या मान्यामान्यतेबद्दल जसें आपल्यास मत द्यावें लागतें, तसें ग्रंथाच्या मान्यामान्यतेबद्दलहि या बाबतींत मत द्यावें लागेल हें उघड आहे. पण ही गोष्ट शक्य कोटींतील आहे व अशा अडचणींतूनच इतिहास तयार होतो हें प्रसिद्ध आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ग्रंथांची थोरवी व किंमत काय आहे हें ठरविण्यासंबंधीं ऊहापोह झाले आहेत; त्यांचाहि येथें निर्देश करणें जरूर नाहीं. उत्तरकालीन ग्रंथापेक्षां समकालीन ग्रंथाची मान्यता अधिक, इतर भाकड कथांपेक्षां ऐतिहासिक म्हणविले जाणारे ग्रंथ विशेषमान्य, इत्यादि नियम येथें सविस्तर देण्याची जरूरी नाहीं. असो तर, सांगावयाची गोष्ट ही कीं, अशा तऱ्हेनें ऐतिहासिक दृष्ट्या निरनिराळ्या मान्य ग्रंथांत नमूद असलेल्या पुराव्याचा योग्य विचार करतां चमत्कार कधीं कधीं घडतात असाच निर्णय द्यावा लागेल असें मला वाटतें. गिबनसारख्या इतिहासविचक्षण व धर्माभिमानाविहीन ग्रंथकारानें सुद्धां हा निकाल पर्यायानें कबूल केला आहे. जिभा तोडल्या असतांहि मनुष्यें बोलत

होतीं हा जो दाखला पूर्वी दिला आहे, तो गिबनच्या इतिहासांतील आहे; व त्या ठिकाणीं त्यानें त्याविषयीं असें म्हटलें आहे कीं, तत्कालीन लेखांचा व लेखकांचा श्रद्धाश्रद्धेयत्वासंबंधें ऐतिहासिक विचार करतां अशी गोष्ट झाली नाहीं हें ठरविणें कठीण होईल. सारांश, चमत्कार होतात कीं नाहीं या मुद्यावर आपल्यास अस्तिपक्षीं ठराव द्यावा लागेल असें मला वाटतें.

चमत्कार घडतात ही गोष्ट निश्चित झाल्यावर ते कसे व कां घडतात हा प्रश्न उपस्थित होतो. पाश्चात्य विद्वानांचा यासंबंधानें मोठा सिद्धांत असा आहे कीं, चमत्कार होतात ते Revelation अगर श्रुतीच्या सिद्धतेसाठीं होतात. हाहि सिद्धान्त आपल्या इकडच्या विवेचनावरून व ग्रंथांवरून मान्य करण्यासारखा आहे; पण माझ्या मतें तो अपुरा आहे. आणखी कांहीं प्रसंगीं चमत्कार घडतात असें ऐतिहासिक समालोचनावरून दिसतें. माझ्या मतें संपूर्ण सिद्धान्त असा मानितां येईल कीं, चमत्कार घडतात ते साधु अथवा सत्पुरुष यांच्या हातून श्रुतिसिद्धतेसाठीं ज्ञानपूर्वक आणि क्वचित् संकट प्रसंगीं त्यांची चित्तवृत्ति तल्लीन होऊन परमेश्वराशीं तादात्म्य होते त्या वेळेस, आपोआप घडतात. हा सिद्धान्त ऐतिहासिक समालोचनानें कसा सिद्ध होतो हें आपण पाहूं.

प्रथम गोष्ट ही कीं, चमत्कार साधूंच्या अथवा सत्पुरुषांच्याच हातून घडतात हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. परमेश्वराच्या चरणीं अनन्य भावानें शरण जाऊन ज्यांनीं आपलें तन-मन-धन ईशभक्तीला व भूतदयेला अर्पण केलें आहे, अशाच सत्पुरुषांच्या हातून चमत्कार घडतात, इतरांच्या घडत नाहींत, हा ह्या सिद्धान्ताचा एक महत्त्वाचा भाग असून तो ऐतिहासिक समालोचनावरूनच कायम होतो. इतिहास पाहतां आजवर चमत्कार घडल्याच्या खऱ्याखोट्या

ज्या अनेक गोष्टी आहेत, त्यांत संतांच्या शिवाय इतर पुष्कळ सजीव व निर्जीव वस्तूंच्या द्वारें चमत्कार घडल्याच्या कल्पना आहेत. पण त्या सर्व कल्पना भ्रममूलक, कपटमूलक किंवा अज्ञानमूलक असून आणीबाणीच्या प्रसंगीं खोट्या ठरल्या आहेत. देवांच्या मूर्तीचे पुष्कळ चमत्कार ग्रीक व रोमन लोकांच्या इतिहासांत आपल्यास दृष्टीस पडतात. किंबहुना याहून प्राचीनकाळीं म्हणजे असिरियन, बाबिलोनियन व इजिप्शियन लोकांचे वेळीं, निरनिराळ्या देवता कल्पिल्या गेल्या असून त्यांचे अनेक प्रकारचे प्रभाव लोक मानीत होते. ते बहुधा भविष्य सांगणें, भूत काढणें व रोग बरा करणें याच प्रकारचे होते हें उघड आहे; पण याहि शिवाय अन्य प्रकार असत. म्हणजे कांहीं दुष्ट देवता असून त्यांच्या प्रसादानें दुसऱ्यांचा नाश अथवा पाहिजे तसा निकाल करतां येतो, अशी लोकांची समजूत होती. देवाबरोबर सैतानाची कल्पना फार प्राचीनकाळापासून आहेच. आहुर्मज्दाबरोबर पर्शियन अथवा मागी लोकांनीं अहरिमनची कल्पना केली आहे. या सैतान अगर अहरिमनाचे दूतहि देवदूतांबरोबर कल्पिले गेले व ते प्रसन्न करून घेतल्यास नानाप्रकारचे चमत्कार करण्याचें सामर्थ्य मनुष्यास येतें असें लोक मानीत. यामुळें मीडीया, बाबिलोनिया वगैरे देशांत प्राचीनकाळीं जादूचें फार बंड असे व त्याच कल्पना अरेबियन नाइट बनेपर्यंत कायम होत्या. कमरेपर्यंत दगड करून वर मनुष्य राखलेला दुर्दैवी राजा किंवा डोक्यांत मणि बनवून ठेविलेला जार किंवा बाटलींत भरलेला बाष्परूपी जिन्नस ( राक्षस ) वगैरे विलक्षण कल्पना अरेबियन नाईटमध्यें वाचावयास सांपडतात. पण त्या सर्व खोट्या आहेत हें विस्तारानें सिद्ध करणें जरूर नाहीं. परमेश्वरानें दुष्टास अशा प्रकारचें सामर्थ्य दिलें नाहीं असें त्याच्या दयालुत्वावरून निश्चयानें वाटतें. सैतानाचें व त्याच्या दूतांचें सामर्थ्य खोटें, ही गोष्ट आपल्या इकडीलहि इतिहासावरून ठर-

वितां येते. याच गोष्टी अन्य तऱ्हेनें इकडेहि लोककल्पनेंत रूढ होत्या व आहेत; व त्या त्यांच्या कल्पनेबरोबरच अस्तास गेल्या आहेत किंवा जात आहेत. मूठ मारण्यावर आतां कोणाचा भरंवसा नाहीं. पिशाचादिकांवरहि भरंवसा कमी होत चालला आहे. एके कालीं हा भरंवसा इतका वाढला होता कीं, पिशाचसाधन करण्याच्या इच्छेनें स्मशानांत प्रेताच्या मुखावर हवन करून अलौकिक सिद्धि मिळविण्याच्या भ्रान्त प्रयत्नास स्त्रीपुरुष लागत व कधीं कधीं मनुष्याचा बळी देणें वगैरे अनन्वित कृत्यें करण्यास मागेंपुढें पहात नसत, हें मालतीमाधवावरून ध्यानांत येईल. कथासरित्सागरांत विशेषतः उज्जनीच्या स्मशानांतील अनेक गोष्टी आहेत. त्यांतील एक गोष्ट ऐथें सांगण्यासारखी आहे. एक मुलगा थंडीनें कांकडून जाऊन प्रेताजवळ शेकावयास गेला असतां एक वसेची चिरकांडी उडून अकल्पित त्याच्या तोडांत गेली. त्यामुळें तो तात्काल पिशाच बनला व एक किंकाळी फोडून लागलीच पिशाचसामर्थ्यानें आकाशांत उडून गेला. या व अशा तऱ्हेच्या अनेक भाकडकथांना आतां कोणी ऐतिहासिक महत्त्व देत नाहीं. ऐतिहासिक विचार करतां व युक्तायुक्ततेचाहि विचार करतां जादुटोणा, भूतपिशाच, जारणमारण, सैतान इब्लिस, इत्यादि सर्व गोष्टी खोट्या आहेत, व यांच्या योगानें कोणास अलौकिक चमत्कार करण्याचें सामर्थ्य आले नाहीं व येत नाहीं असा निश्चय करणें युक्त व प्राप्त आहे.

देवांच्या मूर्तींत चमत्कार करण्याचें सामर्थ्य नसतें, ही गोष्ट इतिहासावरून सिद्ध होते. मी मूर्तिपूजेच्या विरुद्ध नाहीं हें येथें सांगितलें पाहिजे. मूर्तिपूजा ईशभक्ति करण्याची एक जरूरी पायरी आहे असें माझें मत आहे. पण सामर्थ्य मूर्तींत नाहीं; तें आपल्या ठिकाणीं वसत असलेल्या ईश्वरांशांत व भावांत आहे, ही गोष्ट विसरतां कामा नये. हा भाव व अंश जागृत होण्यास मूर्ति कारणीभूत आहे. प्राचीन

राष्ट्रांतील म्हणजे ग्रीक, रोमन, बाबिलोनियन, इजिप्शियन राष्ट्रांतील मूर्ति ख्रिस्तीधर्माचा प्रसार झाला त्यावेळेस फोडल्या गेल्या; परंतु एकाहि मूर्तीच्या ठिकाणीं सामर्थ्य प्रकट झालें नाहीं. गिबननें इजिप्त-मधील आमीनची प्रचंड मूर्ति फोडल्याची फारच चटकदार हकीगत वर्णन केली आहे. "ह्या उंच मूर्तीच्या खांद्यावर कुऱ्हाड घेऊन चढ-लेल्या ख्रिस्ती मनुष्यानें ज्या वेळेस मूर्तीच्या डोक्यावर मारण्याकरितां कुऱ्हाड उचलली, त्यावेळेस पाहाण्यास जमलेल्या हजारों मूर्तिपूज-कांच्या हृदयास असें पक्कें वाटलें कीं, आतां आकाशपाताळ एक होऊन सर्व सृष्टीचीं शकलें होतील. पण तसें कांहींएक न होतां आकाश पृथ्वी जागच्याजागीं राहिली मूर्तीचीं शकलें मात्र खालीं पडलीं." हीच स्थिति पुन्हां ख्रिस्ती धर्माची अवनति झाली, पांचसहाशें वर्षांत जुन्या मूर्तींच्या ऐवजीं मनुष्यस्वभावाच्या नैसर्गिक भोळसरपणानें नव्या मूर्ती, मेरी, येशू वगैरेंच्या आल्या व त्यांजविषयीं लोकांच्या अनेक वेडसर कल्पना रूढ झाल्या त्यावेळेस झाली. त्या कल्पनांचा विध्वंस त्या मूर्तींबरोबरच महंमदानें व त्याच्या अनुयायांनीं केला. हजारों ख्रिस्ती मूर्ती मुसलमानांनीं फोडून टाकल्या. परंतु कोठेंहि नुसत्या मूर्तींत चमत्काराचें सामर्थ्य आडळलें नाहीं. महंमदीधर्माचा झपाट्यानें प्रसार झाला याचें एक कारण हेंच झालें, याच कारणानें महंमदानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आपली मूर्ति करूं नका, आपलें चित्रहि काढूं नका, अशी आपल्या अनुयायांस ताकीद केली. मूर्तिपूजा व मूर्तिभंग अशीं दोन मतें ख्रिस्ती धर्मांत यापुढें प्रकट झालीं. त्यांचीं बरींच रणें माजून शेवटीं ग्रीकचर्चमध्यें रोमन-चर्चप्रमाणेंच मूर्तीची पुन्हां सरशी झाली. ती चवदाव्या पंधराव्या शतकापर्यंत कायम होती. तिचा पाडाव शेवटीं प्रॉटेस्टंटधर्मानें केला. त्याचा परिणाम ग्रीक व रोमन चर्चवरहि झाला आहे असें म्हणाव-

यास हरकत नाहीं. या धर्मांत मुर्तिपूजा मानतात; पण मूर्तीच्या अंगीं कांहीं विलक्षण चमत्कार करण्याचें सामर्थ्य आहे असें मात्र आतां भोळ्या लोकांशिवाय तिकडे कोणी मानीत नाहीं.

आपल्या इकडेहि मूर्तींचा इतिहास कांहीं अंशीं असाच आहे. मूर्तिभंजक महंमद येईपावेतों हिंदुस्थानांत शेंकडों मूर्तींविषयीं नाना प्रकारच्या चमत्कारांच्या कल्पना प्रचलित होत्या; पण त्या महंदानें नाहींशा केल्या. शेवटली सोमनाथाची मूर्ति त्यानें फोडली, त्यावेळेस मूर्तींत स्वतःचें सामर्थ्य नाहीं ही गोष्ट पूर्ण निदर्शनास आली. सामर्थ्य मनुष्यांत आहे व तें त्याच्या भावनेंत आहे आणि मूर्तीनें भावना जागृत होते हें खरें अहे. यासाठींच मूर्तींच्या ठिकाणीं प्राण-प्रतिष्ठा करून आम्ही ईश-भावना जागृत करतों. पण सोमनाथाच्या पुजाऱ्यांची भावना त्यावेळीं त्या मूर्तींत प्राणप्रतिष्ठा केलेल्या शंकराकडे लागली नव्हती, तर त्या मूर्तींच्या पोटांत लपवून ठेविलेल्या जवाहि-राकडे होती. अर्थात् मूर्तीचें स्वरूप निर्जीव झालें यांत आश्चर्य काय? आणि महंमदानें जबरदस्तीनें मूर्ति फोडून जवाहिर नेलें व ब्राह्म-णासहि ठार मारलें.

ज्याप्रमाणें देवांच्या मूर्तींविषयीं भ्रममूलक कल्पना पूर्वकाळीं लोकांत प्रचलित असल्याचें इतिहासावरून दिसतें, त्याचप्रमाणें साधूंच्या अवशेषांबद्दल विलक्षण कल्पना लोकांत रूढ असल्याचे दिसून येतें. ज्या बुद्धानें जिवंतपणीं एकहि चमत्कार केला नाहीं, त्याच्या मृतशरीरांत कांहीं विलक्षण सामर्थ्य आहे, असे भाविक अनुयायांस वाटून त्यांनीं त्याचे अवयव कणशः जमा करून ते लक्षावधि रुपयांच्या इमारती व देवळे बांधून त्यांत सुरक्षित ठेवले. ते अद्याप सांपडत आहेत. कोणी दांत तर कोणी हाड, कोणी केंस तर कोणी नख, याप्रमाणें त्याचे अवशेष घेऊन त्यांजवर बौद्धांनीं शेंकडों

प्रचण्ड स्तूप बांधले व त्या अवशेषांचें चमत्कार करण्याचें काल्पनिक सामर्थ्य आपल्या उपयोगांत आणलें. हीच तऱ्हा ख्रिस्ती धर्मांत दिसून येते. ज्या क्रूसावर येशूस चढविलें होतें, तो क्रूस कांहीं विलक्षण सामर्थ्याचा आहे असें समजून जेरूसलेममध्यें कित्येक वर्षे जतन करून ठेविला होता. तो एका इराणी बादशहानें जेरुसलेम जिंकून नेला, त्यावेळेस त्याचें सामर्थ्य दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं. हिराक्लियस बादशहानें लढाई करून तो परत आणिला आणि जेरुसलेममध्यें ठेविला अशी आख्यायिका आहे. सेंटपीटरची 'चेन' रोम येथें असून तीस दिव्य सामर्थ्य असल्याच्या अनेक गोष्टी मेडिइव्हल काळांत म्हणजे इ. स. १००० ते १५०० पर्यंतच्या काळांत प्रचलित होत्या. त्याचप्रमाणें इतर संतांच्या माळा, कॉफिन वगैरे अनेक अवशेषांच्या चमत्कारांची प्रशंसा ख्रिस्तीधर्माच्या इतिहासांत ठिकठिकाणीं सांपडते. पण ती प्रशंसा केवळ भ्रममूल आहे असा आतां बहुतेक लोकांचा पक्का निर्धार झाला आहे. असामान्य विभूतीच्या वस्तूंविषयीं आदर असणें स्वाभाविक आहे व योग्यहि आहे. पण त्याविषयींच्या भलत्याच कल्पना कधींहि खऱ्या होणार नाहींत हें उघड आहे. शेक्सपीयर ज्या खुर्चीवर बसून काव्यरचना करी तिजविषयीं आदर वाटणें योग्य आहे, पण तिजवर बसलें कीं पाहिजे त्यास दिव्यकाव्यरचना स्फुरण पावते ही समजूत वेडगळ नव्हे काय? ग्वालेरीस तानसेन एका चिंचेच्या झाडाखालीं एका गायनपटु महात्म्यापासून गाणें शिकला. त्या चिंचेचीं पानें अद्याप गवईलोक गळा सुस्वर व्हावा यासाठीं खातात. पण तसा अनुभव कोणास येत नाहीं, हें उघड आहे. सारांश सत्पुरुषांचे अवशेष पूज्य होत; पण त्यांस चमत्कार करण्याचें सामर्थ्य नाहीं ही गोष्ट इतिहासावरून व अनुभवावरून निश्चयानें ठरते.

चमत्कार करण्याचें सामर्थ्य सत्पुरुषांसच आहे, इतर मनुष्यांस किंवा वस्तूंस नाहीं, ही गोष्ट येथवर विस्तारानें सांगितली. दुसरी गोष्ट अशी कीं हें सामर्थ्य सत्पुरुषांस असतें तें प्रसंगवशात् आपोआप दृष्टीस पडतें. साधु चमत्कार नियमितपणानें किंवा मी अमुक गोष्ट करून दाखवितों अशा प्रतिज्ञेनें करीत नाहींत, तर चमत्कार त्यांच्या हातून प्रसंगविशेषीं अकल्पित होतात. मी अमुक वाजतां एक चमत्कार करून तुम्हांस दाखवितों असें जो म्हणतो व करतो त्यापाशीं कांहीं तरी तत्र आहे हें बहुतेक निश्चयानें जाणावें. एक रुपया किंवा आठ आण्याचें तिकिट काढून बरोबर रात्रीं ९॥ वाजतां हिप्नाटिझमचा प्रयोग जाऊन पाहण्याप्रमाणेंच, रुपया आठ आण्यांची कांहीं तरी भेट घेऊन जाऊन साधूपुढें नेऊन ठेविली कीं, एक चमत्कार आपल्यास दिसलाच पाहिजे, अशी कित्येक लोकांची वेडसर कल्पना असते; पण ती योग्य नव्हे. शीलनाथ महाराज एकदां म्हणाले, " साधु कांहीं बादीगर म्हणजे गारुडी नव्हत, कीं ते वाटेल तेव्हां चमत्कार करून दाखवितील. साधु चमत्कार **करीत** नाहींत तर ते त्यांच्या हातून **अपरते** ( आपोआप ) होतात." तात्पर्य, चमत्कार करण्याचें सामर्थ्य साधूंच्या अंगीं असतेंच; पण तें प्रसंगविशेषींच दृष्टीस पडतें. तें अमुकच प्रकारानें दृष्टीस पडेल हेंहि पूर्वीं ठरविणें शक्य नाहीं हें उघड आहे. जसा प्रसंग येईल तशा स्वरूपानें तें दिसेल. ज्ञानेश्वरानें रेड्याच्या तोंडून वेद म्हणविण्याची कल्पना कांहीं प्रथम केली नव्हती. केली असती तर एखादा फोनोग्राफ भरून घेऊन आपल्याजवळ त्यानें गुप्त ठेविला असता; किंवा प्रल्हादानें ईश्वरास अमुक खांबांत तूं येऊन रहा अशी पूर्वीं प्रार्थनाहि केली नव्हती. प्रसंगानुसार अकल्पित तऱ्हेनें ह्या चमत्काराच्या गोष्टी घडल्या हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. जे लोक नियमित वेळीं

व नियमित तऱ्हेनें प्रतिज्ञापूर्वक चमत्कार करून दाखवितात, ते चिंत्य होत. ईशभक्तीच्या जोडीशिवाय केवळ योगसामर्थ्यानें दाखविण्यांत येणारे चमत्कार किंवा अदृश्य **महात्म्याचे** मदतीनें प्रतिज्ञापूर्वक केलेले चमत्कार मान्य करणें शक्य आहे कीं नाहीं याजबद्दल शंका आहे. ज्याची त्यांजवर श्रद्धा असेल त्यांनीं कांहीं विशेष जाणलें असेल असें मला म्हणावें लागतें. असो.

चमत्कार कसे घडतात हें सांगितल्यानंतर चमत्कार कां घडतात या प्रश्नाकडे आपण वळूं. या प्रश्नाचा तत्त्ववेत्त्यांनीं सूक्ष्म विचार केला आहे. त्याचा सविस्तर ऊहापोह केल्यास एक स्वतंत्र ग्रंथच होईल. चमत्कार घडण्याचें मुख्य कारण त्यांच्या मतें Revelation अथवा श्रुतीचें पुष्टीकरण होय. ज्या गोष्टी अचिंत्य व अपरोक्ष आहेत त्यांच्याविषयीं विश्वास पटण्यासाठीं चमत्कार घडतात असा त्यांच्या मताचा इत्यर्थ आहे. हें त्यांचें मत मान्य करण्याजोगें आहे व तें आपल्या इकडील भगवद्गीता उपनिषदादि ग्रंथांवरूनहि दृढ होतें, ही गोष्ट वाचकांपुढें थोडक्यांत मांडण्याची परवानगी घेतों.

परमेश्वर आहे कीं नाहीं, असेल तर त्याचें स्वरूप काय, त्यानें सृष्टि कशी निर्माण केली, मनुष्याच्या जीवाचें स्वरूप काय, जीवशिवाचा संबंध कसा आहे, इत्यादि सर्व धर्मांच्या मूलभूत असलेल्या गोष्टींचा उलगडा आपल्या Reason नें होत नाहीं हें सर्वमान्य आहे. भौतिकशास्त्रास अद्याप जीवाच्या स्वरूपाचा थांग लागला नाहीं. हा थांग ज्या दिवशीं लागेल, त्या दिवशीं सर्व धर्म विगत-कार्य होतील, हें उघड आहे. पण थांग लागण्याचा दिवस फार दूर किंबहुना कल्पाच्याहि पलीकडे आहे असें वाटतें. कारण स्पेन्सर प्रभृति तत्त्वज्ञांचें मत असें आहे कीं हा विषय अज्ञेय आहे. First Cause अथवा परमेश्वर याचें स्वरूप बुद्धिग्राह्य नाहीं असें स्पेन्सरनें अनेक प्रमाणांनीं सिद्ध केलें आहे.

आमच्या इकडील प्राचीन विद्वानांनीं केलेल्या मीमांसेचा निष्कर्ष कांहीं अंशीं असाच आहे. परमेश्वर केवळ श्रुतीनें अथवा शब्दप्रमाणानें गम्य आहे असें त्यांचें मत आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द असे जे प्रमाणभेद नैयायिकांनीं मानले आहेत, त्यांत परमेश्वर प्रत्यक्ष—प्रमाणगम्य नाहीं, अतींद्रियत्वात्; अनुमानगम्य नाहीं दृष्टान्ताभावात्; उपमानगम्य नाहीं सादृश्याभावात्; तात्पर्य, तो शब्दप्रमाणगम्य आहे. धर्माचीं सूक्ष्म रहस्यें सांगण्याचें काम श्रुति अथवा Revelation चेंच आहे. अशा स्थितींत धर्माचीं रहस्यें सांगणाऱ्याचा शब्द सर्वतोपरी मान्य आहे, त्याच्यासंबंधानें शंका घेण्याचें प्रयोजन नाहीं, अशा प्रकारची मनाची भावना होण्यास कांहीं तरी बाह्य साधन पाहिजे हें उघड आहे. तें बाह्य साधन Miracle होय असें पाश्चात्य विद्वानांचें मत आहे. उपदेशावर अथवा श्रुतीवर श्रद्धा बसण्यासाठीं चमत्कारांची जरूरी आहे हा कोटिक्रम मान्य करण्याजोगा आहे. अतींद्रिय ज्ञानाचा उपदेश करणारा मनुष्य अलौकिक सामर्थ्याचा आहे, अशी आपली खात्री असेल तरच त्याच्या शब्दावर आपला विश्वास बसेल हें उघड आहे. परमेश्वराचें ज्ञान बुद्धीनें होणें शक्य नाहीं; तरी तें ज्ञान मनुष्यास होऊंच नये असा परमेश्वराचा संकेत असणेंहि संभवनीय नाहीं. आणि म्हणूनच दिव्यज्ञानाचा उपदेश करणारे संत व साधु वेळोवेळीं उत्पन्न होतात व त्यांच्या शब्दावर विश्वास उत्पन्न व्हावा यासाठीं क्वचित् प्रसंगीं त्यांच्या हातून चमत्कार घडतात. सारांश, चमत्कारानें मुख्य प्रयोजन श्रुतिसिद्धता आहे असें पाश्चात्यांचें मत आहे.

वर लिहिलेलें प्रयोजन केवळ बायबलचा विचार करितां किंवा अपीसल्सच्या उपदेशाच्या इतिहासाच्या विचार करतां योग्य दिसतें. असें नसून, आपल्या इकडील चमत्कारांच्या हकीकतींचा विचार

करतांहि योग्य दिसतें. ज्ञानेश्वरानें केलेल्या चमत्काराचा आपण प्रसंग पाहूं. परमेश्वर सर्व प्राणिमात्राच्या हृदयांत बसला आहे; मनुष्य, पशु, पक्षी, कीट, पतंग, दंदशूक, सर्वांच्या अंतर्यामीं एकच आत्मा भरला आहे, इत्यादि तत्त्व, ज्ञातीस शरण गेलेल्या ज्ञानोबांनीं पैठणच्या ब्राह्मणांस सांगितलें, तेव्हां ब्राह्मणांनीं उत्तर केलें. " बाबारे! वेदान्त सर्वांस सांगतां येतो. पण पुराणांतलीं वांगीं पुराणांत. प्रत्यक्ष अनुभव नाहीं. येथें ब्राह्मण, शूद्र इत्यादि भेद मनुष्यांत स्पष्ट आहे. मग मनुष्य व तिर्यग्योनि हा भेद तर मोठाच आहे. " याप्रमाणें ज्ञानेश्वराचा उपहास लोकांनीं केला तेव्हां रेड्याचा आत्मा व वेदविद ब्राह्मणाचा आत्मा एक आहे हें ज्ञानेश्वरानें प्रत्यक्ष अनुभवास आणून दिलें. सर्वांच्या अंतर्यामीं एकच आत्मतत्त्व भरलें आहे, हें ज्ञानेश्वरानें कितीहि बुद्धिवादानें समजावून सांगितलें असतें तरी त्या ब्राह्मणांस समजलें नसतें किंवा उमजलें नसतें हें उघड आहे. अशा प्रसंगीं चमत्कारांचें वरील प्रयोजन आपल्या चांगलें ध्यानांत येतें. याहूनहि समर्पक उदाहरण प्रत्यक्ष भगवद्गीतेचें आहे. भगवद्गीतेचा दिव्य उपदेश करतां करतां मध्येंच विराट स्वरूप दाखविल्याची हकीकत कां आली आहे? व्यासानें ही विश्वरूपदर्शनाची भाकडकथा मध्येंच कां गोंविली आहे? असा एक प्रश्न चौकस व साशंक मनुष्याच्या मनापुढें गीता वाचतां वाचतां उभा राहतो. पण अतींद्रिय ज्ञानाचा उपदेश मनावर ठसण्यासाठीं चमत्काराची योजना आहे, हा सिद्धान्त मनांत आणला म्हणजे ह्या विश्वरूपदर्शनाची हकीगत गीतेच्या मध्यभागीं आली आहे, तिचें रहस्य लक्षांत येतें. ' मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । ' ' अहं सर्वस्य प्रभवः मत्तः सर्वं प्रवर्तते ।' इत्यादि श्रीकृष्णाचीं वाक्यें ऐकून श्रद्धावान् अर्जुनास सुद्धां श्रीकृष्णाचें विश्वरूप पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली. " तूं सांगत आहेत तें सर्व खरेंच आहे, ' एवमेतद्य-

थात्य त्वमात्मानं परमेश्वर' असें वाटत व म्हणत असूनहि 'द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम'।" असें म्हणत श्रीकृष्णाचें परमेश्वराशीं अभिन्नत्व प्रत्यक्ष समजून घेण्याची इच्छा अर्जुनास उत्पन्न झालेली त्यानें व्यक्त केली व श्रीकृष्णानें त्यास सर्व जगत् ज्यांत अंतर्भूत आहे असें आपलें विश्वरूप दाखविलें. तात्पर्य, अतींद्रिय उपदेश मनावर ठसण्यासाठीं चमत्कार पाहिजेत हा सिद्धान्त गीतेंतील विश्वरूपदर्शनाच्या प्रसंगावरून दृढ होतो.

आतां येथें अशी शंका उपस्थित होईल कीं, परमेश्वरानें सृष्टीला जे नियम बांधून दिलेले आहेत त्यांतच त्याचें अगाध चातुर्य व अस्तित्व प्रकट होत असून निराळे चमत्कार म्हणजे नियमाविरुद्ध गोष्टी होण्याची काय जरूरी आहे? परमेश्वराचें अस्तित्व व परमेश्वराचें सामर्थ्य या अगाध व अनंत सृष्टींत कणाकणांत व क्षणाक्षणांत दिसून येणारें आहे; तें समजण्यास निराळा चमत्कार नको आहे. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या पुस्तकास अंतरिक्षांतील चमत्कार हेंच नांव दिलें असून हा प्रत्यक्ष चमत्कार अनंत व अगाध आकाशाकडे पाहिलें तर नेहमीं दिसून येत आहे. लक्षावधि मैल हाच जेथें एक मैल व सबंध वर्ष हाच जेथें एक सेकंद अशा दिक्कालाच्या मापानें मोजल्या जाणाऱ्या या आकाशांत लक्षावधि किंबहुना अनंत तारे—जे सूर्याहून मोठे व तेजस्वी आहेत—गच्च भरले असून त्यांचा खेळ निर्वेध व शांतपणें चालू आहे. 'महतो महीयान्' सोडून 'अणोरणीयान्'कडे पाहिलें तरीहि हीच मौज दृष्टीस पडते. इंचाचा हजारावा हिस्सा हें जेथें दिक्परिमाण व एक सेकंद हें जेथें आयुष्याचें वर्ष, अशा सूक्ष्म परिमाणांनीं विशिष्ट असलेले असंख्य बॅसिलस् Microscope मधून पाहिले म्हणजे त्यांचाहि खेळ अबाधित चाललेला आपल्या दृष्टीस पडतो. मध्यम परिमाणाकडे पाहिलें

तरी हीच मौज व हाच चमत्कार दृष्टीस पडतो. हजारों वृक्ष व वेली वाढत आहेत व हजारों प्रकारच्या रंगांचीं व वासांचीं फुलें व गोडीचीं व आकारांचीं फळें आपआपल्या नियमानुसार धारण करीत आहेत असें पाहून मन आश्चर्यभरित होतें. मनुष्यानें आपल्या देहाकडे पाहिलें तरी हजारों चमत्कार दृष्टीस पडतील. एकाच अन्नानें वाढलेल्या या देहांत जागजागीं डोळे, कान, नाक इत्यादि इंद्रियें कशीं उत्पन्न होतात, शिरा एकच असून कानांतील शिरांना ऐकण्याचें, डोळ्यांतील शिरांना पाहण्याचें, नाकांतील शिरांना वास घेण्याचें, जिभेंतील शिरांना चव जाणण्याचें निरनिराळें सामर्थ्य कसें येतें; श्वासोच्छ्वासाची क्रिया अव्याहत कशी चालू राहते, ती सुरू कशी होते, बंद कशी पडते, इत्यादि गोष्टींचा विचार केला म्हणजे आश्चर्य व चमत्कार वाटल्यावांचून व परमेश्वराचें स्मरण झाल्यावांचून राहत नाहीं. केनेषितं पतति प्रेषितं मनः केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः । केनेषितां वाचमिमां वदन्ति श्रोत्रं चक्षुः क ऊ देवो युनक्ति ॥ असे उद्गार आपल्या मुखांतून आल्यावांचून राहत नाहींत. असे एक का दोन चमत्कार? जिकडे पहावें तिकडे परमेश्वराच्या अगाध रचनाचातुर्याची व सामर्थ्याची साक्ष पटून मनुष्याचें मन थक्क होऊन जातें. सारांश या जगताच्या स्वरूपांत व हालचालींतच चमत्कार भरले असून निराळ्या नियमाविरुद्ध घडणाऱ्या चमत्कारांची जरूरी काय अशी शंका साहजिक उत्पन्न होते.

थोडासा विचार केला असतां ही शंका दूर होणारी आहे. दृश्य सृष्टींतील नेहमींच्या चमत्कारांचें चमत्कृतिजनकत्व अतिपरिचयानें नष्ट झालें आहे. सूर्य रोज पूर्वेस उगवून पश्चिमेस जातो यामुळें

त्याचें आपल्यास नवल वाटत नाहीं. झाडाच्या पानांत, फुलांत, फळांत दिसून येणारें रचनाचातुर्य, या वस्तु रोज उपयोगांत येत असल्यानें, आपल्या मनावर प्रतिबिंबित होत नाहीं. हा देह नेहमींच आपल्याजवळ असल्यानें यांत भरलेले चमत्कार आपलें लक्ष वेधीत नाहींत. मुंबईंतील विजेच्या ट्रामवेच्या गाडींत बसून हजारों लोक इकडून तिकडे फिरतात; पण वीज उत्पन्न होते कशी, ती या गाडींत येते कशी, तिचा चाकांशीं संबंध कसा जोडला आहे, इत्यादि प्रश्नां-कडे एखाद्याचेंच लक्ष वेधतें. या गोष्टी गाडींत बसणारास माहित नसतात; इतकेंच नव्हे तर हांकणारांस किंवा गार्डासही, माहीत नसतात. 'मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये' हीच गोष्ट खरी. हजारों मनुष्यांपैकीं एखाद्याचेंच लक्ष सृष्टीच्या गूढाकडे लागतें; आणि दुसरी गोष्ट ही कीं असें लक्ष लागलें तरी तत्वज्ञान एखाद्याला होतें. कारण या गोष्टींकडे ज्यांचें लक्ष लागतें ते सृष्टींतील नियमांनीं तृप्त होतात; नियम घालणाऱ्याकडे त्यांचें लक्ष जात नाहीं. आंख्याला कालत्रयीं फणस यावयाचा नाहीं, डोळ्यांच्या शिरांना काल-त्रयीं ऐकण्याचें सामर्थ्य यावयाचें नाहीं, ही विलक्षण नियमबद्धता पाहून या सृष्टीला भरून राहिलेला नियम तोच निसर्ग, नियति, प्रकृति, स्वभाव, इत्यादि संज्ञांनीं परमेश्वराच्या ठिकाणीं अधिष्ठित होतो. आणि प्रधान राजास जसा मागें सारतो त्याप्रमाणें आपणच पुढें सरतो. सारांश, 'मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः॥' हजारों अशिक्षित मनुष्य **अति-परिचयानें** परमेश्वराकडे बघत नाहींत आणि जे बघूं लागतात ते **निसर्गानें** मोह पावतात, परमेश्वरास नीट जाणत नाहींत. सारांश, जगताच्या घडामोडींत भरून राहिलेले चमत्कार मनावर ठसा उम-

टवीत नसल्यानें, मनावर परिणाम घडून येण्यासाठीं, नियम मोडून होणाऱ्या चमत्काराची आवश्यकता आहे हें उघड आहे.

अतींद्रिय वस्तूच्या उपदेशाच्या दृढीकरणार्थ चमत्कार उपयोगी व अपेक्षित आहेत हा सिद्धान्त आपल्याइकडील प्रमाणांनीं कसा सिद्ध होतो हें वर दाखविलें. पण येथें आणखी एक आक्षेप उत्पन्न होतो त्याचा विचार केला पाहिजे. "जर येशूचा संदेश, श्रीकृष्णाचा संदेश, उद्दालक आरुणीचा 'तत्त्वमसि' संदेश, महंमदाचा संदेश, श्रीमदाचार्यांचा संदेश, ज्ञानेश्वराचा संदेश, इत्यादि भिन्न भिन्न संदेश आपआपल्या चमत्कारांनीं दृढ होऊन आप्तोपदेश मानले गेले तर सर्वच संदेश आपल्यास मान्य करावे लागून मनुष्याची फसगत होईल. मग ख्रिस्ती धर्म खरा, कीं मुसलमानी खरा, कीं भागवत धर्म खरा, ह्याचा निर्णय कसा व्हावा? कारण या सर्व उपदेशांना चमत्काराचें पाठबळ आहे असें तुम्ही मानतां. सर्व धर्मांच्या मतांनां जोर देऊन मनुष्यास मोह उत्पन्न करण्याचें परमेश्वराच्या मनांत खचित नाहीं. तेव्हां "सर्व धर्मांतील चमत्कार खरे असणें शक्य नाहीं. कोणत्या तरी एका धर्माचे चमत्कार खरे असले पाहिजेत." असें कोणी म्हणेल. ही अडचण ख्रिस्ती धर्मास आहे, महंमदी धर्मास आहे, पण हिंदुधर्मास नाहीं. जर एक धर्माचे चमत्कार खरे आहेत, तर दुसऱ्या धर्माचे कां नाहींत हा प्रश्न पूर्वींच आपण आस्तिपक्षींच सोडवला आहे. उदात्त स्वरूपाच्या हिंदुधर्मास सर्व धर्मांतील चमत्कार मान्य आहेत. आमच्या धर्माचे लोक स्वर्गाला जातील व अन्य धर्माचें यथोक्त आचरण करणारे पुण्यपुरुषहि स्वर्गाला किंवा सद्गतीलाच जातील असें आमचें मत आहे. सर्व धर्मांचीं मूलतत्वें एक आहेत. परमेश्वरास अचिंत्य व अगाध शक्ति असून त्यानें हे सर्व जग उत्पन्न केलें आहे, मनुष्यांत ईश्वरांश असून तो ईश्वराशीं तादात्म्य पावूं शकतो, परमेश्वराच्या अनन्य भक्तीनें मनुष्यास

मोक्ष मिळूं शकतो, नीति व परोपकार हीं सर्वांना मान्य असून तद्रूप आचरण ठेवण्याचा प्रत्येकानें यत्न केला पाहिजे, इत्यादि गोष्टी सर्व धर्मांत असून त्यांचाच पाया धर्मांतील चमत्कारांनीं मजबूत होतो. इतर फरक केवळ देशभेदाचे किंवा कालभेदाचे आहेत. ( लहानसहान भिन्न मताच्या समर्थनार्थ चमत्कार होत नाहींत असें पाश्चात्य विद्वानांचें मत आहे. ) नानाप्रकारचे पोशाख घातले असले तरी पोषाकाच्या आंत मनुष्य एक आहे; तद्वत् धर्मानें अनेक भिन्न भिन्न स्वरूपें धारण केलीं तरी सर्व धर्मांचा आत्मा एक आहे, सर्व धर्मांत पोंचावयाचें ठिकाण एक आहे, निरनिराळ्या वाटांनीं एकाच ठिकाणीं जावयाचें आहे; वेदान्त भाषेनें बोलावयाचें तर विद्याभेदानें वेद्यभेद होत नाहीं. अहरहोपासना, पंचाग्नि उपासना इत्यादि उपासना निराळ्या असल्या तरी उपास्य एकच आहे. यामुळें अमुक धर्मांतील चमत्कार खोटे असें मानण्याचें प्रयोजन नाहीं. आम्हां हिंदु लोकांस मुसलमानी, ख्रिस्ती किंवा इतर धर्मांतील सत्पुरुष मान्य कां वाटतात याचें बीज हेंच आहे. कारण भिन्न रस्त्यानें जरी गेले असले तरी शेवटीं संत एकाच मुक्कामावर पोंचतात, ते सर्व त्या मुक्कामासंबंधानें सहजच एक भाषा बोलतात, एकच हकीकत सांगतात, आणि यामुळें ते आम्हांस सारखेच वंद्य वाटतात. सारांश, वास्तविक विचार केल्यास सर्व धर्मांतील मान्य चमत्कार कबूल केल्याने दिव्योपदेशाकरितां चमत्कार होतात, या सिद्धान्ताला बाध येत नाहीं, असेंच म्हणावें लागतें.

वाचक हो, चमत्कार होतात कीं नाहींत व होत असतील तर ते कसे व कां होतात ? या आपल्या विषयाच्या दोन चढणी याप्रमाणें चढून आपण आतां 'चमत्कारांची उपपत्ति काय ?' या तिसऱ्या व शेवटच्या चढणीशीं येऊन पोंचलों आहों. ही चढण

डोंगराच्या शेवटच्या चढणीप्रमाणेंच अगदीं उभी व कठीण आहे; तथापि तेथून दिसणारा प्रदेश अत्यंत रमणीय आहे. ह्यासाठीं आपण थोडीशी विश्रांति घेऊन हीहि चढण चढण्याचा प्रयत्न पुढच्या भागांत करूं.

---

## चमत्कार [ उत्तरार्ध. ]



पुरुषं सोम्योत हस्तगृहीतमानयन्त्यपहार्षीत् स्तेयमकार्षीत् परशुमस्मै तपतेति स तस्य यदि कर्ता भवति ततएवानृतमात्मानं कुरुते सोऽनृताभिसन्धोऽनृतेनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स दह्यतेऽथ हन्यते ॥ अथ यदि तस्याकर्ता भवति तत एव सत्यमात्मानं कुरुते स सत्याभिसन्धः सत्येनात्मानमंतर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स न दह्यतेऽथ मुच्यते ॥ न यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳसर्वं तत् सत्यꣳस आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजाज्ञाविति–छांदोग्य, १६ खण्ड ।

मागील लेखांत चमत्कार होतात कीं नाहींत व होतात ते कसे व कां होतात, या मुद्यांचें विवेचन झालें. या लेखांत चमत्कारांची उपपत्ति काय हें आपणांस पाहावयाचें आहे. हें पाहण्यास आपणांस छांदोग्य उपनिषदांतील 'तत्त्वमसि श्वेतकेतो' हें उपाख्यान अत्यंत उपयोगी पडेल. किंबहुना मी आपल्या सर्व विषयास हेंच उपाख्यान विषयवाक्याप्रमाणें घेतलें असतें तरी चाललें असतें. कारण ( १ ) चमत्कार होतात कीं नाहींत, ( २ ) ते कसे होतात आणि ( ३ ) त्यांची उपपत्ति काय, या तिन्ही प्रश्नांचा निर्णय या उपाख्यानांत आहे. " सर्व जगताला सूक्ष्मपणें व्यापून राहिलेलें जें

सत्यपरमतत्त्व—तेंच ब्रह्म—तेंच तूं आहेस." हा महान् सिद्धान्त उद्दालक आरुणि आपल्या श्वेतकेतु नामक पुत्राला समजावीत असतां अनेक दृष्टान्त दिले तरी श्वेतकेतु 'मला समजलें नाहीं, आणखी सांगा' असें म्हणत राहिला; तेव्हां शेवटीं उद्दालक आरुणीनें मथळ्यांत निर्दिष्ट केलेला दृष्टान्त दिला. 'मुला, एखाद्या पुरुषाला तूं चोरी केलीस असें म्हणत हातानें धरून आणतात आणि म्हणतात याच्याकरितां परशु तापवा, तेव्हां जर तो त्या चोरीचा करणारा असेल तर तो अनृताला आपला आत्मा करितो आणि याप्रमाणें अनृताभिसंध होऊन आपल्या आत्म्याला अनृताचें आवरण करून तप्त परशु हातांत घेतो आणि भाजला जाऊन मारला जातो. पण तोच जर चोरी करणारा नसेल तर तो सत्याला आपला आत्मा करतो आणि याप्रमाणें सत्याभिसंध होऊन आपल्या आत्म्याला सत्याचें आवरण करून तप्त परशु हातांत घेतो, त्यावेळेस तो भाजला न गेल्यामुळें लागलाच सोडला जातो. तर तो जसा भाजला जात नाहीं, त्याप्रमाणेंच ऐतदात्ममय हें सर्व आहे; तेंच सत्य, तोच आत्मा अथवा ब्रह्म आणि श्वेतकेतू तेंच तूं आहेस !" असें म्हणतांच तें त्यांस समजलें. या उताऱ्यांवरून प्रथम ही गोष्ट आपल्या निदर्शनास येते कीं, चमत्कार कधीं कधीं घडतात या गोष्टीची साक्ष आपल्यास प्रत्यक्ष उपनिषदांत सांपडते. सर्व ग्रंथांत उपनिषदें अत्यंत मान्य आहेत, याजबद्दल विस्तृत विवेचन करण्याची जरूरी नाहीं. धार्मिक दृष्ट्या श्रुतिप्रामाण्य सर्वांत श्रेष्ठ आहेच; पण ऐतिहासिकदृष्ट्याहि वरील साक्षीस अत्यंत महत्त्व आहे. तप्त परशु हातांत दिला असतांहि हात भाजत नाहीं म्हणजे हाताची कातडी जळत नाहीं, हा एक खरा चमत्कार आहे; कारण जी गोष्ट सृष्टि-नियमाच्या विरुद्ध आहे, ती गोष्ट कधीं कधीं होते हें वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसतें. दुसरें,

चमत्कार केवळ दिव्योपदेशाच्या दृढीकरणार्थ होतात असा जो पाश्चात्य विद्वानांचा सिद्धान्त आहे, तो मागील लेखांत दर्शविल्याप्रमाणें अपुरा आहे, हें याजवरून दिसतें. ज्यावेळेस साधुपुरुषांचा अन्तरात्मा परमेश्वराशीं तादात्म्य पावतो त्यावेळेस कधीं कधीं चमत्कार होतात, असें वरील उदाहरणावरून स्पष्ट होतें. निरपराध्यास चोर म्हणून पकडून आणून तप्त परशु त्याचे हातीं देतात, त्यावेळेस त्याचें मन सत्याभिसंध होऊन तो सत्याचें आवरण घेतो यामुळें त्यास अग्नि भाजीत नाहीं.

अशा प्रकारचे कित्येक चमत्कार दिव्योपदेशाव्यतिरिक्त होतात. द्रौपदीवस्त्रहरणाचा चमत्कार याच प्रकारचा आहे हें निराळें सांगणें नको. पाश्चात्य तत्त्ववेत्ते अशा प्रकारचे चमत्कार कधीं कधीं झाल्याचें कबूल करतात. The principal portion of the Gospel miracles were, besides being proofs of doctrine, also acts of mercy and sympathy. They were not only acts of power but also acts of love. तात्पर्य, अशा प्रकारचे चमत्कार केवळ परमेश्वराच्या कृपाकटाक्षानें कधीं कधीं घडतात. अशा चमत्कारांनीं धर्माचेंहि कार्य होतें; म्हणजे प्रत्यक्ष जरी श्रुतिप्रामाण्याकरितां ते चमत्कार झालेले नसले तरी परम्परेनें तेंच कार्य होतें. असो तर, दोन्ही मुद्यांवर हें उपनिषदांतील उपाख्यान लागू आहे. तथापि विशेषतः या उपाख्यानाचा संबंध आपल्या तिसऱ्या मुद्याशीं आहे. चमत्कारांची उपपत्ति काय ह्या प्रश्नासंबंधानें या उपाख्यानांत, विशेषतः या शेवटच्या दृष्टांतांत विवेचन आहे. तें कसें तें आपण पाहूं.

श्वतकेतूचें उपाख्यान वाचीत असतां प्रत्येक चौकस मनुष्याच्या मनांत असा प्रश्न उपस्थित झालाच पाहिजे कीं, अनेक दृष्टान्तांनीं

श्वेतकेतूला उद्दालक आरुणीनें विषय समजाविला असतां तो त्यास समजला नाहीं; पण शेवटला चमत्काराचा दृष्टान्त दिला तेव्हां तो समजला. यांतलें रहस्य काय? आपण श्वेतकेतूच्या ठिकाणीं आह्मों असें कल्पिलें तर पूर्वदृष्टान्तांनीं जें आपल्यास समजलें नाहीं तें आपल्यास या दृष्टान्तानें समजलें अशी आपली तरी स्थिति होते काय? गुरु वारंवर समजावीत असतां शिष्य कंटाळून गुरूच्या do you understand या प्रश्नाला कोठें तरी हो म्हणतो; तशांतला हा प्रकार आहे किंवा खरोखरच या शेवटल्या दृष्टान्तांत डोक्यावर हातोडा पडावा आणि सिद्धान्त योग्य जागीं बसावा असा कांहीं विलक्षण जोर आहे काय? एकंदर उपनिषदांच्या विवेचनपद्धतीचा व सामर्थ्याचा विचार केला असतां पहिलें अनुमान संभवत नाहीं. उपनिषदासारखें गंभीर तत्त्वज्ञानानें भरलेलें असूनमि अत्यंत वक्तृत्वशाली गद्य पृथ्वीच्या पाठीवर कोणत्याहि भाषेंत नाहीं. तेव्हां कांहीं तरी दृष्टान्त देऊन कोठें तरी हो म्हणण्याचा प्रकार यांत असेल असें संभवत नाहीं. वक्तृत्वाच्या नियमाप्रमाणें उत्तरोत्तर उत्कर्ष यांत असला पाहिजे हें उघड आहे. बृहदारण्यकांत असा वक्तृत्वाचा व विवेचनाचा उत्तरोत्तर उत्कर्ष केला असून तेथें एका खुबीदार युक्तीनें तो स्पष्टहि केला आहे. एका याज्ञवल्क्य-जनक-संवादांत प्रत्येक याज्ञवल्क्याच्या भाषणाच्या अंतीं ‘ भगवते सहस्रं ददामि अत उर्ध्वं विमोक्षायैव ब्रुहि।” असें जनक म्हणतो आणि शेवटीं जेथें peroration अथवा उत्कर्ष झाला आहे तेथें “ भगवते विदेहान् ददामि मां चापि सह दास्याय ” असा उद्गार जनकाच्या तोंडून निघतो. असो तर, या श्वेतकेतूच्या आख्यानांत असाच उत्तरोत्तर उत्कर्ष केलेला असून शेवटच्या उदाहरणांत असें कांहीं रहस्य भरलें आहे कीं, तें ऐकतांच श्वेतकेतूच्या डोक्यावर घणासारखा ठोका बसून तो सिद्धांत

त्यास तात्काळ समजला. हें रहस्य कोणतें हा एक मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. तो प्रत्येक उपनिषदांच्या वाचणाऱ्यानें सोडविण्याचा प्रयत्न करावा. तो प्रश्न मला जसा सुटला आहे तसा मी वाचकांपुढें मांडणार आहें; पण वाचकांनीं आपल्या मनाशीं प्रथम थोडासा विचार करावा, म्हणजे यांतील मर्म व सौंदर्य त्यांच्या लक्षांत येईल. यासाठीं या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं मी थोडेंसें विषयांतर—पण जरूरी विषयांतर-करितों.

चमत्काराची उपपत्ति पाश्चात्य विद्वानांनीं निरनिराळ्या रीतीनें लावण्याचा जो यत्न केला आहे, तो त्यांच्या ईश्वरविषयक निरनिराळ्या कल्पनामुळें भिन्न भिन्न झाला आहे, हे लक्षांत ठेवलें पाहिजे. ईश्वर आहे असें गृहीत करून किंवा सिद्ध समजून परमेश्वरानें सृष्टि कशी उत्पन्न केली व परमेश्वराचा सृष्टीशीं काय संबंध आहे, या प्रश्नाचा उलगडा ज्या रीतीनें करावा त्या रीतीनें चमत्कारांची उपपत्ति निरनिराळी करावी लागेल हें उघड आहे. हा विषय धार्मिक तत्त्वज्ञानाचा असून अत्यंत गहन आहे. त्याचा सांगोपांग येथें ऊहापोह केल्यास लेखाचा विस्तार फारच होईल; म्हणून ख्रिस्तीधर्माभिमानी या विषयासंबंधानें काय मत देतात तेवढें थोडक्यांत सांगतों. त्याजवरून आपले ब्राह्मण-तत्त्ववेत्ते काय प्रतिपादन करतात व त्या प्रतिपादनानें चमत्कारांची उपपत्ति निराळ्या तऱ्हेनें कशी लागते हें वाचकांच्या चांगलें लक्षांत येईल. ब्राह्मणांनीं म्हणजे आपल्या पूज्य पूर्वजांनीं याविषयीं फार खोल विचार केला आहे, हें सांगावयास नको. त्यांचे विचार अजूनहि विद्वान् लोकांस मान्य व पूज्य आहेत. ब्राह्मणतत्त्ववेत्ते व ग्रीक तत्त्ववेत्ते यांच्या विचारांच्या मानानें अलीकडील ख्रिस्ती तत्त्ववेत्यांचे विचार अधिक मूळस्थितींतल्या कल्पना आहेत, असें पाश्चात्य विद्वान् कधीं

कधीं कबूलही कारितात. * सारांश आपल्या इकडील ईश्वरसृष्टि-विषयक विचार समजून घेण्याकारितां प्रथम ख्रिस्ती तत्त्ववेत्यांचे विचार वाचकांपुढें मांडल्यास बरें पडेल व त्यांजवरून त्यांनीं दिलेली चमत्कारांची उपपत्ति वाचकांच्या लक्षांत येईल.

परमेश्वराच्या सृष्टि निर्माण करण्यासंबंधें ख्रिस्ती तत्त्ववेत्त्यांचें असें मत आहे कीं, त्यानें आपल्या अगाध शक्तीनें ती शून्यापासून निर्माण केली. " कथमसतःसज्जायेत । " "नसत्यापासून असतें कसें उत्पन्न होईल " ही उपनिषदांची पृच्छा येथें साहजिकच उपस्थित होते. पण याजला प्रत्युत्तर असें देतां येईल कीं परमेश्वराचें Omnipotence अथवा सर्व शक्तिमत्व कबूल केलें म्हणजे ही गोष्ट संभवनीय आहे. एक अगाध व अचिंत्य शक्तीचा परमेश्वर तुम्हीं मानलात म्हणजे शून्यापासून सृष्टि उत्पन्न करणें त्यास शक्य आहे हें साहजिक निघतें. बरें, " सत्त्वेव सोम्येदमग्र आसीत् " असें उपनिषदें म्हणतात त्याप्रमाणें तुम्ही मानलें तर जें सृष्टीचें बीज अथवा matter पूर्वीपासून आहे, त्याचीच, सुतार लांकडाची पेटी बनवितो त्याप्रमाणें, परमेश्वरानें सृष्टि बनविली असें तुम्हांस म्हणावें लागतें. यांत matter अथवा प्रकृति पूर्वीपासून आहे, हें तुम्हांस मानावें लागल्यानें परमेश्वराच्या बरोबरीची एक अनादि अनंत दुसरी कोटि तुम्हांस मानावी लागते. या मानण्यांत परमेश्वराच्या उच्च कल्पनेला हानि आहे हें उघड आहे. परमेश्वर व प्रकृति दोन्ही अनाद्यनन्त

---

* The idea of the Supreme Being now is more primitive and more imaginative than the idea of the ancient Brahmin or Alexandar in philosopher ; it is an idea which both would have derided as the notion of a child ( Morley on Miracles ).

मानणें तर्काला जुळून येत नाहीं. सांख्यांनीं प्रकृति व पुरुष अशा दोन समकोटि मानल्या आहेत; पण सांख्यांचा पुरुष परमेश्वराहून भिन्न व कमी दर्जाचा आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. सांख्य निरीश्वरवादी आहेत असें जें समजलें जातें, त्याचें हें एक मुख्य कारण आहे. असो, परमेश्वर अद्वितीय, अनाद्यनन्त, सर्वशक्तिमान्, सृष्टीचा उत्पन्नकर्ता इत्यादि लक्षणांनीं युक्त असेल तरच तो परमेश्वर आहे हें उघड आहे. आतां, असा पग्मेश्वर मानला तरी त्यानें सृष्टि शून्यापासून उत्पन्न केली असें प्रतिष्ठित तर्काला कांहींसें अयुक्त विधान करावें लागतें हें खरें आहे. ही अडचण वेदांत्यांनीं एका विलक्षण कल्पनेनें दूर केली आहे. परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न केली ती आपल्याच शरीरापासून केली; शून्यापासून केली नाहीं असा वेदान्त्यांचा सिद्धान्त आहे. या सिद्धान्तास अभिन्ननिमित्तोत्पादान-सिद्धान्त म्हणतात. सुतार लाकडाची पेटी करतो या लौकिक दृष्टान्तांत सुतार हें पेटीचें निमित्त-कारण आहे आणि लांकूड हें उपादानकारण आहे. परमेश्वर सृष्टि करतो, या वाक्यांत परमेश्वर सृष्टीचा निमित्त-कारण आहे, पण यांत उपादानकारण दाखविलेलें नाहीं. अर्थात् उपादान कांहीं नव्हतें असें मानावें लागतें. पण वेदान्त्यांनीं सृष्टीचें उपादान-कारण परमेश्वरच आहे असें मानलें आहे. हा सिद्धान्त तर्काच्या दृष्टीनें अधिक सुयुक्तिक आहे, इतकेंच नव्हे तर त्यापासून पुढील अडचणी उपस्थित होत नाहींत. त्या कशा हें पाहूं. परमेश्वरानें सृष्टि शून्यापासून उत्पन्न केली, हें म्हणणें परमेश्वराच्या अचिंत्य शक्तित्वाच्या कल्पनेनें सुयुक्तिक धरतां येईल व त्याप्रमाणें ख्रिस्ती तत्त्ववेत्त्यांनीं तें धरलें आहे. आतां यापुढें प्रश्न असा कीं, परमेश्वरानें सृष्टि निर्माण करून तिला कांहीं विशिष्ट गुणरूपकर्म लावून दिलें आहे, त्यांत तो ढवळाढवळ करूं शकतो कीं नाहीं? निदान तो करतो कीं काय? सृष्टि निर्माण

करून तीस नियमबद्ध सुरळीत चालू करून परमेश्वरानें आपल्या शक्तिमत्त्वाला कांहीं मर्यादा स्वतः घालून दिली आहे असें कित्ये-कांचें म्हणणें आहे. सर्व कायद्यांचें उगमस्थान राजा जसा कायदे घालून आपल्याला कांहीं अंशीं बांधून घेतो, तसें परमेश्वरानें आप-णांस बांधून घेतलें आहे. असें नसेल तर कायदे किंवा नियम घालून देऊन ते स्वतः मोडणें शिस्त सोडून किंवा अन्यायीपणाचें होईल. यासाठीं चमत्कार होतात, म्हणजे सृष्टिनियमाविरुद्ध कांहीं गोष्टी होतात, हें म्हणणें परमेश्वराच्या अचिंत्य शक्तित्त्वाला जरी विरोधी नाहीं, तरी त्याच्या न्यायीपणास किंवा शिस्तीस बाधक आहे, असा आक्षेप घेतां येईल. हा आक्षेप विचार केला तर टिकण्यासारखा नाहीं हें खरें आहे. परमेश्वरास प्रसंगविशेषीं आपणच घालून दिलेले कायदे बंद ठेवतां येत नाहींत, असें मानलें तर परमेश्वराची कोटि तरी कशाकरितां माना-वयाची ? नुसती सृष्टि उत्पन्न करण्यासाठीं ? यापेक्षां. सांख्याचे पुरुष आणि प्रकृति म्हणजे नपुंसक पुरुष आणि चवचाल, चंचल, सर्व खेळ करणारी प्रकृतिच कां मानूं नये ? परमेश्वर सर्वशक्तिमान् आहे, या कल्पनेंत त्यास इच्छा आहे ही कल्पना अन्तर्भूत होते. तो व्यक्ति विशिष्ट व इच्छाविशिष्ट आहे हें गृहीत होतें. असा परमेश्वर मानाव-याचा नसेल तर त्यास केवळ इच्छाविरहित एक चेतन-प्रधान पुरुष सांख्याप्रमाणें मानल्यास कोणता बाध येणार आहे ? परमेश्वरास सृष्टीच्या व्यवहारांत कांहींच अधिकार नाहीं असें मानावें, तर भौतिक तत्त्ववेत्त्यांच्या आदिकरणांत आणि सर्व धर्मांनीं मान्य केलेल्या परमेश्वरांत तरी फरक काय ? परमेश्वराची प्रार्थना तरी मग कशासाठीं करावयाची ? सारांश जगताला एकदां नियम बांधून देऊन चालू केल्यावर परमेश्वरास त्यांत कांहीं अधिकार किंवा संबंध उरला नाहीं, असें मानण्यांत परमेश्वराच्या

उच्च कल्पनेची हानि आहे हें उघड आहे. राजाच्या उदाहरणांतहि राजा प्रजेच्या वर्तनासाठीं कायदे घालून देतो आणि ते कायदे आपण मोडीत नाहीं, हें जरी खरें आहे, तरी प्रसंगविशेषीं नवा कायदा करण्याचा किंवा जुना कायदा बंद ठेवण्याचा अधिकार राजास असतो. इतकेंच नव्हे, तर कांहीं विशिष्ट व्यक्तीला माफी देण्याचा अधिकार राजास असतो हें आपण पाहतों. अशा प्रकारचा अधिकार राजास किंवा प्रेसिडेंटास दिल्यावांचून राज्याचें काम सुयंत्रित चालावयाचें नाहीं. सारांश, परमेश्वरास जगताच्या व्यवहारांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार असणें अन्यायाचें किंवा शिस्तीविरुद्ध आहे असें म्हणतां येणार नाहीं.

परमेश्वरानें आपल्या अचिंत्य शक्तीनें सृष्टि उत्पन्न केली असून त्याच्याच सत्तेनें व इच्छेनें ती चालते व त्याच्याच सत्तेनें ती लयास जाते, असा सिद्धान्त सर्व धर्मांचा आहे, व तो परमेश्वराचें अस्तित्व कबूल केलें म्हणजे साहजिकच प्राप्त होतो. या सिद्धान्ताविषयीं सर्व धर्मांचें ऐकमत्य आहे. खिस्ती लोकांचा ईश्वर किंवा मुसलमानांचा अल्लाह किंवा संतांचा विठ्ठल सर्व जगताचा जनक, पालक व मारक आहे. तो दयाळू असून न्यायी आहे; तरी तो सदाचरणी भक्तांचा कैवारी आहे; अर्थात् त्याच्या इच्छेनें कधीं कधीं भक्तासाठीं किंवा श्रुतीच्या प्रामाण्यासाठीं चमत्कार होतात. ही उपपत्ति अगदीं सरळ व सोपी आहे. जगताचा उत्पन्नकर्ता व पालनकर्ता सर्वशक्तिमान् परमेश्वर मानला म्हणजे चमत्कारांच्या उपपत्तीचें गूढ मुळींच राहात नाहीं, हें उघड आहे. त्याच्या इच्छेनें प्रसंगविशेषीं सृष्टीचे नियम बदलूं शकतात किंवा बंद होऊं शकतात. त्याच्या इच्छेनें पाणी बुडवूं शकत नाहीं किंवा अग्नि जाळूं शकत नाहीं. अशा प्रकारची इच्छा तो एखाद्या प्रबळ लहरी [illegible]

वाटेल तेव्हां किंवा वारंवार अमलांत आणीत नाहीं, तर फारच क्वचित, प्रसंगविशेषीं, प्रजेच्या हितासाठींच, दयाळूपणानें व न्यायीपणानें अमलांत आणतो आणि म्हणूनच चमत्कार क्वचित् प्रसंगीं होतात; ते संतांच्या व सत्पुरुषांच्या हातून दिव्य उपदेशाच्या वेळीं किंवा संकटसमयीं होतात. वारंवार किंवा थोडक्या प्रसंगासाठीं होत नाहींत. अशी चमत्कारांची उपपत्ति खिस्ती धर्माभिमानी तत्त्ववेत्त्यांनीं लावली आहे व ती सरळ व सुयुक्तिक असून परमेश्वराच्या योग्य कल्पनेपासूनच निघणारी आहे हें उघड आहे.

पण ही उपपत्ति वर म्हटल्याप्रमाणें कांहींशी प्राथमिक स्वरूपाची व कल्पनायुक्त आहे हें कबूल करावें लागेल. या उपपत्तीनें कित्येक लोकांचें समाधान होणार नाहीं. कित्येक लोकांच्या मनास परमेश्वर सृष्टीच्या नियमांत ढवळाढवळ करतो हें चमत्कारिक लागतें. परमेश्वरास सर्वशक्तिमत्व आहे हें जरी मान्य आहे, तरी या शक्तीचा अशा रीतीनें परमेश्वर कधीं उपयोग करीत नाहीं असेंच मानणें त्यांस सुयुक्तिक वाटतें. हें वाटणेंहि सन्मान्य आहे हें कबूल करावें लागेल. या कारणानें, इतर पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनीं चमत्कारांच्या अन्य उपपत्ति लावण्याचा वारंवार प्रयत्न केला आहे. चमत्कार घडतात ते कांहीं अंशीं सृष्टिनियाप्रमाणेंच घडतात असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण हें म्हणणें सुयुक्तिक होणार नाहीं हें उघड आहे. कारण मग चमत्काराचें चमत्कारत्वच नष्ट होतें. जर विशिष्ट प्रकारच्या हठयोगाच्या क्रियेनें विशिष्ट प्रकारची शक्ति सृष्टिनियमानेंच निरंतर व अबाधित प्राप्त होते तर तो चमत्कारच नव्हे. जर अदृश्य कोटींतले मनुष्याहून उच्च दर्जाचे कांहीं महात्मे अस्तित्वांत असून ते मनुष्यास आपल्या विशिष्ट सामर्थ्याचा फायदा नियमानें देतात हा एक सृष्टीचा भागच असेल, तर तो चमत्कार नव्हे. सारांश, अमुक

तऱ्हेनें हवेंतून जाण्याचें विमान केलें असतां आकाशांतून नियमाने व निश्चयानें मनुष्यास जसें जातां येतें, मग तो मनुष्य ईश्वरभक्त असो किंवा ईश्वरद्वेषी असो; तसेंच जर कांहीं विशिष्ट क्रियेनें सृष्टिनियमानुसार मनुष्यास अलौकिक सामर्थ्य प्राप्त होत असेल तर तो चमत्कार नव्हे. ही चमत्कारांची अज्ञात नियमाची उपपत्ति ठीक नाहीं हें उघड आहे. आणखी निरनिराळ्या तऱ्हेनें चमत्कारांची उपपत्ति लावण्याचा यत्न पाश्चात्य विद्वानांनीं केला आहे, तो सर्व नीट समजून घेऊन वाचकांस समजावून सांगण्याचा मी प्रयत्न करीत नाहीं. तो Encyclopaedia Britannica मधील Miracle या शब्दाखालील लेखांत कोणासहि पहावयास मिळणार आहे. पण वेदान्ताच्या अभिन्ननिमित्तोपादान-सिद्धान्ताप्रमाणें चमत्कराची उपपत्ति कशी लागू शकते, हें मी मथळ्यांत दिलेल्या उद्दालक-श्वेतकेतु-संवादावरून वाचकांपुढें मांडतों. तो संवाद वाचकांनीं मूळ अगर भाषांतररूपानें आपल्यापुढें ठेवावा अशी त्यांस येथें विनंति आहे.

सर्व सृष्टीला सूक्ष्मत्वानें व्यापून राहणारें जें तत्त्व तेंच सत्य, तें आत्मा, तेंच तूं, हा परमसिद्धान्त मुलास समजावीत असतां उद्दालक आरुणीनें प्रथम असा दृष्टान्त दिला कीं, "मधुकर निरनिराळ्या पुष्पांतून मधु जमा करतात. पण मधु जमल्यावर जसें कोणत्याहि मधुबिंदूस हें भान रहात नाहीं कीं, मी अमुक वृक्षाच्या फुलांतून आलों, त्याप्रमाणें व्याघ्र, वराह, कीट, मशक इत्यादि प्राण्यांचा आत्मा जेव्हां समष्टि-स्वरूपांत लीन होतो तेव्हां हा आत्मा निराळा असा फरक राहत नाहीं. सारांश, सर्व सृष्टीचा आत्मा एक आहे व तोच तूं आहेस." श्वेतकेतु २५ वर्षांचा सर्व वेदविद असून शास्त्रसंपन्न व तर्कविशारद होता. त्यानें मनांत विचार केला कीं, सर्व आत्मे एका ठिकाणीं गेले तरी जशी नानाप्रकारचीं धान्यें एका ठिकाणीं केलीं

असतांहि त्यांचें भिन्नत्व कायम राहतें त्याप्रमाणें त्या आत्म्यांची स्थिति कशावरून नसेल ? किंबहुना मधुबिंदूंचीहि भिन्नरुचि एकेठिकाणीं मध झाली असतांहि ध्यानांत येणें शक्य आहे. निरनिराळ्या फुलांच्या मधूंचे निरनिराळे गुण वैद्यकांत सांपडतात. तेव्हां श्वेतकेतूनें 'समजलें नाहीं, भगवान् आणखी समजावा ' असें उत्तर दिलें. मुलाच्या मनांत आलेली शंका ओळखूनच उद्दालकानें दुसरा दृष्टान्त दिला. नाना दिशांच्या नद्या समुद्रास नाना दिशांनीं जाऊन मिळतात, त्या समुद्रास मिळाल्यावर जसें त्यांच्या लक्षांत हें राहणें शक्य नाहीं कीं, मी अमुक नदी, मी तमुक नदी, त्याप्रमाणें व्याघ्र, वृक, वराह, कीट, पतंगमशकादिकांचे आत्मे एके ठिकाणीं गेले असतां त्यांचें भिन्नत्व कायम राहत नाहीं." हा दृष्टान्त समर्पक आहे; पण याचे व मागील दृष्टान्ताचे मुळाशींच शंका ही कीं, सर्वांचे जीव ज्याप्रमाणें नद्या समुद्रांत जातात, त्याप्रमाणें एके ठिकाणीं जातात याला काय प्रमाण ? आणि जीवच जर नश्वर असेल तर त्याला जाणेंहि संभवत नाहीं. ही कल्पना मनांत येऊन पुन्हां श्वेतकेतूनें ' समजलें नाहीं ' म्हणून उत्तर दिलें. त्याजवर उद्दालकानें त्याची शंका लक्षांत आणून जीव मरत नाहीं, जीव अमर आहे, हें वृक्षाच्या दृष्टान्तानें सांगितलें. वृक्षाला कोठेंहि टोंचलें तरी त्यांतून रस वाहतो. हा रस जेव्हां एकाद्या शाखेंतून वाहणें बंद होतें, तेव्हां ती शाखा मरते. सर्व वृक्षांत रस वाहणें बंद होतें, तेव्हां सर्व वृक्ष मरतो. तात्पर्य, जीवरूपी रस जेव्हां वृक्षाच्या फांदीला, अथवा सर्व वृक्षाला सोडतो तेव्हां फांदी अथवा वृक्ष मरतो यावरून जीव मरत नाहीं, जीवापेत सर्व मरतें, जीव अमराचा अंश आहे. असें सांगितल्यावर, रसाप्रमाणें जीव दृश्य-स्वरूप नाहीं, तो अणु व अदृश्य स्वरूपाचा आहे, हें समजाविण्याकरितां वटवृक्षाच्या बारीक बीजाचा दृष्टान्त उद्दालकानें दिला. एक लहान

बीजांत ज्याप्रमाणें प्रचण्ड वटवृक्ष उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असतें, त्याप्रमाणें सूक्ष्म व अणु अशा जीवांतहि भिन्न भिन्न सृष्टि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असतें. हा अणु–जीव सर्व शरीर व्यापून असतो, एकाच लहान भागांत नसतो, हें समजाविण्यासाठीं पाण्यांत टाकलेल्या मिठाचा दृष्टान्त यापुढें दिला. पाण्यांत टाकलेलें मीठ जरी दिसत नाहीं व निराळें करतां येत नाहीं, तरी तें पाण्याच्या प्रत्येक बिंदूंत आहे हें पाण्याचा कोणताहि भाग चाखून पाहिला असतां समजतें. पाण्यांत मिसळलेल्या मिठाप्रमाणें जीव सर्व देह व सृष्टि व्यापून राहतो, असें श्वेतकेतूला उद्दालकानें समजाविलें. यावर पुन्हा शंका उत्पन्न होते ती ही कीं, पाणी आणि मीठ हें जर निराळें आहे तर सृष्टि आणि जीव हे निराळे असले पाहिजेत, आणि जीव आणि परब्रह्म सुतराम् निराळे असले पाहिजेत. तेव्हां ‘ तत्सत्यं स आत्मा-तत्त्वमसि ’ याची समजूत कशी पटावी ? सर्व सृष्टीला भरून एक सूक्ष्म तत्त्व आहे असें मानलें तरी तें सृष्टीहून निराळें आहे हें ठरतेंच. बरें, मिठाला पाण्याचें स्वरूप कधीं यावयाचें नाहीं; वटाला कधीं आम्र-फळ लागावयाचें नाहीं. सारांश, सर्व सृष्टींत भिन्नपणा कायमचा भरलेला आहे, जीवेशांतहि तो असलाच पाहिजे. अशा प्रकारचे तर्क-वितर्क मनांत येऊन श्वेतकेतूनें ‘ समजलें नाहीं ’ असा जबाब दिला आणि ‘ मला पुन्हा समजावा ’ अशी विनंति केली.

यानंतर जो दृष्टान्त उद्दालकानें दिला आहे तो फारच मनोरम आणि आपल्या विषयाला लागू आहे. उद्दालक म्हणतो “ बाबारे, आपण सर्व त्या परब्रह्मापासूनच आलों आहों, परंतु तें आपल्या लक्षांत येत नाहीं. तें सत्पुरुषानें समजाविलें म्हणजे लक्षांत येतें. याला दृष्टान्त; जसें एखाद्या मनुष्यास डोळे बांधून गांधार देशांतून

दूर लांब कोठें तरी न्यावें आणि मग त्याच्या डोळ्यांवरचा पट्टा काढावा; मग त्यास जसें माहितगार लोक 'ह्या दिशेला गांधारदेश आहे, ह्या दिशेला गांधारदेश आहे,' असें सांगतात, तेव्हां तो त्या दिशेनें गांवागांवांनीं जातो व त्याला खुणा पटत जातात; त्याप्रमाणें माहितगार सत्पुरुष परब्रह्माची आपल्यास वाट दाखवितात व आपण त्याच देशांतले असल्यानें खुणा पटत पटत आपण त्या देशाला जाऊन पोंचतों. तात्पर्य, ह्या गोष्टी आचार्यवान् पुरुषाला समजतात आणि त्या समजल्या म्हणजे मरणकाळीं मनुष्य मोक्षास जातो. ह्या दृष्टान्तावरून हें सिद्ध होतें कीं, अतींद्रिय अतर्क्य गोष्टी श्रुतीवांचून किंवा आप्तोपदेशावांचून कळावयाच्या नाहींत. सद्गुरु भेटून त्यांनीं त्या समजाविल्या असतां आपल्याला खूण पटत जाते व आपण शेवटच्या प्राप्तव्य मुक्कामाला जाऊन पोंचतों.

श्वेतकेतूच्या ठिकाणीं हल्लींच्या विसाव्या शतकांतील एखादा सुशिक्षित मनुष्य असता तर तो हा दृष्टांत ऐकून लागलीच म्हणता— "दृष्टांत उत्तम आहे; पण तो तुम्हीं सांगितला म्हणून कबूल करावयाचा कीं काय?" यांतच सर्व धर्मपंथांची व गुरूंची किल्ली भरली आहे. सद्गुरु भेटला म्हणजे आपल्याला उपदेश होऊन खुणा पटत जातील हें सर्व थोतांड आहे; आणि मोक्ष केव्हां मिळेल तर मेल्यावर! तेथून कोणी सांगावयास येत नाहीं, कीं मोक्ष असतो तो अशा प्रकारचा. मेल्या माणसावर हवाला दिला म्हणजे पाहिजेल तें सांगावें आणि तें खरें म्हणून मानावें. आम्ही परब्रह्मापासून आलों, सर्व जग परब्रह्मस्वरूपी आहे, तें सत्य आहे, आणि तें तूंच आहेस; हा सिद्धान्त सद्गुरूंनीं एकान्तांत सांगावयाचा; आमच्या मनांत खूण पटावयाची; आणि मेल्यावर आम्हांस मोक्ष मिळावयाचा. झालें; कोणालाच कांहीं समजायला नको. जसें कांहीं लबाड किंवा भोळे ख्रिस्ती झालेले

लोक सभेंत येऊन आमच्या अन्य:करणांत प्रकाश पडला अशी साक्ष देतात, त्याप्रमाणें भोळया किंवा लबाड वेदांत्यांनीं साक्षी पटवाव्या कीं, "आम्हांस खुणाखाणा पटल्या, आम्ही मोक्षाला जाणार." ह्याच आधुनिक विचारसरणीला अनुसरून श्वेतकेतूच्या मनाची स्थिति झाली असल्यास नवल नाहीं. सिद्धान्ताची शेवटची समजूत आप्त-वाक्यावर आली. पण जर पाणी हें मीठ नव्हे, लहान वडाच्या बीजांत प्रचंड वृक्ष तयार करण्याची शक्ति असली तरी त्यापासून आम्रवृक्ष होणें शक्य नाहीं, तर जगताचें भिन्नत्व नाहींसें कसें होणार व मनुष्य-व्याघ्र-वृकांचें तरी भिन्नत्व कसें जाणार ? आणि सर्व आत्मे एकरूप होतात, ते तरी मेल्यावर; तेथें काय होतें तें कोण सांगूं शकेल ? अशाच प्रकारच्या अनेक कल्पना उपस्थित होऊन बहुधा श्वेतकेतूनें 'मला समजलें नाहीं, भगवान् मला आणखी समजावा' असें प्रत्युत्तर दिलें.

खरोखर पाहिलें असतां ही शंकावृत्ति मान्य व विचारणीय आहे. जगताचें निमित्त व उपादान कारण एकच परमेश्वर आहे, तर जग-तांतील भिन्न भिन्न दिसणाऱ्या वस्तु वस्तुत: भिन्न नाहींत. त्यांचीं भिन्न भिन्न दिसणारीं गुणकर्में आगन्तुक, अवास्तव, किंवा—श्रीमच्छं-कराचार्य म्हणतात त्याप्रमाणें—मिथ्या आहेत. तसेंच सर्वांचे आत्मे एक असून परमेश्वररूप किंबहुना परमेश्वराभिन्न आहेत, तर या अभि-न्नत्वाची प्रतीति याच देहीं आणि याच डोळां कां येत नाहीं ? किंब-हुना एकाच वस्तूंत पाहिजेल त्या वस्तूंचें गुणकर्म कां प्रतीतीस येत नाहीं ? 'सर्वकर्म: सर्वकाम: सर्वगन्ध: सर्वरस:' इत्यादि ईशस्वरूपाचें भान पाहिजेल तेव्हां पाहिजेल त्या ठिकाणीं झालें पाहिजे; त्याला मध्यं-तरी विद्येची किंवा मृत्यूची किंवा स्वप्रत्ययाची अपेक्षा कां पाहिजे ? उप-निषदांतील दृष्टान्त फार मनोहर असतात. त्या मनोहरत्वाकडे आपलें

लक्ष वेधल्यानें मुख्य विषयावरील शंका कधीं कधीं बाजूस राहते. पण उपनिषदें इतकीं वक्तृत्वपूर्ण असूनहि तर्काला सोडून नाहींत, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. एक आत्मा अन्य अन्य योनींत कसा जातो याची समजूत बृहदारण्यकांत फारच मार्मिक व मनोहर दृष्टान्तांनीं दिली आहे. हे दृष्टान्त वेदान्त ग्रंथांतून वारंवार घेतले आहेत, "तद्यथा तृणजलायुका तृणस्यान्तं गत्वान्यमाक्रमाक्रम्यात्मानमुपसꣳहरति एवमेवायमात्मेदꣳशरीरं निहत्याविद्यां गमयित्वान्यमाक्रममाक्रम्यात्मानमुपसꣳहरति । तद्यथा पेशस्कारी पेशसोमात्रामुपादायान्यं नवतरं कल्याणतरꣳरूपं तनुत एवमेवायमात्मेदꣳशरीरं निहत्याविद्यां गमयित्वान्यन्नवतरं कल्याणतरं रूपं कुरुते ।" "जशी गवतावरची जळू काडीच्या शेवटीं जाऊन दुसऱ्या काडीला धरल्यावर, मागची काडी सोडून आपलें शरीर संकुचित करून दुसऱ्या काडीवर जाते, त्याप्रमाणें आत्मा एका शरीराला सोडून अविद्या दाखवून दुसऱ्या शरीरांत जातो. अथवा जसा एखादा सोनार सोन्याचा एक दागिना घेऊन त्याचा दुसरा चांगला अलंकार बनवितो, त्याप्रमाणें आत्मा एक शरीर नाहींसें करून अविद्यां दाखवून दुसरें नवें सुंदर रूपाचें शरीर करतो." ह्या दृष्टान्तात मध्यंतरीं 'अविद्यां गमयित्वा' या पदांची अडअडचण आहे. सोनार सोन्याचा एक दागिना मोडून दुसरा करतो, तेव्हां दोन्ही ठिकाणीं सोनेंच आहे; पण गुणरूपकर्म भिन्न असतें, तें नाहींसें करावयाला मध्यंतरीं पहिल्या दागिन्यावर हातोड्याचा ठोका मारून अग्नींत घालून नंतर दुसरा बनवावा लागतो. त्याप्रमाणें आत्म्याला एक शरीर सोडून दुसरें शरीर धरण्याच्या पूर्वीं मृत्यूचा ठोका खाऊन अग्नींत पडावें लागतें. पण शंका उत्पन्न होते ती येथेंच. मध्यें अग्नींत पडल्यावर तोच आत्मा दुसऱ्या शरीरांत येतो किंवा निराळा? दृष्टान्त बरोबर आहे. त्याच सोन्याचा दुसरा दागिना बनतो खरा; पण दार्ष्टा-

न्तिक आत्मा तोच ही खात्री पटत नाहीं. ही खात्री पटायाला याच देहांत अन्य देहाचें गुणरूप कर्म दिसलें पाहिजे. रेड्याचा आत्मा आणि वेद-विद् ब्राह्मणाचा आत्मा एक हें याच रेड्याच्या देहांत दिसलें पाहिजे. सर्व चेतन-अचेतन सृष्टीला जर एकच ब्रह्म-तत्त्व उपादान व निमित्त-कारण आहे तर ती गोष्ट येथेंच प्रत्ययास आली पाहिजे. हें सर्व मनांत आणून उद्दालकानें मध्यंतरीं आणखी एक दृष्टान्त देऊन शेवटीं चमत्काराचा दृष्टान्त दिला. जर तापलेलें लोखंड आणि मनुष्याचा हात एकाच ब्रह्माचा झालेला आहे तर त्या हाताला तापलेल्या लोखं-डाचें गुणकर्म याच स्वरूपांत येणें शक्य आहे. ज्या वेळेस सत्य-स्वरूपाचें, अभिन्न अद्वितीय ब्रह्माचें, स्फुरण होऊन चोर म्हणून आण-लेल्या निरपराधी पुरुषाचें चित्त परब्रह्माशीं तादात्म्य पावतें त्या वेळेस तापलेलें लोखंड पाण्यासारखें शीतल होतें म्हणा, किंवा मांसाचा हात तापलेलें लोखंड होतो म्हणा, दोघांत भेद राहत नाहीं आणि त्या मनुष्याचा हात जळत नाहीं. हें प्रत्यक्ष अग्निदिव्यांत आपण पाहतों, याजवरून एकच ब्रह्म सर्व चेतन-अचेतन सृष्टींत भरलें आहे हें उघड आहे.

वेदान्तांतील अभिन्न—निमित्तोपादान सिद्धान्तानें चमत्काराची उप-पत्ति याप्रमाणें लागते. ही उपपत्ति इतर उपपत्तीपेक्षां अधिक सुयु-क्तिक आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. हा सिद्धान्त जगदुत्पत्ती-संबंधानें अधिक सुयुक्तिक आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे; आणि त्यापासून निघणारी ही चमत्कारांची उपपत्तिहि अधिक सुयुक्तिक आहे. सर्व वस्तु एकाच ब्रह्माच्या बनल्या आहेत तर प्रसंगविशेषीं जेव्हां जीवात्म्याचें परब्रह्माशीं तादात्म्य होतें त्या वेळेस, पाहिजे त्या वस्तूच्या ठिकाणीं इतर वस्तूंचें गुणकर्म भासमान होणें शक्य आहे. चमत्कारांचा एखादा नियम असेल तो हाच. ज्या वेळेस पर

मेश्वर सर्व वस्तूंमध्यें भरला आहे या गोष्टीचें पूर्ण भान होतें, त्या वेळेस—मायिक जगाच्या दृष्टीनें—चमत्कार होतो. वस्तुतः चमत्कार होतच नाहीं. कारण तापलेलें लोखंड आणि मांसाचा हात एकाच परब्रह्माचा झालेला, अतएव अभिन्न स्वरूपाचा आहे, तर त्यांत भिन्न गुणकर्म नाहींत हें उघड आहे. त्यांचें अभिन्नत्व मनाला पूर्ण भासमान झालें कीं तेथें अभिन्नत्व आहेच. अशा रीतीनें चमत्काराची जी उपपत्ति लागते ती भौतिक शास्त्राभिमानीहि मान्य करतील असें मला वाटतें. मूलतत्त्वें अथवा Elements बासष्ट आहेत, ती संख्या हळूहळू कमी होऊन सर्व matter अथवा प्रकृतीचें मूलतत्त्व एकच स्थापित होईल, असें भौतिकशास्त्रवेत्ते मानतात. किंबहुना Electrons हें एकच जगताचें कारण निश्चित झालें आहे. Heat, Light, Electricity, Magnetism हीं सर्व गतींचींच ( Motion ) स्वरूपें असून वस्तुतः एक आहेत, हेंहि हल्लीं सिद्ध असून जीवाचें व ईश्वराचें स्वरूप एक आहे असेंहि तत्त्ववेत्त्यांस मान्य आहे. सारांश, सर्व सृष्टीचें परमेश्वराशीं तादात्म्य आहे असें भौतिकशास्त्रवाद्यांसहि मानणें अशक्य नाहीं. यामुळें हा सिद्धान्त व ही उपपत्ति बहुधा भौतिकशास्त्राभिमान्यांसहि मान्य होईल' असें मला वाटतें आणि ज्याप्रमाणें Electricity अथवा विद्युच्छक्तीच्या जोरावर अनेक असाध्य गोष्टी साध्य झालेल्या दिसतात, त्याचप्रमाणें ईशभक्तीनें साध्य होणाऱ्या परमेश्वराशीं झालेल्या तादात्म्यानुभवानें अशक्य गोष्टीहि शक्य होतात, हें मान्य होईल.

## उपसंहार.

चमत्कारांच्या उपपत्तीचें कोडें माझ्या अल्प समजुतीप्रमाणें वेदान्तमतानें कसें सुटतें हें येथवर दाखविलें. चमत्कारांची उपपत्ति कांहीं

असो; चमत्कार प्रसंगविशेषीं सत्पुरुषांच्या म्हणजे ज्या महाविभूतींचें परमेश्वराशीं तादात्म्य झालें आहे अशा साधूंच्या हातून घडतात, ही गोष्ट सर्व धर्मांच्या लोकांस मान्य आहे. मात्र हे चमत्कार वारंवार किंवा पाहिजेल तेव्हां घडतात असें कोणी समजूं नये. चमत्कार फारच थोड्या वेळीं होतात. या कारणानें चमत्कार होतच नाहींत असें जर आपण मानलें तर हरकत नाहीं. व्यवहारदृष्ट्या, नीतिदृष्ट्या किंवा परमार्थदृष्ट्या चमत्कारांची आवश्यकता नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. शिरडीकर महाराज म्हणतात " इंजिनाचा एखादा लहानसा खिळा इकडचा तिकडे झाला तर काय अनर्थ होतो? मग हें जगद्यंत्र परमेश्वरानें सुरळीत चालू केलें आहे त्यांत इकडची खीळ तिकडे झाली तर किती घोंटाळा होईल याचा विचार करावा. यासाठीं जें होणार आहे तें कधीं टळत नाहीं."

सारांश, सत्पुरुषांच्या सांगण्याप्रमाणेंहि चमत्कार होत नाहींत, असें मानणें श्रेयस्कर व सरळ आहे. परंतु परमार्थदृष्ट्या कोणी विचार करूं लागल्यास चमत्कार क्वचित् प्रसंगीं होतात हा सिद्धान्त मान्य करावा लागेल. मात्र हें पूर्ण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं सत्पुरुषांच्याच हातून चमत्कार होतात, इतरांच्या हातून होत नाहींत. जादू, चेटक, मूठ, इत्यादि दुष्ट लोकांनीं केलेले चमत्कार खोटे आहेतच; पण जे कित्येक चमत्कार इतर लोक करतात तेहि चित्य आहेत. कारण चमत्कार होतात ते आपोआप व अकल्पित होतात. यासाठीं जे कोणी प्रतिज्ञेनें, नियमित वेळीं व नियमित प्रकारानें चमत्कार करतात, ते कांहीं तरी क्रिया करतात, ही खूण प्रत्येक मनुष्यानें आपल्या मनाशीं बांधावी. शेवटली गोष्ट ही कीं, चमत्कार साधुपुरुषाच्या हातून घडतात ते **दिव्योपदेशाच्या** वेळीं किंव एकाद्या अकल्पित संकटप्रसंगीं घडतात; इतर वेळीं किंवा प्रसंगानें

घडत नाहींत. चमत्कारांपासून राजकीय हेतु किंवा लढाया कोठेंहि साध्य झाल्याचें उदाहरण इतिहासांत नाहीं. चमत्कारांपासून कोणास अतोनात द्रव्य मिळालें नाहीं, किंवा इतर व्यावहारिक फायदा झाला नाहीं. केवळ अशा व्यावहारिक हेतूनें जर कोणी साधुपुरुषाच्या सेवेस लागत असतील तर तें वृथा होय. सत्पुरुषाची सेवा परमार्थदृष्टीनेंच करावयाची आहे. आणि अशा सेवेंत जर एखादा चमत्कार दृष्टीस पडला, किंवा व्यावहारिक फायदा झाला, तरी तो सांगावयाचा नाहीं, असा पूर्वापार सांप्रदाय आहे. कारण त्याचा उपयोग व्यवहारांत नसून त्याजपासून मूळ कार्याची हानि होते. असो, याप्रमाणें माझें चमत्काराविषयींचें मत मीं आपल्या धर्मबांधवांसमोर स्पष्टपणें मांडलें आहे. आजकालच्या बहुजनसमाजांतील सुशिक्षित व अशिक्षित लोकांची या विषयासंबंधानें अनेक रीतीनें हीन स्थिति झाली आहे, असें मला वाटतें. अनेक ढोंगें व भ्रान्त मतें आजकाल प्रचलित झालीं आहेत. ( मागेंहि झालीं होतीं व पुढेंही होतील ). भ्रमाच्या किंवा कपटाच्या पाशांत तरुण पिढीनें पडूं नये ह्या उद्देशानें मी हें सांगत आहें.

---

## ९ मूर्तिपूजा.

हिंदुधर्माच्या विशिष्ट तत्त्वांपैकीं मूर्तिपूजा आणि वर्णव्यवस्था हीं दोन तत्त्वें असून त्याजविषयीं इतर सर्व धर्मांत निषेधच दृष्टीस पडतो. किंबहुना हिंदुधर्मीय लोकांपैकीं अनेक शिकलेले लोक या दोन तत्त्वांविषयीं आपला अनादर व्यक्त करतात. मुसलमानी धर्मानें जे आजवर हिंदुधर्मावर घाले घातले किंवा मुसलमान अजूनहि घालीत

आहेत ते हिंदूंच्या मूर्तींवरच मुख्यतः आहेत. प्राचीन कालापासून हिंदुधर्माविरुद्ध जीं बंडें झालीं, तीं सर्व मूर्तिपूजा आणि वर्णव्यवस्था यांच्या विरुद्धच झालीं. बौद्धधर्मानें आणि जैनधर्मानें आणि आठशें वर्षांपूर्वी लिंगाइत मतानें हीं दोन तत्त्वें झुगारून दिलीं. पण आश्चर्य हें कीं हिंदुधर्मीयांच्या आनुवंशिक संस्कारानें या तीन्ही धर्मांत मूर्तिपूजा आणि वर्णव्यवस्था हीं पुनः प्रस्थापित झालेलीं आहेत. अलीकडच्या दोन नवीन मतवाल्यांनीं हींच दोन तत्त्वें झुगारून दिलेलीं आहेत आणि मुसलमान धर्माच्या विरोधानें हीं दोन मतें निघालीं असल्यानें त्यांनीं कट्टरपणानें हीं दोन तत्त्वें अजूनहि टाकलेलीं नाहींत. शीख धर्म पंजाबांत मुसलमानांना विरोध करण्यासाठीं निघाला आणि त्यानें मूर्तिपूजा आणि वर्णव्यवस्था हीं दोन्ही झुगारून दिलीं तीं अद्याप त्यांनीं पुनः उचललेलीं नाहींत. याच्याहि अलीकडे मुसलमानांच्याच विरोधानें दयानंद सरस्वतीचा आर्यधर्म पंजाबांत प्रस्थापित झाला, आणि तोहि अजून मूर्तिपूजेचा आणि वर्णधर्माचा कट्टा शत्रु आहे. नवीन इंग्रजी शिकलेल्या लोकांत प्रार्थनासमाज, ब्राह्मसमाज वगैरे कित्येक समाज प्रस्थापित झालेले आहेत. त्यांत हिंदु धर्माचीं हींच दोन तत्त्वें मुख्यतः त्याज्य समजलीं जाऊन टाकलेलीं आहेत. अगदीं अलीकडील हिंदुसभेमध्यें या प्रश्नाची चर्चा सुरू आहे आणि वर्णधर्म काढून टाकावा व मूर्तिपूजाहि सोडून द्यावी अशी हिंदुधर्माची सुधारणा डोकावूं पहात आहे. तेव्हां हे दोन प्रश्न अत्यंत महत्त्वाचे असून ते तात्त्विक दृष्ट्या कसे सोडवावयाचे याविषयीं आपण विचार करावयास पाहिजे.

मूर्तिपूजेविषयीं ऐतिहासिक दृष्ट्या पाहतां अत्यंत प्राचीन काळीं वैदिक धर्मांत मूर्तिपूजा नव्हती असें म्हणावयास हरकत नाहीं. वेदांत मूर्तिपूजेचा उल्लेख आहे कीं नाहीं याविषयीं दयानंद सरस्वतीच्या

वेळीं आर्यधर्मी व सनातनधर्मीयांत कडाक्याचे वाद झाले, परंतु निर्णयात्मक कांहीं ठरलें नाहीं; निदान कोणत्याहि पक्षानें पराजय मान्य केला नाहीं. या विषयांत न शिरतां सामान्य दृष्टया असें सांगतां येतें कीं, इंद्र, वरुण, सोम, आदित्य इत्यादि ऋषींच्या देवता सृष्टींतील प्रत्यक्ष दिसणाऱ्या भौतिक गोष्टींच्या अधिष्ठात्री देवता मानल्या गेल्या होत्या. मेघ-जल, चंद्र-सूर्य इत्यादि प्रत्यक्ष दृष्टिगोचर असणाऱ्या महान् विभूतींच्या अधिष्ठात्री देवता या आहेत असें समजून त्यांची स्तुति ऋषींनीं केली आहे. उपनिषत्कालांत एक देवाची म्हणजे परब्रह्माची कल्पना दृढ होऊन परब्रह्माचें निदिध्यासन हेंच ईश्वर-पूजेचें स्वरूप ठरलें गेलें. तेव्हां प्राचीन-ऋषिकाळीं मूर्तिपूजा नसून सूर्य, अग्नि, सोम, विद्युत्, इत्यादि नैसर्गिक वस्तूंचीच पर्यायानें पूजा होत असे. Anthropomorphism म्हणजे मनुष्यत्वाचे देवावर आरोप करणें हा मनुष्याचा स्वभावधर्म आहे. त्याप्रमाणें देवतांच्या स्तुतींतून मानवी स्वरूपांचीं वर्णनें पुष्कळ ठिकाणीं आपल्यास दृष्टीस पडतात. ‘ त्रयो अस्य शृंगा द्वे शीर्षे सप्तहस्तासोअस्य असें अग्नीचें, किंवा रथांत बसलेल्या सूर्याचें आणि रथाच्या सात घोड्यांचे दोर अरुणाच्या हातांत असलेलें असें वर्णन आहे. परंतु हीं वर्णनें रूपकयुक्त आहेत यामुळें हा प्रश्न ब्राह्मणकाळीं मोठा विवादाचा होता. यास्कानें देवतांस मानवी रूपें आहेत, देवतांस कोणतींच रूपें नाहींत, व देवता दोन्ही स्वरूपाच्या आहेत,असें तीन मतांचे प्रकार या विषयावर सांगितले आहेत.

पण ऐतिहासिकरीत्या विचार करतां या पुढील काळांत देवतांच्या मूर्ति त्यांच्या भिन्न भिन्न मानीव स्वरूपाप्रमाणें कायम झाल्या असें आपणांस निश्चयानें म्हणावें लागतें. आर्य आणि अनार्य यांचा संमिश्र समाज, ज्यास आपण हिंदु समाज म्हणूं, भारत वर्षांत विशिष्ट रूपाचा जेव्हां कायम झाला तेव्हां मूर्तिपूजा हें हिंदुधर्माचें विशिष्ट तत्त्व मान्य

करण्यांत आलें. शिव, विष्णु, आदित्य, देवी आणि गणपति अशा पांच देवतांची विशेषत: भिन्न स्वरूपें मानलीं जाऊन त्यांची पूजा सर्वत्र सुरू झाली आणि ही पूजा वैदिक मंत्रांनीं सुरू झाली. अर्थात् वेदांचा आणि या पूजांचा कायमचा संबंध लावला गेला. यांपैकीं शिव आणि विष्णु या दोन देवता जास्त प्रमाणांत मानल्या जाऊन त्या प्रत्यक्ष मोक्ष देणाऱ्या होत, असें उत्तरोपनिषत्कालांतहि मानलें गेलें. ' तद्विष्णोः परमं पदम् ' असें कठोपनिषदांत म्हटलें आहे तर श्वेताश्वतरोपनिषदांत महेश्वर हाच परब्रह्म असें 'मायिनं तु महेश्वरं' इत्यादि वाक्यांत सांगितलें आहे. आज हिंदुस्थानांत पाहिले तर हिंदूंत शिव आणि विष्णु याच मुख्य देवता असून त्यांचे अनुयायी अधिक संख्येचे आहेत आणि त्यांच्यांत या देवांच्या मूर्तिच पूजितात.

शिवाचें स्वरूप मानवी स्वरूपाचें प्रथम मानलें गेलें नाहीं तर लिंगस्वरूपानें शिवाची पूजा प्रारंभापासून मानली गेलेली दिसते. अगदीं प्राचीन काळीं लिंगाची पूजा अनेक लोकांत सर्व पृथ्वीवर प्रचलित होती. हिंदुस्थानांतहि अनार्य लोकांत ती प्रचलित असून त्याचें मुख्य केंद्र काशीस असावें आणि म्हणूनच सर्व लिंगांत काशी-विश्वेश्वराचें माहात्म्य हिंदुधर्मांत अधिक मानलें गेलें आहे. विष्णूची मूर्ति मनुष्यस्वरूपाची असली तरी चतुर्भुज आणि शंखचक्रगदाधर अशी मानलेली आहे. आणि रामानुज व माध्व मतांत विष्णूचें म्हणजे परमेश्वराचें मूळचें रूप हेंच आहे, असा सिद्धान्त मान्य झालेला आहे. भगवद्गीतेंतहि 'किरीटिनं गदिनं चक्रिणंच' असेंच श्री-कृष्णाचें रूप वर्णिलें आहे. अशा स्वरूपाच्या मूर्ति हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून केल्या जात असून त्यांची पूजा होत आली आहे. भगवद्गीतेंत विभूति अध्यायांत परमेश्वराच्या विभूति रूपाचें वर्णन करतांना ' रामःशस्त्रभृतामहम् ' आणि 'वृष्णीनां वासुदेवोऽस्मि'

या वाक्यांत सांगितलेले राम आणि कृष्ण हे परमेश्वराचे अवतार मानले गेले आहेत; आणि यांच्या मनुष्यरूपाच्याच हजारों सुंदर मूर्ति अनेक शहरांत प्राचीन काळापासून पूजिल्या गेल्या आहेत. सूर्याचीहि मनुष्यस्वरूपाची मूर्ति प्राचीन काळीं पूजिली जात असे व शरीर तांबडे आणि डोळे हिऱ्याचे असें त्याचें रूप बहुधा मानलें गेलेलें असे. देवीचेंहि स्वरूप मनुष्यासारखें परंतु अष्टभुजा असें मानलें जाऊन त्याची पूजा होत असे व होते. गणपतीचें स्वरूपांत हत्तीचें डोकें आणि चार हात हें विशेष आहे. आणखी इतर हनुमान वगैरेंची पूजा हिंदूधर्मामध्यें मान्य झालेली आहे, हें प्रसिद्ध आहे. या मूर्तींचीं हीं स्वरूपें कां उत्पन्न झालीं हा प्रश्न महत्त्वाचा व मनोरंजक आहे तो पुढें पाहूं. पण हीं स्वरूपें फार प्राचीन काळापासून आहेत, आणि या मूर्तींची पूजा फार प्राचीन काळापासून होत आली आहे, हें ऐतिहासिक दृष्ट्या निश्चित आहे. कित्येकांचा असा समज आहे, कीं हिंदुस्थानांत मूर्तिपूजा बौद्ध–जैन धर्मापासून आली. पण हा समज चुकीचा आहे. वर सांगितल्याप्रमाणें या दोन धर्मांत प्रथम मूर्तिपूजेचा निषेधच आहे. तेव्हां मूर्तिपूजा बुद्धाहून प्राचीन आहे, किंबहुना पाणिनींत वासुदेव व अर्जुन या मूर्तींच्या पूजेचा उल्लेख केलेला आहे, पाणिनि हा बुद्धपूर्व आहे यांत संशय नाहीं. आतां हें खरें कीं, बुद्धधर्मांत इसवीसनाच्या प्रारंभापासून हिंदूधर्माच्या अनुकरणानें बुद्धाच्याच मूर्तीची पूजा होऊं लागली व ती इतकी प्रसृत झाली कीं, इराण, अफगाणिस्तान, तिबेट, चीन, जपान अशा अनेक देशांत व खुद्द हिंदुस्थानांत बुद्धाच्या हजारों मूर्ति प्रचंड व लहान बनविल्या जाऊन त्यांची पूजा होऊं लागली. यामुळें मुसलमानी धर्म मूर्तिपूजेचा कट्टा विरोध करणारा उत्पन्न झाला व त्यानें ज्या मूर्तीवर प्रारंभीं हल्ला केला त्या बुद्धाच्याच होत्या. यामुळें बुध् म्हणजे मूर्ति

असा शब्द आरबी भाषेंत रूढ झाला; व मूर्तिपूजकांना बुध्परस्त ही संज्ञा मिळाली. अर्थात् मूर्ति फोडणाऱ्यांना बुधशिकन्द असा पर्शियन भाषेंत किताब आहे. कित्येकांची अशी समजूत आहे कीं हा बुध् शब्द भूत या शब्दाचा अपभ्रंश आहे, परंतु तसें नाहीं.

असो तर ख्रिस्ती सनाच्या प्रारंभापासून हिंदुस्तानांत विष्णु, शिव आणि बुद्ध यांच्या मूर्तींचीं हजारों देवळें बनविलीं जाऊन त्यांची पूजा आजमितीपर्यंत होत आहे. बौद्ध धर्माचा आठव्या शतकांत उच्छेद झाला तरी बुद्धाच्या मूर्ति विष्णुमूर्ति समजल्या जाऊन त्या मूर्तींची पूजा होते. पूर्वकाळीं निरनिराळ्या प्रांतांत अनेक देवतांच्या मूर्ति प्रसिद्ध असून त्या सर्व देशभर जागृत समजल्या जात व हजारों यात्रेकरू त्यांच्या दर्शनास सर्व देशांतून जात. याप्रमाणें मुलतानचा सूर्य, स्थानेश्वराचा जगत्स्वामी ( जगसोम ) विष्णु, सोमनाथाचा सोमेश्वर महादेव, उज्जनीचा महाकाळ, मथुरेचा कृष्ण, अयोध्येचा राम, काशीचा विश्वनाथ वगैरे देव प्रसिद्ध होते व शेवटचे तीन अजून आहेत. यांच्या देवळांत दर्शनास येणाऱ्या लोकांनीं नजर केलेले हजारों मौल्यवान् दागिने जमा होऊन संपत्तीचा अमोप सांठा जमला. अर्थात् साहजिकच महमुदानें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून या मूर्ति फोडून त्यांच्या देवळांतून जमलेली अगणित संपत्ति लुटून नेली. असा इ. स. स. १००० च्या सुमाराच्या हिंदुस्थानांतील मूर्तिपूजेचा इतिहास आहे. महमुदानें हजारों मूर्ति फोडल्या तरी मूर्तिपूजा हें हिंदुधर्माचें विशिष्ट मान्य तत्त्व असल्याकारणानें नवीन मूर्ति होऊन आज ८००–९०० वर्षें हजारों किंबहुना लाखों देवळांतून हिंदुस्थानांत मूर्तिपूजा होत आहे. ही योग्य किंवा कसें आणि योग्य असल्यास त्यास कांहीं तरी मर्यादा असावी किंवा नाहीं, या प्रश्नाचा आपल्यास तात्त्विकदृष्ट्या विचार करावयास पाहिजे.

परमेश्वराचे अथवा परब्रह्माचें निराकार रूप किंवा जगदाकार स्वरूप याचें ध्यान करणें अत्यंत कठिण आहे. ज्ञानयोगांत किंवा ध्यानयोगांत ईश्वराच्या अव्यक्त स्वरूपाची पूजा करणें अत्यंत प्रयाससाध्य आहे असें भगवद्गीतेंतहि सांगितलें आहे. ( क्लेशोऽधिकतरस्तेषां अव्यक्तासक्तचेतसाम् ). यासाठींच भक्तियोग हा सुकर आणि प्रत्यक्षावगम, असा भगवद्गीतेंत वर्णिलेला आहे. या योगाला ईश्वराचें कांहीं तरी प्रत्यक्ष स्वरूप पूजेकरतां घ्यावें लागतें आणि म्हणून ईश्वराच्या निरनिराळ्या विभूतींचें वर्णन भगवद्गीतेंत आलेलें आहे. या मार्गानेंहि मनुष्य मोक्षास जाऊं शकतो असें भगवद्गीतेंतच प्रतिपादन आहे. कारण मूर्तीची पूजा व ध्यान करतां करतां भक्तांस परमेश्वराचें खरें ज्ञान होतें " तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते । " तात्पर्य, हा योग सुकर असून ध्यानाला व पूजेला प्रत्यक्ष मूर्ति समोर असल्यानें प्रत्यक्षावगम आहे. ज्यांची बुद्धि किंवा मनोनिग्रहाचें सामर्थ्य कमी आहे अशा स्त्रीशूद्रचांडाळवैश्य किंबहुना सामान्य ब्राह्मणक्षत्रिय लोकांना हा भक्तिमार्ग विशेषतः उपदेशिला आहे. ब्राह्मणांना आदित्याची उपासना मुख्य सांगितली आहे आणि गायत्री मंत्राचें पुरश्चरण सांगितलें आहे. अर्थात् ब्राह्मणांना मूर्तिपूजा नसली तरी सूर्याची प्रत्यक्ष मूर्ति ध्यानास सांगितली आहे. पण हिंदु धर्मामध्यें अशा तपोनिष्ठ ब्राह्मणांची संख्या फारच थोडी. तेव्हां साधारणपणें सामान्य ब्राह्मणांसहित स्त्रीशूद्रादि बहुजनसमाजाकरितां भक्तियोगाचाच उपदेश असून त्याचें मूर्तिपूजा हें मुख्य महत्त्वाचें साधन आहे. निरनिराळ्या देवांच्या सुंदर मूर्ति ध्यानांत चित्तैकाग्र्य करण्यासहि विशेष अनुकूल असतात हा सामान्य अनुभव आहे. तेव्हां सुंदर मूर्ति करण्याचा परिपाठ प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत पडला आहे.

ज्या धर्मांत मूर्तिपूजा मान्य नाहीं त्या धर्मांत सुद्धां कांहीं तरी एक प्रतीक मूर्तिस्वरूपाला पोंचतेंच. प्रारंभीं सर्व लोकांत मूर्तिपूजा होती. तिचा निषेध ज्यू लोकांनीं प्रथम केला व ईश्वरास स्वरूप नाहीं असें प्रतिपादन केलें, पण त्यांनीं सुद्धां एक तंबू अथवा टॅबर्नॅकल देवाचें स्थान मानलें. ख्रिस्ती धर्मांतहि पूर्वीं मूर्तिपूजेचा निषेध होता, पण येशूला ज्या क्रूसावर चढविला त्या क्रूसाला पुढें मूर्तीचें महत्त्व आलें; आणि आज रोमन कॅथोलिक धर्मांत क्रूसाची पूजा तर होतेच पण याच तऱ्हेनें पुढें पुढें येशू आणि त्याची आई मेरी यांच्या प्रतिमा केल्या जाऊन त्यांची पूजा होऊं लागली व अजून रोमन कॅथोलिक धर्मांत होत आहे. महंमदी धर्मांत मूर्तीचा कट्टा निषेध आहे, आणि ख्रिस्ती धर्माची ही अवनति पाहून पैगंबरानें आपली मूर्ति कधींहि कोणी करूं नये असें स्पष्ट बजावून ठेविलें आहे. परंतु मनुष्य-सहज-स्वभावानें मुसलमानांत Crescent (प्रतिपदेचा चांद) यालाच ख्रिस्ती धर्मांतील क्रूसाप्रमाणें महत्त्व आलें. आणि पुढें हसनहुसेनच्या करबल्यांतील मशिदीचें अनुकरण ताबुतांत होऊन ताबुतांची पूजा मुसलमान लोक व हिंदु-लोक करूं लागले हें प्रसिद्ध आहे. सर्व धर्मांत देवळेंहि पवित्र मानिलीं जाऊन मूर्तिच बनलीं आहेत. तेव्हां मूर्ति अजिबात टाकून देणें शक्य नाहीं.

पण हिंदुधर्मामध्यें मूर्तीचा अतिरेक झाला आहे ही गोष्ट कबूल करावयास पाहिजे. या अतिरेकानें जागजागीं नव्या मूर्ति प्रस्थापित होऊन हजारों नवीं देवळें उत्पन्न होतात. कानपुरामध्यें मी गेलों असतां मला एकानें असें सांगितलें कीं, प्रत्येक चार घरें टाकून पांचवें घर देऊळ आहे आणि त्यांत मूर्ति प्रस्थापित झालेली आहे. अशा मूर्तींच्या पूजेची योग्य व्यवस्था होत नाहीं व त्यांच्या दर्शनासहि फारसे लोक जातहि नाहींत. तेव्हां मुर्तिपूजेच्या मार्गाला प्रथम मर्यादा

अशी घातली पाहिजे कीं होतां होईल तों नवीन देवळें किंवा नवीन मूर्ति बसवूं नयेत. एखाद्या निपुत्रिक मनुष्यास बहुधा असा मोह सुटतो कीं आपल्या धनानें एखादें देऊळ बांधावें. शिवाय श्रीमान् लोक देऊळ बांधणें ही एक धर्मकृत्याची उत्तम बाब समजतात. परंतु असल्या नवीन देवळांतील मूर्तिं बनवून त्यांचीं नवीन धर्मकेन्द्रें उत्पन्न करण्यापेक्षां जुन्या प्रसिद्ध देवळांचेंच महत्त्व वाढवून हिंदूधर्मीयांच्या शैक्षणिक संस्था अधिक उत्पन्न होण्याकडे अशा दानाचा ओघ वळेल तर हिंदूधर्मीयांचें जास्त कल्याण होईल. मूर्तिपूजेसंबंधें दुसरी गोष्ट सांगावयाची म्हणजे मूर्ति हें ईश्वराचें प्रतीक आहे आणि त्या ठिकाणीं ईश्वरी सामर्थ्य आपल्या भावनेनें आपण उत्पन्न करतों, ही गोष्ट आपण हिंदुधर्मी लोक बहुधा विसरतों. मूर्तींत कांहीं विशिष्ट सामर्थ्य आहे, अशीच बहुधा लोकांची समजूत असते. मूर्तींत देवपण येतें तें मंत्रानें येतें म्हणजे आपल्या भावनेनें येतें, मूर्तीच्या वस्तूंत नाहीं ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. महंमदानें केलेल्या मूर्तीभंजक स्वाऱ्यांच्या वेळीं ही गोष्ट लोकांच्या प्रत्यक्ष अनुभवास आली. ‘ तूं पुढें ये, सोमनाथ तुझा फडशा उडवील ’ असें बजावीत सोमनाथाचे शेंकडों ब्राह्मणपुजारी देवळाच्या तटावरून महमुदास बजावीत होते. पण त्यामुळें महमुद न थांबतां त्यानें ब्राह्मणांचा मात्र फडशा पाडला आणि मूर्तीचा भंग केला. मूर्तींत ईश्वरी सामर्थ्य नाहीं ही गोष्ट रोमच्या इतिहासांतील अलेक्झांड्रिया येथें झालेल्या प्रकारानें उत्तमरीतीनें दिसून आली. अलेक्झांड्रियांत अनेक मिश्र धातूंची एक प्रचंड मूर्ति होती. ख्रिस्ती धर्माचा प्रारंभ झाला तेव्हां त्यांत मूर्तिपूजेचा प्रथम निषेध होता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. पहिल्या ख्रिस्ती झालेल्या रोमनबादशहानें ही मूर्ति फोडून टाकण्याचा हुकूम केला आणि रोमन शिपायांची फौज मूर्ति फोडण्यास पोंचली. शहरांतील हजारों लोक देवळांत जमा

झाले ' या मूर्तीचा कोणी अपमान करील तर आकाशपाताळ एक होऊन पृथ्वीचा नाश होईल ' अशी मूर्तिपूजकांची समजूत होती. पण एक निधड्या छातीचा रोमन शिपाई कुऱ्हाड घेऊन त्या प्रचंड मूर्तीच्या खांद्यावर चढला आणि त्यानें कुऱ्हाडीचा एक घाव मूर्तीच्या डोक्यावर मारला. इतिहासकार गिबन म्हणतो, ' आकाशपाताळ जागच्याजागींच राहिलें व पृथ्वीहि जशीच्या तशीच होती. ' पण त्या मूर्तीचे मात्र तुकडे तुकडे केले जाऊन शहरांतून ओढीत नेऊन नाइल नदींत फेंकून दिले गेले.

असो तर, कोणत्याहि मूर्तींत स्वतःसिद्ध सामर्थ्य नाहीं ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे. परमेश्वर सर्व ठिकाणीं भरला आहे त्याप्रमाणें मूर्तींतहि आहे. आपल्या भावनेनें मूर्तीच्या योगानें परमेश्वराचें सामर्थ्य जास्त लवकर जागृत करतां येतें एवढेंच. भावना जर तितकी तीव्र असेल तर खांबांतूनहि नरसिंहाचें स्वरूप प्रकट होऊं शकेल. तात्पर्य, ज्या ज्या वेळेस कोणी मनुष्य मूर्तीचा अपमान करील त्या त्या वेळेस मूर्तिच त्याचें पारिपत्य करील हें शक्य नाहीं. त्या मूर्तीचा अपमान म्हणजे त्या मूर्तीवर विश्वास ठेवणाऱ्या व त्याची पूजा करणाऱ्या लोकांचा अपमान होय आणि त्या लोकांच्या ठिकाणीं जर ईश्वराविषयीं भावना तीव्र नसेल तर त्याचें पारिपत्य होणेंहि शक्य नाहीं. यासाठीं मूर्तिपूजेसंबंधानें दुसरी महत्त्वाची सूचना अशी कीं मूर्तींत सामर्थ्य नाहीं, आपल्या भावनेंत सामर्थ्य आहे, ही समजूत हिंदूधर्मीयांनीं नेहमीं जागृत ठेवली पाहिजे.

यासाठीं वर सांगितल्याप्रमाणें नवीं देवळें न बांधतां, जुन्या देवळांचाच जास्त अभिमान जेणेंकरून वाढेल अशा प्रकाराची त्या देवळांची व्यवस्था ठेवीत गेलें पाहिजे. जुन्या मूर्तींची उत्तम कीर्ति

वाढलेली असल्यानें तेथें भावना जागृत होते. मूर्तीच्या ठिकाणीं ईश्वरी भावना उत्पन्न होण्यास प्राचीन इतिहासपरंपरा आणि देवळांचें व पुण्यस्थानांचें दूरत्व व महत्त्व जास्त उपयोगी पडतात. रस्तोरस्तीं आणि गल्लोगल्लीं देवळें बांधलीं जाऊन मूर्ति स्थापन झाल्यास मूर्तीच्या दर्शनानें जें एक मनामध्यें प्रेम उत्पन्न होऊन आदर आणि पूज्य-भाव यांनीं ईश्वराची कल्पना जागृत होते ती तेथें होत नाहीं. यांविषयीं एक मनोरंजक गोष्ट सांगण्यासारखी आहे. मी अयोध्येस गेलों असतां अयोध्येंतील रामाचें व मारुतीचें दर्शन घेऊन परत जाण्यासाठीं स्टेशनावर आलों तेव्हां एक चौदापंधरा वर्षांचा मुलगा माझा दाक्षिणी वेष पाहून म्हणाला, 'महाराज आपण कोठून आलां?' 'कल्याणहून आलों' असें त्यास मीं सांगितलें. येथें 'तुम्ही कां आलां?' असें त्यानें विचारलें तेव्हां मी येथें रामचंद्राच्या दर्शनास आलों असें उत्तर दिलें. तेव्हां तो म्हणाला 'क्या आपके यहां रामका मंदर नही है? इतने दूर आप क्यौं आये?' मी त्यास तात्काळ विचारलें, 'अरे, तूं आर्यसमाजी तर नाहींस' तो म्हणाला, "मीं नाहीं. पण मीं त्यांचीं अनेक व्याख्यानें ऐकलीं आहेत. ईश्वर सर्वत्र सारखाच भरलेला आहे. तेव्हां कल्याणास काय किंवा येथें काय रामदर्शन सारखेंच आहे." असा त्याच्या म्हणण्याचा रोख होता. मीं त्यास माझेजवळ बाकावर बसवून घेतलें आणि त्यास म्हटलें, "तूं माझेंहि एक व्याख्यान ऐक. ईश्वर सर्वत्र भरला आहे तर या प्लॅटफार्मांतहि ईश्वर आहेच तेव्हां ईश्वराच्या डोक्यावर तूं जोड्याचा पाय दिला आहेस यामुळें तुला पातक घडत नाहीं काय?" या प्रश्नाचें उत्तर त्यास सुचलें नाहीं. तेव्हां मीं त्यास समजाविलें कीं, ईश्वर सर्व ठिकाणीं आहे हा सिद्धान्त तत्त्वतः खरा आहे. पण जोंपर्यंत आपण आपल्या भावनेनें त्यास जागृत केलें नाहीं तोंपर्यंत तो तेथें नाहीं असेंच मानलें पाहिजे.

नाहीं तर व्यवहार चालणें शक्यच नाहीं." तात्पर्य, ईश्वर मूर्तीच्या वस्तूंत नाहीं तर आपल्या भावनेंत आहे; आणि आपली भावना जितकी तींत जागृत होईल तितकें ईश्वरी सामर्थ्य त्या वस्तूंत जास्त प्रत्ययास येईल. कल्याणच्या देवळांत रामदर्शन घेत असतां मनांत ईश्वरभावना तीव्र जागृत होत नाहीं. अयोध्येंत आलें म्हणजे ज्या प्रभु रामचंद्राचें अवतार-चरित्र वाल्मिकीनें रामायणांत गायिलें आहे, 'त्या प्रभु रामचंद्राची जन्मभूमिहि, या ठिकाणीं त्याचा जन्म झाला' इत्यादि कल्पना मनांत उभ्या राहून अयोध्येंतील रामदर्शनानें जशी तीव्र भावना जागृत होते तशी इतरत्र होत नाहीं. हा अनुभव शेंकडों लोकांचा आहे. पंढरपूरचा विठोबा किंवा काशीचा विश्वनाथ यांचें दर्शन घेत असतां आपल्या मनांत ईश्वरभावना इतकी जागृत होते कीं परमेश्वराचें येथें प्रत्यक्ष स्वरूप आहे असें आपल्या अंतःकरणांत बिंबित होतें.

तेव्हां दुसरी महत्त्वाची गोष्ट मूर्तिपूजेसंबंधानें आहे ती ही कीं, 'भावे देवः न मूर्तौ' हा सिद्धांत मनांत ठसलेला पाहिजे. कांही विशिष्ट मूर्तींच्या ठिकाणीं अलौकिक सामर्थ्याच्या ज्या गोष्टी आपण ऐकतों त्या या दृष्टीनें खऱ्या आहेत. नृसिंहवाडीचा दत्त, ज्यांच्या अंगांत भूतसंचार झालेला असतो त्यांचा तो विकार, काढून टाकतो ही गोष्ट खरी असेल पण हाहि भावनेचाच प्रभाव आहे. प्राचीन इतिहास व परंपरा, अशा रीतीनें, स्थलमाहात्म्य वाढवितात आणि भावनेवर परिणाम करतात. यासाठींच वाटेल तेथें वाटेल तितकीं देवळें वाढवूं नयेत.

तिसरी गोष्ट अशी कीं अनेक मौल्यवान धातूंच्या मूर्ति बनविणें हेंहि व्यर्थ आहे. आणि याविषयीं भाविकांनीं मर्यादा घातली पाहिजे. महमुदानें हिंदुस्थानांतील देवळें लुटलीं त्यावेळेस मणमण सोन्याच्या

आणि हिरेमाणकांच्या शेंकडों मूर्ति त्यास सांपडल्या. मूर्ति ईश्वराचें प्रतीक असून त्यांचा मुख्य हेतु परमेश्वराकडे ध्यान लावण्याचा असतो हें वर सांगितलेंच आहे. अशा सोन्याच्या मूर्तीपासून किंवा पांचेच्या किंवा माणकांच्या मूर्तीपासून ध्यानास विशेष फायदा होतो असें मुळींच नाहीं. किंवा त्यांच्या ठिकाणीं ईश्वरी भावना लौकर जागृत होते असेंहि नाहीं. उलट त्यांच्या किंमतीमुळें भलतीकडेच लक्ष जातें. यासाठीं पूर्वींच्या आचार्यांनीं लहान लहान विशिष्ट स्वरूपाचे दगड शिव, विष्णु वगैरे देवांच्या भक्तीसाठीं उपदेशिले आहेत आणि या शिवाय आणखी सांगावयाची गोष्ट अशी कीं, देवाच्या अंगावर हजारों किंबहुना लाखों रुपये किंमतीचे दागिने घालणें हेंहि मूर्तिपूजेच्या मूलभूततत्त्वाच्या विरुद्ध आहे. यानें चोरांचें किंबहुना सांवाचेंहि फावून मूर्तीचा अनादर होतो. तेव्हां अलंकाराला मर्यादा असावी.

शेवटची गोष्ट सांगावयाची ही कीं ज्या देवतेचें जसें स्वरूप मानलें आहे त्या स्वरूपाप्रमाणें त्याची मूर्ति बनवून ती ध्यान करतांना हें ईश्वराचें एक रूप आहे अशी भावना जागृत ठेविली पाहिजे. हीं स्वरूपें कशीं उत्पन्न झालीं याजविषयीं जास्त विस्तारानें सांगतां येईल. पण परमेश्वराच्या भिन्न भिन्न शक्तींचें स्वतंत्र स्वरूप मानून पूर्वींच्या या भिन्न देवता व त्यांचीं स्वरूपें कल्पित केलीं आहेत. उदाहरणार्थ, गणपतीची देवता ही बुद्धिमत्तेची देवता आहे, अशा भावनेनें त्याचें स्वरूप कल्पिलें आहे. अर्थात् त्यास हत्तीचें मोठें डोकें याचसाठी दिलें आहे व वाहनास उंदीर सर्व लहान प्राण्यांत बुद्धिवान् दिला आहे. अशाच रीतीनें इतर देवतांच्या स्वरूपांविषयींहि कल्पना करतां येईल. सरस्वतीचें स्वरूप पुणें डेक्कनकॉलेजांतील व्याख्यानांत मीं पुढीलप्रमाणें दाखविलें होतें. गणपतीची पत्नी अर्थात् सरस्वती म्हणजे वाग्देवी आहे. हिचें वाहन मयूर अशासाठीं मानलें

आहे कीं ज्या शब्दरचनेनें अर्थ सांगावयाचा ती मयुराच्या पिसाच्या सुन्दर आकृतींनीं भरलेली व चमकदार असावी. मोराचा आवाज कर्कश आहे म्हणून त्याच्या तोंडांत मोत्याची माळ दिली आहे. सरस्वतीच्या हातांत सुरेली वीणा याचसाठीं दिला आहे. त्याचे सुर विसंवादी नसावे. अर्थात् व शब्दांत कर्कशपणा व विरोध नसावा. तिनें शुभ्र वस्त्र धारण केलें आहे. अर्थात् सात्त्विक विचार जागृत करणारे शब्द असावे. पण कोणत्याहि मूर्तीचें ध्यान-पूजन करीत असतां मी परमेश्वराचें ध्यानपूजन करीत आहें ही गोष्ट प्रत्येकानें लक्षांत ठेवली पाहिजे. हें परब्रह्माचें प्रत्यक्ष स्वरूप आहे, दृष्टि-गोचर स्वरूप आम्हीं मानलें आहे; असेंच गणपतिअथर्वशीर्षांत प्रथमारंभीं सांगितलें आहे. त्याचप्रमाणें वैदिकमंत्रांनीं पूजा करतांना पुरुषसूक्ताचा विनियोग पूजेकडे केलेला आहे, यांतहि हेंच इंगित आहे. यासंबंधानेंहि एक गोष्ट सांगण्यासारखी आहे श्रीमंत सयाजी-राव गायकवाड यांच्या आज्ञेवरून त्यांच्या वाड्यांत मंत्रसहित देवपूजा-विधि कसा असतो व त्यांतील मर्म काय? यासंबंधाचा एक लहानसा निबंध तयार केला गेला. त्यांत अनेक चमत्कारिक तर्कांबरोबर असें एक विधान केलें गेलें कीं “षोडशोपचार पूजाविधींत पुरुषसूक्ताचा उपयोग कांहींतरी केला गेला आहे. मंत्र म्हणावयाचा एक आणि क्रिया करावयाची एक. या दोहोंचा काडीइतका संबंध नाहीं.” हा निबंध माझ्याकडे मुद्दाम पाहण्यासाठीं पाठविला गेला तेव्हां माझ्या दृष्टीनें यांतील जें इंगित होतें तें मीं कळविलें. देवांची पूजा करीत असतां आपण परमपुरुष परब्रह्म ईश्वराचीच पूजा करीत आहों ही भावना जागृत रहाण्यासाठीं पूजाविधि बांधणाऱ्यांनीं या पुरुष-सूक्ताचा विनियोग केलेला आहे. ऋग्वेदसूक्तांत पुरुषसूक्त विराट् स्वरूपाचें वर्णन करणारें असून तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें

आहे. आणि त्यांत सोळा ऋचा असून पूजाविधींतहि षोडशोपचार आहेत. हे उपचार करीत असतां एकेक मंत्र आपण म्हणूं लागलों म्हणजे मूर्तिपूजेचें अवर लक्षण नष्ट होऊन परब्रह्माच्या महान् स्वरूपाचेंच आपण पूजन करीत आहों अशी पवित्र व उदात्त भावना आपल्या अंतःकरणांत जागृत होते. पण ही गोष्ट आपल्या ध्यानांत राहात नाहीं आणि आपण मूर्तींतच देव आहे अशा समजुतीनें मूर्तिपूजा करतो. ईश्वराच्या विशिष्टशक्तींचें ध्यान करण्यासाठीं विशिष्ट देवतास्वरूपें कल्पून मूर्ति केल्या आहेत, त्यांची पूजा करणें म्हणजे ईश्वराचीच पूजा करणें होय, अशा जागृत अन्तःकरणानें पूजा केली असतां ती जास्त फलद्रूप होईल, हा हिंदुधर्माचा सिद्धांत ध्यानांत ठेवला पाहिजे "यदेव विद्यया करोति तद्वीर्यवत्तरं भवति" या उपनिषद्वाक्यांत हा सिद्धांत सांगितला आहे. कोणतीहि उपासना त्या उपासनेचा अर्थ काय, त्यांत काय मूलभूततत्त्व आहे हें जाणून जी उपासना केली जाते ती वीर्यवत्तर होते.तें न जाणून उपासना केली तरी ती कांहीं फळ देईलच. कांहींच न करण्यापेक्षां हनुमानाच्या मूर्तीची पूजा केली तरी फळ येईल. पण हनुमान म्हणजे ईश्वराचेंच विशिष्टरूप, शरीरसामर्थ्य, बुद्धिवैभव आणि सेव्य ईश्वराची पराकाष्ठेची सेवा हीं संपिडित केलेली ईश्वराचीच विभूति, अशा भावनेनें केलेली मारुतीची पूजा जास्त श्रेयस्कर होईल.

---

## १० वर्णव्यवस्था.

हिंदुधर्माचें दुसरें विशिष्ट स्वरूप, अर्थात् दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत नाहीं असें, वर्णव्यवस्था हें आहे. हिंदूंचा समाज ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशा चार वर्णांचा आहे. कोणी पांच वर्णांचा-म्हणजे अतिशूद्र शूद्रांच्याहि पलीकडे महार मांगादि पांचवा वर्ण मानून पांच वर्णांचा मानतात. हे विभाग ईश्वरसृष्ट आहेत आणि याचा रोटीव्यवहार विशेषत: बेटीव्यवहार बंद अशा स्वरूपाचे आहेत असें हिंदुधर्माचें एक निश्चित तत्त्व आहे. असा जनसमूहांत भेद दुसरा कोणताहि धर्म मानीत नाहीं. मूर्तिपूजा एका प्रकारानें इतर धर्मांत सांपडेल. पण वर्णव्यवस्था दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत सांपडणार नाहीं. हिंदुधर्मांत अशा प्रकारची व्यवस्था अत्यंत प्राचीन काळापासून आहे आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें प्रत्येक हिंदु धर्मांतील बंडानें प्रथम हेंच लोढणें झुगारून दिलें. पण हिंदुस्थानांतील लोकांच्या हाडींमासीं ही व्यवस्था इतकी खिळली आहे कीं जैन-बौद्धादि प्राचीन व लिंगाईत-शिखादि अर्वाचीन तसेंच आर्य-ब्रह्म-प्रार्थना-समाजादि हल्लींच्या मतान्तरांनीं वर्णव्यवस्था तत्त्वत: टाकली तरी त्यांत अजून चालू आहे. किंबहुना ख्रिस्ती झालेल्या हजारों हिंदु लोकांत जातिधर्म पाळणारे ( Caste Christians ) आहेत व ते ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ख्रिस्ती आपआपल्यांतच विवाह करतात. मुसलमानांतहि अशा कित्येक जाती, विशेषत: क्षत्रियांच्या मलकाना राजपूत वगैरे आहेत, ज्यांच्यांत बेटीव्यवहार जातींतच होतो. तात्पर्य, वर्णव्यवस्था ही हिंदुधर्माचें प्राचीन अंग असून हिंदुसमाजाच्या ती अंगीं खिळली आहे. अलीकडच्या सुशिक्षितांत या व्यवस्थेविषयीं बराच अनादर उत्पन्न झाला आहे; कारण राजकीय प्रगतीस तिची मोठी अडचण आहे असें समजलें

जातें. हिंदुस्थानच्या पारतंत्र्याचें खापर हिंदुस्थानांत हजारों जाती आहेत या गोष्टीवर फोडलें जातें. हिंदुसमाज एकजीव नाहीं, जाती-जातींतील तंटे त्याचें सामर्थ्य कमी करतात अशी सर्वांची तक्रार आहे. आणि तसेंच पाहिलें तर यांत एक प्रकारें सत्य आहे. पृथ्वीच्या नकाशाकडे पाहिलें तर पृथ्वीवरील सर्व देशांपैकीं हिंदुस्थानांतच पार-तंत्र्य नांदतें आहे, आजच नव्हे शेंकडों वर्षांपासून आहे; आणि सर्व देशांमध्यें हिंदुस्थानांतच जातिनिर्बंध आहे. आपसांतील वैमनस्यें सर्व देशांत असतात, पण परराष्ट्रांशीं तंटा उपस्थित झाला म्हणजे प्रत्येक समाजांतील लोक आपसांतील वैमनस्यें बाजूस ठेवतात. हिंदुस्था-नांत हजारों जाती अशा आहेत कीं त्यांत बेटीरोटीव्यवहार बंद आहेत आणि त्यामुळें वैमनस्यें इतकीं कायम झालीं आहेत कीं हिंदु-स्थानच्या शत्रूला जाऊन मिळणारे लोक या देशांत हजारों सांपडतील. तेव्हां राजकीय उन्नतीच्या दृष्टीनें जातिसंस्था अर्थात् वर्णव्यवस्था नष्ट झाली, तरच हिंदुस्थानचा तरणोपाय आहे असे पुष्कळ सुशिक्षित लोकांचें म्हणणें आहे. यामुळें या विषयास अत्यंत महत्त्व आहे आणि त्याचा चाऱ्ही बाजूंनीं खोल विचार झाला पाहिजे.

येथें प्रथम वर्णव्यवस्था आणि जातिभेद यांतील फरक सांगितला पाहिजे. वर्ण चार ( किंवा पांच ) आहेत; जाती हजारों आहेत. या-वरून वर्ण आणि जाती यांतील अन्तर सहज लक्षांत येईल. वर्ण हे हिंदुधर्माचें अंग आहे, जाती नाहींत. हें मात्र ज्यास्त विस्तारानें दाखविलें पाहिजे. ब्राह्मण-वर्णांत हजारावर जाती आहेत हें १९११ च्या सेन्सस रिपोर्टावरून दिसून आलें. ब्राह्मणांचा वर्ण एक असून त्यांत अन्त-र्गत हजारावर जाती अशा आहेत कीं त्यांच्यांत बेटीव्यवहार होत नाहीं किंबहुना रोटीव्यवहार नाहीं, पण या भेदास धर्मशास्त्रांत आधार सांपडणार नाहीं. पंचगौड आणि पंचद्राविड असे ब्राह्मणांत मुख्य

भेद आहेत त्यास कोणत्याहि श्रुतींत अथवा स्मृतींत आधार सांपडत नाहीं. इतिहास पाहिला तर हा जातिभेद इ. स. १२ व्या शतकापूर्वी नव्हता हें मध्ययुगीन भारत भाग ३ यांत मीं दाखविलें आहे. या काळापूर्वी सर्व हिंदुस्थानांतील ब्राह्मणवर्ण एक होता व त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार कोठेंहि बंद नव्हता. शेवटचा पंचमवर्ण घेतला तरी हीच स्थिति दिसेल. महार मांगाच्या हातचें पाणी पिणार नाहीं, भंगी दोघांचेंहि पाणी घेणार नाहीं. कोष्टी, बुरूड वगैरे अनेक जाती त्यांच्यांत याहून वरच्या दर्जाच्या अशाच बंद आहेत. शूद्रवर्णांतहि हजारों जाती आहेत, त्या एकमेकांच्या हातचें जेवीत नाहींत व पाणी पीत नाहींत, पण अशा जातिभेदांना धर्मशास्त्रांत कोठें आधार नाहीं. हा जातिभेद हिंदुधर्माचें अपरिहार्य अंग नाहीं आणि हा जातिभेद नष्ट केला तर हिंदुधर्माची हानि होणार नाहीं. राजकीय प्रगतीला अधिक अडचण याचीच आहे. गुजराथी-ब्राह्मण महाराष्ट्रीयांचा द्वेष करितात आणि महाराष्ट्रीयांतहि कोकणस्थ देशस्थांचा व ऋग्वेदी यजुर्वेद्यांचा. हे ब्राह्मणांतील भेद काढून टाकून सर्व ब्राह्मणांत सररहा रोटीबेटीव्यवहार सुरू होतील तर राष्ट्रांचें बरेंच कल्याण होईल हें निःसंशय आहे.

पण एवढ्यानें बाकीचें मूळ नाहींसें होत नाहीं हें मान्य करावें लागेल. ब्राह्मणक्षत्रियांचें काय थोडें भांडण आहे आणि हें फार प्राचीन आहे. परशुराम व्हैह्य ह्यापासून तो तहत हल्लींच्या मराठे-ब्राह्मणांपर्यंत चालू आहे व देशाचें अत्यन्त नुकसान करीत आहे. याचा फायदा हल्लींच्या काळीं जास्त घेतला जात आहे. ब्राह्मण सायमन कमीशनाला प्रतिकूल, तर मराठे व अस्पृश्य याच कारणासाठीं त्यास अनुकूल. अशीं शेंकडों उदाहरणें देतां येतील. तेव्हां वर्णभेदच नष्ट केल्याशिवाय राष्ट्रीयदृष्ट्या हिंदुसमाजाचें पाऊल खरें पुढें पडणार नाहीं

अशी राष्ट्रीय पुढाऱ्यांची ओरड आहे. हिंदुमहासभेनें वर्णव्यवस्थेवर अद्याप स्पष्टपणें आपला शिक्का मारला नाहीं. नुकतेच डाक्का येथें झालेल्या हिंदू सभेनें सर्व हिंदु ब्राह्मण समजले जावे असा ठराव पसार केला तेव्हां बहुतेक ब्राह्मण उठून गेले. उलट महाराष्ट्रांतील कित्येक कडव्या मराठ्याचें असें म्हणणें आहे. मुळीं ब्राह्मणच हिंदु-समाजांत नकोत. ते आपल्यास ब्राह्मण म्हणून घेण्यास तयार नाहींत. परंतु ब्राह्मणांस किंवा अस्पृश्यास आपल्यांतहि येऊं देण्यास खुषी नाहींत. यावरून वर्णद्वेष ( जातिद्वेष नव्हे ) किती जोरांत आहे हें दिसून येईल. पण त्याच बरोबर वर्णव्यवस्थेचें मूळ हिंदु समाजांत किती खोल गेलें आहे हेंहि लक्षांत येतें. कारण एकवर्ण व्हा असाहि उपदेश सर्वांना पटत नाहीं. मराठे जसे ब्राह्मणांचें अस्तित्व कबूल करीत नाहींत तसे कित्येक वाईच्या लेल्यासारखे ब्राह्मण, हिंदु समाजांत हल्लीं क्षत्रिय नाहींतच असें प्रतिपादन करीत. ब्राह्मण व शूद्र दोनच वर्ण आहेत असे मानतात. तेव्हां वर्णव्यवस्था किती जुनी आहे व ती काढून टाकणें शक्य आहे काय या गोष्टीचा खरा विचार झाला पाहिजे.

वर्णव्यवस्था हिंदुधर्माचें प्रमुख तत्त्व आहे, याचें कारण ती फार जुनी असून तिचा उगम वेदकाळांत आहे. ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत ती स्पष्टच सांगितली आहे; आणि इतर सूक्तांतून ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य यांचा उल्लेख आहे. संहितांनंतरच्या वैदिक वाङ्मयांत ती स्पष्टपणें अमलांत असलेली दिसते. उपनिषदांतून तिचा उल्लेख आहे. श्रौत-सूत्रांतून ब्राह्मणांनीं अमुक करावें, क्षत्रियांनीं अमुक करावें वगैरे कर्म-भेद सांगितलेला आढळतो. भगवद्गीतेंत तर “ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ” असें स्पष्ट सांगितलें आहे. परमेश्वरानें चातुवर्ण्य उत्पन्न केलें असें येथें म्हटलें आहे. वर्णभेद हिंदुलोकांत मूळचा नाहीं असें प्रतिपादन करणारे लोक या वाक्याचा चुकीचा अर्थ

करून असें प्रतिपादन करितात कीं हा भेद जन्मतः नाहीं गुणकर्मा-प्रमाणें आहे; म्हणजे एकाच कुटुंबांत जो पुरुष शान्त स्वभावाचा आणि विद्याव्यासंग करणारा असेल तो ब्राह्मण, जो तेजस्वी असेल तो क्षत्रिय, जो गाईम्हशी राखील, व्यापार व व्याजबट्टा करील, तो वैश्य आणि जो हॉटेलांत चहाचीं भांडीं विसळायला राहील तो शूद्र. पण असा अर्थ मानला तर अनवस्था होईल; कारण आठ दहा वर्षेपर्यंत हे गुणकर्म व्यक्त होत नाहींत; तेव्हां "ब्राह्मणमष्टममर्षे उपनयीत दशमवर्षे क्षत्रियं द्वादशवर्षे वैश्यम्" या भेदाला जागाच राहत नाहीं आणि शूद्र तर मुळींच उपनयनाला योग्य नाहीं. असा शूद्र आठव्या वर्षांपर्यंत कसा ठरवावयाचा. दुसरें, गुणकर्म बदलतें व बदललें तर वर्ण बदलला कीं काय? कोणी प्रारंभीं वेद शिकून पुढें शिपाईगिरी करूं लागला तर बाळपणांत ब्राह्मण आणि तरुणपणांत क्षत्रिय. किंबहुना सकाळीं ब्राह्मण आणि दुपारीं क्षत्रिय असें म्हणावें लागेल. तिसरी अत्यंत महत्त्वाची अडचण अशी कीं हा अमुक गुणाचा आहे हें टरवायचें कोणीं? ज्याचे त्यानें म्हटल्यास शूद्र कोणीच होणार नाहीं. समाजानें ठरवायचें तर रोज तंटे लागतील. तात्पर्य, हा अर्थ संभवत नाहीं. वर्ण जन्मतः आहे हाच अर्थ टिकूं शकेल आणि प्रारंभा-पासून हाच सिद्धान्त आहे. भगवद्गीतेंतील अन्य वचनांवरून हाच आशय ठरतो. कारण "स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः" या वाक्यांत बीज दुष्ट झालें तर वर्णसंकर होईल ही आपत्ति दाख-विली आहे. वर्णसंकराची प्राचीन आर्यास फार भीति वाटे, याचें कारण हेंच कीं आर्यअनार्य यांचे विवाह झाल्यास वंशगुण नाहींसे होतील असें त्यास वाटे. याचें विवरण पुढें करूं. येथें एवढेंच सांगा-वयाचें कीं वर्णसंकराची जी अत्यंत आपत्ति भगवद्गीतेंतच मानली

आहे ( संकरस्य च कर्ता स्याम् इत्यादि ) ती गुणकर्मतः वर्णसंकराची होऊं शकत नाहीं.

वैदिक काळांत विश्वामित्र क्षत्रिय असून आपल्या कर्मानें म्हणजे तपश्चर्यादि ब्राह्मग कर्मानें ब्राह्मण झाला अशी कथा आहे, त्यावरून कर्मावरून वर्ण बदलतो असा सिद्धांत कांहीं लोक काढूं पाहतात. पग हें एक अपवादक उदाहरण आहे असेंच मानलें पाहिजे. कारण वाटेल तेव्हां कर्म बदलून वर्ण बदलतां येतो अशी त्याकाळीं व्यवस्था असती तर वसिष्ठ विश्वामित्रास इतका विरोध करता ना, आणि विश्वामित्राचा वर्ण बदलला तो त्याचा सर्वत्र कुलाचा व वंशाचा बदलला. त्याच्या वंशांत हजारों ब्राह्मण झाले. विश्वामित्राप्रमाणेंच आणखी पांच सात क्षत्रिय ब्राह्मण झाल्याचें प्रवराध्यायावरून दिसतें. पण तें एकेकट्यापुरतें नव्हे, त्याच्या सर्व वंशाचे ब्राह्मण्य मान्य झालें. तात्पर्य, प्रत्येक व्यक्तीचा वर्ण त्याच्या गुणावरून किंवा कर्मावरून ठरत असे अशी व्यवस्था प्राचीन वैदिक काळांतहि नव्हती आणि ऐतिहासिक काळांत तर नव्हतीच नव्हती.

ज्या ज्या वेळेस हिंदुधर्माविरुद्ध बंड होऊन वर्णव्यवस्था झुगारली गेली, त्या त्या वेळेस हीच गीतावाक्यावरून सुचणारी विचारसरणी पुढें आली व तिचा याचप्रमाणें निरास झालेला दिसतो. बौद्ध धर्मीयांनीं हा भेद मानला नाहीं आणि वाटेल त्यानें ब्रह्मकर्म करावें, संन्यास घ्यावा, तप करावें वगैरे ठरविलें तेव्हां हीच विचारसरणी पुढें आलेली दिसते. ब्राह्मग उत्पत्तितः असतो आणि त्याचे गुण आणि कर्मेहि ( ज्ञान—विज्ञान—आस्तिक्य इत्यादि ) गीतेंत सांगितल्याप्रमाणें असतात असें म्हगावें तर तसें दिसत नाहीं, ही शंका महाभारतकार सौति यानें नहुषाख्यानांत काढली आहे. ब्राह्मणाच्या शापानें अजगर झालेला नहुष युधिष्ठिरास साहजिकच "ब्राह्मण कोणास म्हणावें"

हा प्रश्न करतो. युधिष्ठिरानें " तोचि ब्राह्मण जेथें शांतिदयादानसत्य तपधर्म " असें गुणवर्णनपर उत्तर दिलें. नहुषानें पुन्हा विचारलें. " हें जर लक्षण ब्राह्मणांत नसेल आणि शूद्रांत दिसेल तर मग उत्पत्तितः ब्राह्मण म्हणणें खोटें ठरेल." तेव्हां युधिष्ठिरानें मोठें मननीय उत्तर दिलें. " हल्लीं वर्णसंकर फार होत आहे ( सर्वे सर्वास्वपत्यानि जनयन्ति ) यामुळें हीन ब्राह्मणांत शूद्रबीज आहे असें समजावें आणि श्रेष्ठ शूद्रांत ब्राह्मणबीज आहे असें मानावें. " असो, यावरूनहि बीज प्रधान मानून प्राचीनकाळीं वेदापासून महाभारतकाळापर्यंत ( इ. स. पू. २५० ) जन्मतः वर्ण आहेत, हाच सिद्धान्त प्रचलित होता.

पुढें स्मृतिकाळांत तर तो स्पष्टपणें अमलांत होता. " ब्राह्मण्यां ब्राह्मणाज्जातः स ब्राह्मण इतीरित " असा स्मृतींचा सिद्धान्त ठरला आहे. सामान्यतः म्हणण्याचें कारण पूर्वी ब्राह्मण चारी वर्णांच्या स्त्रिया करीत असत तेव्हां केवळ बीजावरून वर्ण ठरत असे. ब्राह्मणाचा पुत्र शूद्रीपासून झालेला असला तरी तो ब्राह्मण मानला जाई. महीदास, ऐतरेय, व्यास वगैरे उदाहरणें आहेत. पुढें 'द्वयोरात्मास्य जायते' असा संकोच झाला. ब्राह्मणाचा ब्राह्मणी आणि क्षत्रिया स्त्रीपासून झालेला पुत्र ब्राह्मण असें ठरलें. हें मनुस्मृतींत आहे. पण पुढें असवर्णविवाह बंद झाले तेव्हां बीज आणि क्षेत्र दोन्हींचा निर्बंध होऊन ब्राह्मणापासून ब्राह्मण-स्त्रीला झालेल्या पुत्राला ब्राह्मण मानावें असा नियम ठरला. अर्थात् सर्व वर्णांत हल्लीं हाच नियम आहे आणि तो न्याय्यहि आहे. कारण प्रतिलोम-विवाह जर दूष्य होते व आहेत, ब्राह्मण स्त्रीनें क्षत्रिय, वैश्य व शूद्र नवरा करूं नये, ब्राह्मणी व शूद्र यांची संतति चाण्डाळ होते इतका कडक बहिष्कार अशा विवाहावर आहे, तर ब्राह्मणांना तरी शूद्र स्त्री करण्याचा कां अधिकार असावा ? तेव्हां अनुलोम-विवाह धर्मशास्त्रानें बंद केले तें योग्यच

केलें. हल्लीं हीच व्यवस्था अमलांत आहे आणि प्रत्येक वर्ण अथवा जाति आपल्यांतच विवाह करते आणि त्या विवाहापासून झालेली संतति त्या जातीची आहे असें धर्मशास्त्र व समाज मानतात. अर्थात् वर्णाच्या कर्माशीं संबंध हल्लीं राहिला नाहीं.

वर्णव्यवस्थेचें गुणकर्माचें हें आनुषंगिक अंग बऱ्याच वर्षांपासून लुप्त आहे असें म्हटलें तरी चालेल. भगवद्गीतेंत जे गुण व जीं कर्मे चारी वर्णांचीं सांगितलीं आहेत व ज्यांचा बोध पुरुषसूक्तांतील वर्णनावरून ( बुद्धिक्रम व पठण = डोके, युद्ध व राज्य = बाहु, कृषि, पशुपालन व व्यापार = पोट व मांड्या आणि परिचर्या = पाय ) निष्पन्न होते ते गुण व तीं कर्मे सामान्यतः चार वर्णांचीं होतीं व हल्लींहि आहेत, तरी त्यांचा नियमभंग प्राचीन काळापासून होत आहे. अनुलोम रीतीचा भंग स्मृतिशास्त्रांतच मान्य आहे आणि आपत् प्रसंगीं ब्राह्मणांनीं युद्ध, व्यापार, शेती किंबहुना परिचर्या ( हाटेलांतून चहाचीं भांडीं धुणें ) करावी. म्हणजे करण्यास हरकत नाहीं हें ठरलेंच आहे. कित्येक क्षत्रिय जाती, भाट्यासारख्या, वैश्य बनल्या आहेत. पण प्रतिलोम रीतीनेंहि कर्में बदललेलीं इतिहासांत दिसतात व हल्लीं होतात. क्षत्रिय विद्वत्तेचीं कामें करतात तर, चंद्रगुप्त हर्षासारखे वैश्य युद्धकर्म स्वीकारून पराक्रम गाजवून सार्वभौम राजे बनतात. शूद्रांनीं तर सर्वत्रच शेती व गाई-म्हशी राखणें चालविलें आहे. प्राचीनकाळीं राजे लोक वर्णधर्म जबरदस्तीनें पाळवीत व रामानें एका शूद्रास तपश्चर्या करीत असल्याबद्दल शासन केलें असें रामायणांत वर्णन आहे. पण बौद्ध काळापासून अलीकडे वर्णाचा गुणकर्मविभाग राहिला नाहीं असें म्हणतां येतें; हल्लीं तर नाहींच नाहीं, कारण राजे परधर्मी असल्यानें शूद्रांनाहि वेदपठण करण्यास बंदी नाहीं. हल्लीं सर्वच लोक सर्वच कर्में करूं शकतात असा सिद्धान्त स्थापित झाला आहे.

हें योग्य व चांगलें झालें आहेहि असें म्हणण्यास हरकत नाहीं. एक तर बुद्धिवानानें बुद्धिमत्तेचीं कामें कां करूं नये आणि शूर पुरुषांनीं युद्धकर्म कां करूं नये मग ते शूद्र का असेनात. अर्थात् ब्राह्मणांनींच शिकावें किंवा क्षत्रियांनींच शिपाईगिरी करावी हें योग्य नाहीं. समाजांतील प्रत्येक व्यक्तीस आपली उन्नति करून घेण्याची मुभा असावी व आंबेडकरासारख्यांनींहि बॅरिस्टर होऊन न्यायदान करावें. दुसरें यामुळें सर्व वर्णांची, चढाओढीनें सर्व समाजाची, सारखी उन्नति होईल. शूद्रांनीं परिचर्याच करीत न राहतां त्यांनीं आपली बुद्धिमत्ता व सामर्थ्य वाढवावें. क्षत्रियांनींहि आपल्या राजेपणाचा मक्ता सोडावा आणि ब्राह्मण-वैश्य-शूद्र यांनींहि पराक्रम गाजवून राजे व्हावें. यानें देशांत शूद्रत्वाची वाढ होईल. तिसरें वर्णव्यवस्थेचें जें मुख्य हीन रूप तें नाहींसें होतें. ब्राह्मणांनींच वेद शिकावा किंवा संन्यासी होऊन ब्रह्मज्ञानी व्हावें आणि शूद्रांनीं नेहमींच परिचर्या करावी हा अन्याय वाटतो आणि तो जर नाहींसा झाला तर वर्णावर्णांचा द्वेष नाहींसा होईल. प्राचीन व ऐतिहासिक काळांत असा द्वेषभाव उत्पन्न होत होता असें स्पष्ट दिसतें. वसिष्ठ विश्वामित्रांचा तंटा प्रसिद्धच आहे. पण तुळसीदासाच्या वेळेसहि हा तंटा होता असें दिसतें. " वादै शूद्र द्विजनसे हम तुमसे कछु घाटी। ब्रह्म जाने सो ब्राह्मण आखि दिखावहि दाटी ॥१॥" "शूद्र ब्राह्मणांशीं वाद करतातः–आम्ही तुमच्याहून कांहीं कमी नाहीं. ब्रह्म जाणतो तो ब्राह्मण ( आम्हीहि ब्राह्मण आहों ), असें म्हणून दटावण्यासाठीं डोळे वटारतात." असा हा तंटा पूर्वी चालत असे तो आतां नाहींसा होत आहे हें न्याय्य आहे आणि युक्त आहे. जो शूद्र बुद्धिवान् असेल त्यानें ब्रह्मज्ञान कां संपादूं नये आणि जो ब्राह्मण मूर्ख असेल त्यास शूद्रास सांगितलेले परिचर्याकर्म कां करावयास लावूं नये? असो;

तर, हा कर्मभेद आतां नाहींसा झाला आहे आणि वर्णभेदाचे हे आनुषंगिक अंश आतां योग्य रीतीनें नाहींसे होण्यास कांहींच हरकत नाहीं किंबहुना यांत फायदा आहे.

पण वर्णभेदाचें मुख्य अंग म्हणजे बेटी-व्यवहाराची बंदी, अर्थात् जन्मत: वर्ण मानण्याची पद्धति हीहि नष्ट झाली पाहिजे आणि सर्व समाज एकवर्ण म्हणजे रोटीबेटीव्यवहारास कोठेंच आडकाठी नसलेला असावा असें कित्येकांचें म्हणणें राष्ट्रैक्यदृष्ट्या आहे तें कितपत शक्य व अशक्य आहे याचा विचार करावयाचा आहे. प्रारंभीं हें सांगितलेंच आहे कीं हा वर्णभेद हिंदु समाजांत इतका खोल रुजलेला आहे कीं तो उपटून टाकणें शक्य नाहीं. याशिवाय वेदादि-स्मृत्यन्त धर्मग्रंथांत तो उपदेशिला असल्याकारणानें हिंदुसमाज चातुर्वर्ण्य-रहित होईल तर तो हिंदु राहणार नाहीं असें सनातन धर्मीयांचें म्हणणें आहे; आणि तें योग्य आहे. ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य हा भेद उपनयनापासून तो सर्व संस्कारांत प्राप्त असून सर्वांस ब्राह्मण करणें शक्य नाहीं आणि सर्वांस शूद्र लेखणें शक्य असलें तरी तें कोणी पत्करणार नाहीं. तेव्हां वर्णव्यवस्था काढून टाकणें अशक्य आहे निदान जोंपर्यंत हिंदुधर्मश्रद्धा कायम आहे तोंपर्यंत हें होणार नाहीं. तेव्हां हा भेद काढून टाकणें अवश्य आहे काय आणि हें शक्य आहे काय हा प्रश्न पुढें येतो. माझ्या दृष्टीनें हें अवश्य नाहीं किंबहुना शक्यहि नाहीं. तें कसें याचें विस्तारानें विवेचन करूं.

धर्मशास्त्राचा विचार बाजूस ठेवून ही वर्णव्यवस्था हिंदुस्तानांतच कां उत्पन्न झाली, इतरत्र कां झाली नाहीं? याचा ऐतिहासिक दृष्ट्या माग काढूं. हिंदुस्तानांत वेदकाळांत सुमारें ६००० वर्षांपूर्वी आर्य आले असें सिद्ध आहे. त्यावेळीं पंजाबापासून तो थेट रामेश्वरापर्यंत मध्यंतरींचीं अनेक जंगलें सोडून येथें अनार्यांची वसती होती.

हे अनार्य वंशानें भिन्न होते. जगतांतील मानवांचे चार वंशाचे भाग मनुष्यशास्त्रवेत्त्यांनीं ( Anthropologists ) केले आहेत. आर्य, मोंगल, द्रविड आणि निग्रो. आर्य युरोप व एशियाचा पश्चिमभाग यांत दिसतात. मोंगल एशियाच्या पूर्वभागांत, द्रविड हिंदुस्थानाच्या दक्षिण भागांत ( हे सिलोनपासून आस्ट्रेलियापर्यंत पसरलेले आहेत. ) निग्रो आफ्रिकेंत आहेत. अमेरिकेंतील इंडियन्स हे द्रविड वंशीयच असावेत. या चार वंशाचीं नाकें व चेहेरेपट्टी भिन्न असल्याविषयीं मानवशास्त्रज्ञांनीं डोळ्याची व नाकाची, उंचीचीं मापेंहि घेतलीं आहेत. यांचे वर्णहि भिन्न आहेत, आर्य गोरे, मोंगल ( चिनी जपानीसुद्धां ) पिवळे, द्रविडी काळे-तांबडे आणि नीग्रो पक्के कृष्ण आहेत. ऋग्वेदाच्या सूक्तांतून आर्य व दास हा भेद वारंवार उल्लेखिला असून येथील मूळच्या रहिवाशांस दास शब्द आणि आपल्यास आर्य शब्द सूक्तकरांनीं लाविला आहे. ( यो नो दास आर्यो वा पुरुष्टुतादेव इंद्र युधये चिकेतति । यांत दास म्हणजे द्रविडी वंशाचे मूळ रहिवाशी; आर्य आणि अदेव म्हणजे पारशी यांचाहि भारती आर्यांशीं नेहमीं तंटा असे ). पंजाबांत या दोन वंशांची गांठ पडली तेव्हां साहाजिक त्यामध्यें बेटीव्यवहार न होता हे लोक आर्य व अनार्य असे अलग राहिले. किंबहुना पंजबांत अनार्यांची वस्ती थोडी असून ती बहुतेक कत्तल झाल्यानें पंजाबांतील हल्लींचे लोक आर्यवंशी आहेत ही गोष्ट मानवशास्त्रज्ञांनीं चेहेरेपट्टीवरूनहि मान्य केली आहे. नाक उंच आणि वर्ण गोरा हीं मुख्य आर्यांचीं लक्षणें होत. अनार्यांचीं नाकें चपटीं आणि वर्ण काळा हीं लक्षणें आहेत. ऋग्वेदांतहि अनार्य दासांना अनास व कृष्ण वर्णिले आहे आणि वसिष्ठांना गौर वर्णिलें आहे (श्वित्यंचो मां वगैरे ). पण आर्यांची दुसरी टोळी म्हणजे चंद्रवंशी आर्य

हिंदुस्तानांत मागाहून गंगोत्रीच्या मार्गानें येऊन कुरुक्षेत्र, शूरसेन, मत्स्य, चेदि वगैरे यमुनेच्या किनाऱ्यानें पसरली. त्यांनीं अनेक अनार्य स्त्रिया केल्या व यामुळें या प्रान्तांत मिश्रसंतति पुष्कळ झाली. अर्थात् येथील हल्लींचे लोक मध्यम-उंच नाकाचे व सांवळ्या रंगाचे आहेत. वर नहुषाख्यानावरूनहि युधिष्ठिरानें म्हटल्याप्रमाणें या प्रान्तांत वर्ण-संकर फार झाला, हेंच सिद्ध आहे.

अनार्यांत नाग नांवाची एक जात होती, ती अधिक शूर व शिक्षित असून आर्यांना विरोध न करितां मिळून राहणारी होती. यामुळें यांच्य स्त्रिया आर्यांनीं विशेष केल्या. यदूच्या चार नागकन्यापासून झालेल्या चार पुत्रांनीं महाराष्ट्रांत चार राज्यें स्थापिलीं असें हरिवंशांत वर्णन आहे. अर्जुनानें उलूपीशीं विवाह केला हें प्रसिद्धच आहे. श्रीकृष्णाला तर हजारों अनार्य स्त्रिया होत्या. साहजिकच यादववंशी क्षत्रियांत अनार्यरक्ताची फार मिसळ झाली आणि यामुळें गुजरात व महाराष्ट्र, मध्यहिंदुस्थान व जबलपूर या प्रांतांतील लोक मिश्र आर्यद्रविड आहेत. मूळच्या आर्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य असे धंद्यांचे वर्ग होते. पण ते बेटीबंद नव्हते. अनुलोम-प्रतिलोम विवाहहि त्यांच्यांत होत असत. असे वर्ग धंद्यावरून उत्पन्न झालेले पाश्चात्य आर्यांत नसले तरी इराणी आर्यांत होते. किंबहुना ज्यू व इजिप्शियन लोकांमध्येंहि होते. या विवाहांत पित्याचा वर्ग संततीस मिळे हें उघड आहे. कारण यांच्यांत वंशभेद नसल्यानें कोणताच अवगुण उत्पन्न होत नव्हता. पण हा नियम जेव्हां भारती विशेषतः चंद्रवंशी आर्यअनार्य स्त्रिया करूं लागले आणि पित्याचा वर्ण तोच संततीचा मानूं लागले तेव्हां अनिष्टकारक दिसून आला. अनार्य स्त्री किंवा पुरुष आणि आर्य पुरुष किंवा आर्य स्त्री यांच्या संबंधापासून प्रजा कशा प्रकारची निर्माण होते याचा बराच अनुभव घेतल्यावर असे विवाह होऊं नये

ह्या निर्बंध उत्पन्न झाला. मनुस्मृतींत पुढील महत्त्वाचा श्लोक आहे. "जातो नार्यामनार्यायामार्यादार्यो भवेद्गुणैः । जातस्त्वनार्यादार्यायामनार्य इति निश्चयः ॥" अनार्य स्त्रीच्या ठिकाणीं आर्य पुरुषापासून झालेला पुत्र गुणानें आर्य असूं शकेल, पण अनार्य पुरुषापासून आर्य स्त्रीच्या ठिकाणीं झालेली संतति निश्चयानें गुणांनीं अनार्यच होते. हा अनुभव घेतल्यानंतर हिंदुसमाजांत प्रतिलोमविवाह कडकडीत रीतीनें बंद केले गेले. निषादीच्या पोटीं पराशरापासून व्यास होऊं शकेल, पण आर्य स्त्रियांनीं अनार्य पति केल्यास संतति चाण्डाळ होते असें या स्मृतिवाक्यांत म्हटलें आहे. हळुहळू हा नियम आर्यांतील त्रिवर्गासहि लागू झाला आणि प्रतिलोमविवाह लवकरच सर्वत्र बंद झाले. अनुलोमविवाह चालू राहिलेले प्रथम ब्राह्मणांत बंद झाले. क्षत्रिय-वैश्यांत अनार्य विवाह, राज्य व संपत्ति अनुकूल असल्यानें बरेच चालू राहिले, पण यामुळें त्यांच्यांत वंशमिश्रण झाल्यानें गुणांत अनार्यपणा वाढला. ही गोष्ट येथें सांगितली पाहिजे कीं वंशांत गुणभेद असतो. आर्यवंशी हे नीतिमत्तेंत जास्ती होते आणि अनार्य चोरी, लबाडी, भित्रेपणा इत्यादि अवगुणांकडे अधिक प्रवण होते व अजून आहेत. अनार्यजुष्ट म्हणजे निंद्य असें भगद्गीतेंतहि वर्णिलें आहे. तेव्हां मिश्र संततीमध्यें अनुलोमविवाहांतहि अनार्य गुण येऊं लागले. यामुळें असले विवाह क्षत्रिय-वैश्यांतहि बंद केले गेले. अशा रीतीनें शूद्रांचा समावेश हिंदुसमाजांत केला गेल्यानंतर हिंदुसमाजांत बेटीव्यवहार बंद होऊन वर्णव्यवस्था उत्पन्न झाली. हिंदुस्थानांतच ही व्यवस्था आली याचें कारण याच देशांत हे दोन परस्पर भिन्न वंशांचें मिश्रण झालें. पाश्चात्य देशांत, इराण, ग्रीस, रोम, जर्मनी, इंग्लंड वगैरेंत आर्य गेले तेव्हां तेथें पूर्वींचे लोक थोडे होते व जे होते, ते भिन्न वंशांचे नव्हते. जर्मनींत तर मुळींच नसल्यानें जर्मनींत शुद्धवंशी आर्य आहेत व

त्यांच्यांत आर्यवंशाचे गुण स्पष्टपणें आहेत.जर्मन लोकांत ब्राह्मण,क्षत्रिय वैश्य यांचे सर्व गुण एकत्र झालेले दिसतात. असो, तात्पर्य–पाश्चात्य देशांत समाजांत वर्गभेद असला तरी वर्णभेद नाहीं, कारण सर्व लोक एकवंशी आहेत. हिंदुस्थानांतील वर्णभेद मूळांत वंशभेद आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

कित्येक लोक असें प्रतिपादितात कीं हिंदुस्तानांत वर्णभेद ब्राह्मणांनीं आपल्यास मोठेपणा घेण्यासाठीं मुद्दाम पाडला, पण वर्णभेदाच्या उत्पत्तीचा इतिहास वरप्रमाणें आहे. कोणत्याहि काळांत ब्राह्मण समाजावर इतके सत्ता चालविणारे झाले होते असें म्हणतां येत नाहीं आणि राजसत्ता असलेल्या क्षत्रियांनीं ब्राह्मणांनीं घातलेलें दडपण निमूटपणें मान्य केलें असेल असेंहि म्हणतां येणार नाहीं. हिंदुस्थानांत वंशभेद व तदनुषंगानें वर्णभेद, समाजांत शूद्र आल्यानें उत्पन्न झाला. भिन्न संस्कृतींचे व भिन्न वंशांचे लोक एकत्र येतात तेव्हा असाच प्रकार घडतो हें हल्लींच्या दक्षिण अफ्रिकेंतील पाश्चात्य आर्य तेथील रहिवाशी आणि हिंदुस्थानचे लोक यांच्या एकत्र येण्यानें काय प्रकार उत्पन्न झाला आहे त्यावरून सहज लक्षांत येईल. तद्देशीय मूळ रहिवाशांना व हिंदी लोकांना युरोपियनांच्या वस्तींत राहूं देत नाहींत, त्यांना एका गाडींतहि बसतां येत नाहीं, अशी तेथें स्थिति आहे व असे कायदे आहेत. मग विवाहाची गोष्टच कशाला ? सुधारलेल्या युनायटेड स्टेट्समध्यें युरोपियन हे अत्यंत भिन्न स्वरूपाचे संस्कृतींचे व वंशाचे लोक एकत्र आले आहेत व तेथें अनुलोमविवाह होऊं शकतो. पण संतति मिश्रवर्णाची समजतात. आणि प्रतिलोम समागमाची तर इतकी चीड आहे कीं अशा नीग्रोस लोक पकडून उभे जाळतात. या तुलनेनें पाहतां भारती आर्यांचे शूद्रांशीं वर्तन फारच वरिष्ठ दर्जाचें आणि माणुसकीचें होतें. त्यांनीं शूद्रांस गांवां

राहूं दिलें, इतकेंच नव्हे तर त्यांच्याशीं विवाहसंबंध केला आणि प्रारंभीं संतति पित्याच्याच वर्णाची मानली ( व्यास, महीलास, भीष्म इत्यादि उदाहरणें पहा.) प्रतिलोमविवाह मात्र वर वर्णिलेल्याप्रमाणें त्यांनींहि बंद केला पण यामुळें हळुहळू सर्वच विवाह, अनुलोम किंवा प्रतिलोम, बंद करून वर्णांतच विवाह करावा असा कट्टा नियम केला. हा न्याय्य-हि आहे, कारण वरिष्ठांनीं कनिष्ठांच्या स्त्रिया घ्याव्या तर वरिष्ठ स्त्रियांनीं कनिष्ठ पति का करूं नये ? हा प्रश्न स्वातंत्र्याच्या समाजाच्या काळांत उपस्थित होतो. तेव्हां प्रत्येकांनीं आपल्या वर्णांतच विवाह करावा हेंच न्याय्य आहे.

पण वर्णव्यवस्थाच अन्याय्य मानून ती बुडवून देशाचा फायदा कां करूं नये असा हल्लींचा प्रश्न आहे. याचा विचार करतां वर्ण-व्यवस्था इतकी खोल रुजली आहे, कीं ती नष्ट करणें शक्य नाहीं हें प्रथम सांगितलें पाहिजे. तिचें मूळ वंशभेदांत आहे आणि ती लोकांच्या अंगवळणीं हजारों वर्षांपासून पडली आहे. धर्मांतर कर-ण्यांत सुद्धां, वर्णव्यवस्था त्या परधर्मांत नाहीं तरी, ती कायम राहते, हें आपण पाहतों. तेव्हां वर्णव्यवस्था राहून कोणत्या उपायांनीं राष्ट्रैक्य-भावना जागृत राहील अर्थात् वर्णद्वेष कसा नाहींसा करितां येईल हा खरोखर हिंदुधर्मीयांपुढें प्रश्न आहे. पुढें प्रजा एकवर्ण होतील हें कलियुगाचें भविष्य आहेच आणि तें कदाचित् खरेंहि होईल; पण सध्यां हा प्रश्न नाहीं. हिंदुसमाज आज $\frac{3}{4}$ सनातनी आहे. आर्यसमा-जवाल्यांनीं जरी जातपाततोड सभा काढली आहे तरी त्यांत अद्यापि ही व्यवस्था तुटली नाहीं. " यावद्वर्णविभागोस्ति यावद्वेदः प्रवर्तते ।" तावत्पर्यंत हिंदुधर्म राहणार आहे; म्हणजे वेदांच्या प्रामाण्यबुद्धी-इतकेंच हिंदुधर्मांत वर्णविभागाला स्थैर्य व आदर आहे. सर्वच शूद्र किंवा सर्वच ब्राह्मण आहेत असा सिद्धान्त प्रबळ होऊन रूढ होण्याला

शेंकडों वर्षें लागतील. अस्पृश्य स्पृश्य झाले आहेत तरी ते चारी वर्णांत विवाहबन्धनें तुटून मिसळून जातील असें कित्येक शतकें तरी संभवनीय नाहीं. तेव्हां विवाहबन्धनानें बांधलेलें चातुर्वर्ण्य राहणारच. यासाठीं वर्णव्यवस्थेंतील दोष काढून ती राष्ट्रहितास अनुकूल कशी करतां येईल हा हल्लींचा शक्यतेच्या आटोक्यांतील प्रश्न आहे.

प्रथम वर्णव्यवस्थेंतील कर्मबन्धनें सुटलींच आहे, यामुळें त्यांतील महत्त्वाचे दोषबीज नाहींसें झालें आहे. हें चांगलें झालें असून याबद्दल तंटा अथवा दुःख करण्याचें कारण नाहीं, असें हिंदुसमाजाला बजावलें पाहिजे. हल्लीं प्रत्येक वर्णाचे लोक इतर वर्णांचीं कामें **सामान्यतः** करीत नसले, तरी त्यांस तीं कामें करण्यास समाजानें किंवा कायद्यानें आठकाठी ठेविली नाहीं. न्यायाधीशाचें काम ब्राह्मणानें करावें असा स्मृतीचा आदेश आहे पण हल्लीं सर्व वर्णांचे लोक, अंत्यज सुद्धां मुन्सफ किंवा मॅजिस्ट्रेट होतात. व्यापार किंवा व्यवसाय वैश्यांनीं करावे पण हल्लीं ब्राह्मणसुद्धां धान्याचीं दुकानें चालतात आणि शिंपी, सुतार, लोहार, गवळी यांचें काम करतात. धार्मिक बंधन पाहिलें तर अध्यापन म्हणजे वेदाध्यापन, याजन म्हणजे लग्न वगैरे धार्मिक विधि चालविणें आणि प्रतिग्रह म्हणजे दक्षिणा घेणें हीं कर्में अद्याप ब्राह्मणांचीं ब्राह्मणच करीत आहेत. हीं कर्में फारशीं सोपीं व स्पृहणीय नाहींत आणि किफायतशीरहि नाहींत तेव्हां इतरांनीं तीं उचललीं नाहींत यांत नवल नाहीं. शिवाय ब्राह्मणास लग्न लावण्यासाठीं बोलवावें इतकी हिंदुधर्मश्रद्धा इतर वर्णांत अजून कायम आहे; पण हीं सुद्धां कामें इतर वर्णांचे लोक करूं इच्छितील तर ब्राह्मणांनीं तक्रार करूं नये; कारण कर्मनिर्बंध त्यांनींहि पाळला नाहीं. तेव्हां दुसऱ्यांनीं त्यांचें कर्म केल्यास त्यांस तक्रार करण्यास जागा नाहीं.

अशी जरी मुभा आहे आणि असावी, कारण त्यामुळें वर्णद्वेष

कमी आहे व राहील तरी प्रत्येक वर्णाचीं स्वभावोक्त कर्में सामान्यतः तेच वर्ण हल्लींहि करीत आहेत ही गोष्ट सर्वांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. बौद्धिक आणि धार्मिक कामें बहुतेक ब्राह्मण करतात; राज्य व फौज क्षत्रियांच्याच हातांत आहे; व्यापार व मोठ्या प्रमाणावर शेती वैश्यच करितात; आणि मजुरी, शेती वगैरे कामें शूद्रच करितात. याचें एक महत्त्वाचें कारण आनुवंशिक संस्कार व शक्ति हें आहे. परंपरागत आलेला धंदा मनुष्य ज्यास्त कौशल्यानें आणि स्वभावसहजतेनें करितो. याचमुळें जातिव्यवस्था अमलांत आली अशी कित्येकांची समजूत आहे. वर्णव्यवस्था श्रमविभागाच्या आणि आनुवंशिक संस्काराच्या तत्त्वावर बसविली असून तीपासून हिंदु-समाज सुस्थितीत आले; कोणत्याहि प्रकारचे तंटे वगैरे होत नाहींत. मजुरांचे संघ ट्रेडयूनियन इत्यादिकांसारखीं समाजाची सुस्थिति बिघडवणारीं बंडें हिंदुस्थानांत नाहींत असे कित्येक युरोपियन किंवा परस्थ लोकहि मानतात. तथापि कर्मतः जातिभेद म्हणजे वर्णभेद धर्मांत कायद्यांत असूं नये हें मान्य करावें लागेल; आणि तसा तो हल्लीं हिंदुसमाजांत नाहीं. कोणत्याहि कायद्यानें किंवा समाजबंधनानें अमुक माणसानें अमुकच धंदा केला पाहिजे दुसरा करूं नये असा निर्बंध हल्लीं नाहीं व नसावा. प्राचीन वर्णधर्माचें हें स्वरूप बहुतेक प्राचीन काळींच नष्ट झालें. हल्लीं तर तें मुळींच अस्तित्वांत नाहीं. वेदपठन शूद्रांनीं करूं नये असा कडक निर्बंध होता, पण वेदान्तविद्या शूद्रांनीं शिकूं नये हा निर्बंध पूर्वींहि नव्हता. वेदपठनाचा निर्बंधहि आतां निघालाच आहे. म्लेच्छसुद्धां वेदाभ्यास करतात, तेव्हां कोणतीच आडकाठी कर्मसंबंधीं आतां राहिली नाहीं.

विवाह-निर्बंध मात्र हल्लीं वर्णव्यवस्थेंत कायम आहे. किंबहुना प्राचीन काळापेक्षां हल्लीं ज्यास्त कडक आहे म्हणजे वर्णान्तरगत ज्या

पोटजाति आहेत त्याहि आपसांत विवाह करीत नाहींत. तो निर्बंध जरी काढून टाकला तरी वर्णावर्णांत परस्पर विवाह होऊं नयेत हा निर्बंध काढूं नये असें माझें ठाम मत आहे. ही वर्णव्यवस्था वंशभेदानें उत्पन्न झाली हें मीं वर दाखविलेंच आहे. वर्णसंकर हा हानिकर आहे असें पूर्वाचार्यांनीं मानलें आणि हल्लींचे मानव शास्त्रवेत्तेहि मानतात. किं-बहुना प्राणिशास्त्रवेत्यांचेंहि हेंच मत अनुभवानें ठरलें आहे. मानु-ष्यक जरी एक असलें तरी मनुष्यांत जे चार वंश आर्य वगैरे आहेत ते कांहीं विशिष्ट गुण, सामर्थ्य, योग्यता या दृष्टीनें भिन्न आहेत. गो ही जाति किंवा genus जरी एक आहे तरी निरनिराळया जाति अथवा species गाईच्या आहेत. आणि त्यांचें मिश्रण हानिकर होतें हा अनुभव आहे.घोड्यांच्या जाति अनेक आहेत आणि प्रत्येक जातीचे गुण निराळे असतात. घोड्यांतसुद्धां जातिमिश्रण ( mixture of breed) हानिकर होते. जातिमिश्रणांत गुण वाढत नाहींत कमी होतात, दुर्गुण मात्र वाढतात कमी होत नाहींत, असा अनुभव आहे. अरबी घोड्यांची नसल जितकी शुद्ध ठेवावी तितकी त्याची गुण-संपत्ति वाढते. यामुळें अरबस्तानांतून माद्या बाहेर पाठवीत नाहींत, नरच पाठवतात हें प्रसिद्ध आहे. गाईसंबधानेंहि असाच अनुभव आहे. ज्या ज्यास्त दूध देणाऱ्या गाईच्या जाति आहेत त्यांची नसल शुद्ध ठेविली तर त्यांचें दूध वाढतें असा अमेरिकेंतील गाईचा धंदा करणाऱ्यांचा अनुभव आहे. तात्पर्य आर्य, द्रविड, मोगल, नीग्रो हे वंश कांहीं विशिष्ट गुणांनीं मंडित आहेत. त्यांचें रक्तमिश्रण हानि-कारक होतें असा इतिहासाचा अनुभव हिंदुस्थानांत तर आलाच आहे. ( जातो नार्यामनार्यायामनार्य इति निश्चयः ). पण अमेरिकेंत-हि आला आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील लोक मुख्यतः युरोपीय आर्य आहेत; त्यांनीं रेडइंडियन लोकांशीं रक्तमिश्रण

मुळींच केलें नाहीं व आपल्या देशांत काम करण्यासाठीं गुलाम म्हणून नीग्रो आणले त्यांच्याशींहि केलें नाहीं, यामुळें संयुक्त संस्थानांतील आर्य अद्याप तेजोविशिष्ट आहेत. याउलट मध्य व दक्षिण अमेरिकेंत गेलेल्या स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांनीं रेडइंडियनांशीं रक्तमिश्रण केलें आणि त्यामुळें या देशांतील लोक सामर्थ्य इत्यादि शारीरिक व धिमेपणा इत्यादि मानसिक गुणांत संयुक्त संस्थानांतील लोकांपेक्षां कमी आहेत असें इतिहासावरून दिसतें. तात्पर्य, वंशमिश्रण मानवजातींतहि हानिकारक आहे. येथें अशी शंका कोणी उपस्थित करील कीं सर्व वंश गुणांनीं सारखेच असले पाहिजेत आणि मनुष्याची उत्पत्ति डार्विनच्या सिद्धान्ताप्रमाणें माकडापासून आहे तर त्यांच्यांत दुर्गुणहि सारखेच असले पाहिजेत. अॅडम आणि इव्ह या एका जोडप्यापासून सर्व मनुष्यजात उत्पन्न झाली असें धरलें तरी त्यांत गुणदुर्गुण सारखेच असले पाहिजेत. पण मानवशास्त्रज्ञ मनुष्याची उत्पत्ति एका जोडप्यापासून मानीत नाहींत. शिवाय डार्विनचा सिद्धान्त ग्राह्य केला तरी मनुष्यजातीचीं उत्पत्तिस्थानें अनेक मानलीं पाहिजेत; अनेक ठिकाणीं अनेक जातींच्या माकडापासून मनुष्याचे निरनिराळे वंश उत्पन्न झाले असेंच मानलें पाहिजे. त्याशिवाय भिन्न चेहरे, नाक, डोळे, उंची, वर्ण अशा शारीरिक अनपवादक खुणा भिन्नवंशांत दिसल्या नसत्या. शारीरिक भेदाबरोबर मानसिक भेदहि निरनिराळ्या वंशांत आहेत. तेव्हां वंशभेद नैसर्गिक आहे आणि भिन्नवंशांचें मिश्रण दोषकारक आहे. यामुळें हिंदुस्तानांतील विवाहबंधनयुक्त वर्णभेद नष्ट करणें फायदेशीर होणार नाहीं. एखादा वंश हीन किंवा कमी सामर्थ्याचा मानला तरी, तो तसा नेहमींच राहणार असें आम्ही म्हणत नाहीं. आर्यवंशीयाहून द्रविडवंशीय

हीन असले तरी ते अधिक संस्कृत व सामर्थ्यवान् होणें शक्य आहे. पण ते वंशमिश्रणानें नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. वंशमिश्रणानें उलट दुर्गुण वाढतील आणि गुण कमी होतील. यासाठीं कोणत्याहि वर्णास उन्नत होण्यास आडकाठी असूं नये हें न्याय्य आहे. शिक्षण, वरिष्ठ धंदे, स्वच्छता, नीत्याचरण इत्यादि उन्नतीस नेण्याचे मार्ग सर्वांस सारखेच खुले असावे म्हणजे कर्मतः वर्णबंधन नसावें. पण जन्मतः वर्ण कायम ठेवण्यांतच हिंदुसमाजाचें कल्याण आहे हें निर्विवाद आहे.

पण वर्णाचें विवाहबन्धनयुक्त स्वरूप कायम राहण्यापासूनहि थोडासा वर्णद्वेष हिंदुसमाजांत उत्पन्न होतो हें नाकबूल करून चालणार नाहीं; आणि हिंदुसमाजाचें राष्ट्रीय सामर्थ्य वाढवायाचें असेल तर या गोष्टीला योग्य उपाय योजिला पाहिजे. हा योग्य उपाय म्हणजे अकोला ब्राह्मण-परिषदेनें केलेला ठराव होय. सर्वहि वर्ण धार्मिक व सामाजिक दृष्टीनें समान आहेत हें हिंदुधर्मीयांनीं नेहमीं लक्षांत ठेवावें. सन्तशिरोमणि तुकारामानें " जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट। तिहीं लोकीं श्रेष्ठ जाणावा तो।" असें सात्त्विक वृत्तीनें म्हटलें आणि स्मृत्यांत "वर्ण-श्रैष्ठ्यात् आचार-श्रैष्ठ्यात् वर्णानां ब्राह्मणो गुरुः" असें म्हणलें आहे येवढ्यानें शेफारून जाऊन प्रत्येक ब्राह्मणानें मी श्रेष्ठ म्हणून मिरविणें अयोग्य आहे. वरील वचनें इतरांकरितां आहेत त्यांनीं वाटल्यास तसें मानावें. पण ब्राह्मणांनीं या वाक्याचा केव्हांहि फायदा घेऊं नये. हेडमास्तरास पोरांनीं नमस्कार करावा हें पोरांकरितां आहे. मास्तरानें 'अरे,मला नमस्कार कर' असें म्हणतां कामा नये. त्यांस योग्यता असेल तर विद्यार्थी असतील ते नमस्कार करतीलच. तोच जर धेड मास्तर असेल तर त्यास विद्यार्थी टाळतील. तात्पर्य, हीं वचनें ब्राह्मणाकरितां नाहींत. दुसरें, ब्राह्मणाचें गुरुत्व धर्मविषयांतच आहे, इतर सामाजिक, राष्ट्रीय, व्यावहारिक वगैरे बाबतींत

नाहीं; त्यांत सर्व समाजाचे घटक, अत्यंजापासून श्रोत्रिय ब्राह्मणापर्यंत समान दर्जाचे व हक्काचे आहेत हें उघड आहे. आणि धर्माच्या बाबतींतहि ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व इतरांच्या इच्छेवर अवलंबून आहे. तुम्ही लायक असाल तर इतर तुम्हांस मानतील. न मानलें तर आपल्यांत कांहीं दोष आहे असें तुम्हीं जाणलें पाहिजे. याचा उपाय जळफळणें किंवा कोर्टांत तक्रार करणें नव्हे तर आपली सुधारणा केली पाहिजे ही जाणीव होय. शेवटची गोष्ट म्हणजे धर्मविषयांतहि ऐहिक धर्माचरणांत ब्राह्मणाचें वन्धत्व किंवा श्रेष्ठत्व आहे; पारलौकिक अन्तिम ध्येयांत नाहीं. ब्राह्मणच मोक्षास जातील अशी कित्येकांची वेडी समजूत आहे. सर्व वर्ण सारखेच मोक्षाचे अधिकारी आहेत. उपनिषदांत शूद्रासहि वेदान्तविद्येचा उपदेश केला आहे. भक्तिमार्गानें स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यान्ति परां गतिम् " असें भगवन्ताचें स्पष्ट वचन गीतेंत आहे. आगगाडींत बसलेले सर्वच उतारू, मग ते फर्स्टक्लासांत असोत किंवा थर्डक्लासांत, शेवटच्या स्टेशनास पोंचणार आहेत. 'यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम' या अन्तिम ठिकाणीं सर्वच पोचणार आहेत. मग फर्स्टक्लासवाल्यांनीं फुशारकी मारण्यांत काय अर्थ? शिवाय फर्स्टांत बसणाऱ्यास अधिक दाम लागला होता. तो दिला नसेल तर दण्ड दसपट पडेल हें आहेच. असो, समानभाव चारी वर्णांच्या लोकांनीं जागृत ठेवून अमलांत आणल्यास हिंदुधर्मीयांत राष्ट्रैक्य-भावना कायम राहील असें मला वाटतें. हिंदु व मुसलमान हें धर्मानें, संस्कृतीनें व स्वभावानें भिन्न असूनहि जर हिंदुमुसलमानांत राष्ट्रीयैक्याची भावना असूं शकते व असावी असा आपण प्रयत्न करतों, तर धर्म एक, संस्कृति एक, स्वभाव एक असलेले भिन्न वर्णांचे हिंदु समान भावना जागृत ठेवतील तर एकजीव कां होऊं नये? तेव्हां हिंदुधर्मांत वर्ण-व्यवस्था गोविली आहे ती फार जुनी व खोल गेलेली आहे तिचें मूळ

वंशभेदांत आहे, वंशमिश्रणापासून अवगुण वाढतात या गोष्टी ध्यानांत घेतल्या असतां वर्णव्यवस्था नष्ट करणें शक्य नाहीं व शक्यहि नाहीं. आणि धार्मिक बाबतींतहि आम्ही समान आहों, सामाजिक व राजकीय बाबतींत तर आहोंच आहों, अशी भावना सर्व वर्णांनीं जागृत ठेवल्यास हिंदु समाजांत ऐक्यबुद्धि निश्चयानें नांदेल. आणि सर्वच ब्राह्मण फर्स्टक्लासांत बसतात असें नाहीं, किंवा सर्वच शूद्र थर्ड क्लासांत बसतात असेंहि नाहीं. आसक्तिरहित कर्मयोग किंवा ब्रह्मनिष्ठाचा ज्ञानयोग ज्यांनीं साधला असेल तेच फर्स्ट क्लासांत बसतील. हजारों ब्राह्मण-क्षत्रिय, लाखों-वैश्यशूद्र-समवेत भक्तिमार्गाच्या थर्डक्लासांत बसले आहेत, आणि तेंहि परांगति पोंचणार आहेत. तेव्हां चारी वर्णांनीं समानभाव बाळगला पाहिजे हें सांगणें नलगे.




---

## २१ आश्रमव्यवस्था.

परकीयांच्या विषेष लक्षांत येणाजोग्या हिंदुस्थानांतील अनेक सामाजिक व्यवस्थांपैकीं आश्रमव्यवस्था ही एक विशेष प्रकारची गोष्ट आहे, हें आपल्या सामाजिक स्थितीचें पर्यालोचन करणाऱ्या प्रत्येक मनुष्याच्या लक्षांत येण्यासारखें आहे. या व्यवस्थेचा विचार केला असतां, ती आपल्या पूर्वऋषींनीं मोठ्या दूरदृष्टीनें घालून दिली आहे, असेंच म्हणावें लागतें. या व्यवस्थेचें बीज प्रत्येक समाजांत आहे हें खरें आहे. प्रत्येक समाजांत ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रमधर्म, संन्यासधर्म पाळिले जातात ह्यांत संशय नाहीं. तत्रापि या नैसर्गिक परिस्थितीला कोणत्याहि समाजांत व्यवस्थित स्वरूप आलेलें नाहीं. मग कोणत्या वयांत हे निरनिराळे धर्म कोणकोणत्या नियमांनीं पाळावे याजबद्दल

निर्बंध असण्याची गोष्टच नको. पूर्वकाळीं असे निर्बंध या देशांत कधीं अमलांत आले, यासंबंधानें माहिती निश्चयानें देतां येत नाहीं. पण वैदिक काळाच्या शेवटीं शेवटीं ही व्यवस्था भारतवर्षीय आर्य-लोकांत पूर्णपणें अमलांत आली होती, हें उपनिषदांवरून सांगतां येतें. 'त्रयो धर्मस्कंधा' या छांदोग्योपनिषदाच्या वाक्यावरून चतुर्थाश्रम श्रुति-विहित आहे असें प्रतिपादन ब्रह्मसूत्रांत प्रत्यक्ष केलें आहे. छांदो-ग्यादि उपनिषदांचा काळ फार प्राचीन आहे. तेव्हांपासून ब्रह्म-सूत्राचा काळ म्हणजे कित्येक शतकांचा काळ समजला पाहिजे. या काळांत आश्रमव्यवस्था चांगल्या रीतीनें अमलांत होती असें दिसतें. ब्रह्मसूत्रांचा काळ व मनुस्मृतीचा काळ एकच मानिला तरी चालेल. माझ्या मतें दोहोंसहि सुमारें आज दोन हजार वर्षें झालीं असावींत. मनुस्मृतींत आश्रमव्यवस्थेचें जें साद्यंत मनोवेधक चित्र उठविलें आहे, त्याप्रमाणें ज्या देशांत आश्रमव्यवस्था पूर्णपणें जागृत असेल, तो देश खरोखर चांगल्या स्थितींत असलाच पाहिजे. मनुस्मृति फार प्राचीन असून त्यांतील नियम म्हणजे जुनाट झालेले निर्जीव आम्रवृक्ष आहेत असें कित्येकांस वाटतें. तेव्हांपासून गेल्या दोन हजार वर्षांत मनूच्या वेळच्या परिस्थितीस पुष्कळ फरक पडला आहे, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. पण आश्रमव्यवस्थेसंबंधाचे मनुस्मृतींत जे नियम आहेत ते तात्पर्यरूपानें त्रिकालाबाधित आहेत, असें म्हटलें पाहिजे. मुलांनीं ब्रह्मचर्यापासून विद्याभ्यास कसा करावा, गृहस्थांनीं धर्माचरण करून कुटुंबपोषण कसें करावें, उत्तरवयांत मनुष्यानें निवृत्तीकडे कसें वळावें, व शेवटीं संन्यास धारण करून परमेश्वराच्या ठिकाणीं तादात्म्यबुद्धीनें त्यानें कसें लीन व्हावें, याजविषयीं जे नियम मनुस्मृतींत दिले आहेत ते मनूच्या वेळच्या परिस्थितीस जसे व जितके लागू होते, तसे व तितकेच आजहि लागू आहेत; व त्यापूर्वीं दोन हजार वर्षें

तितकेच लागू होते; व आजपासून पुढेंहि दोन हजार वर्षांनीं तितकेच लागू पडतील. कारण, हे नियम मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीस व स्वभावास अनुलक्षून व पूर्णपणें मनांत आणून, पूर्वाचार्यांनीं अनुभवानें फायदेशीर आहेत असें पाहून, घातले आहेत व म्हणूनच त्यांची थोरवी त्रिकालाबाधित आहे. केवळ पारलौकिक धर्माशीं किंवा ऐहिक कायद्यांशीं ज्यांचा संबंध आहे असे श्लोक निराळे करून, आचार व नीति या विषयांसंबंधानें मनुस्मृतींत असलेल्या श्लोकांचें एके ठिकाणीं ग्रथन केलें, तर एक अत्युत्तम नीतीचा ग्रंथ होईल. अशाच दृष्टीनें 'महाभारत' व 'रामायण' यांचा संक्षेप मीं केला आहे. पण मनुस्मृतीचा संक्षेप केला असतां तो याहूनहि फायदेशीर होईल, व तो खासगी किंवा सरकारी शाळांतून शिकविला असतां उत्तम संस्कृत व उत्तम रीतींचें नीतिशिक्षण, या दोन्ही दृष्टीनें बिनमोल होईल, असें मला वाटतें. (मानवधर्म अर्थात् संक्षिप्तमनु हा ग्रंथ मी तयार केला असून तो चित्रशाळेंत मिळेल हें येथें नमूद करतो.) आजचा निबंध मीं मनुस्मृतीच्या आधारानें लिहिला आहे एवढी प्रस्तावना करून, मुख्य विषयाकडे वळतों.

आश्रमव्यवस्थेंत पहिला आश्रम ब्रह्मचर्याचा आहे. वास्तविक पाहिलें असतां ब्रह्मचर्याश्रम सर्व देशांत, सर्व लोकांत व सर्व काळांत पाळला जातो, असें सकृद्दर्शनीं आपणास वाटतें. कारण, सर्व ठिकाणीं मुलें लहानपणीं विद्या शिकतात व कांहीं काळपर्यंत ब्रह्मचर्य पालन करितात, ही गोष्ट उघड आहे. पण ऋषींच्या ब्रह्मचर्याश्रमाची व्यवस्था निराळी व कडकडीत होती, हें सहज स्पष्ट होण्यासारखें आहे. हल्लीं आपल्यांत ब्रह्मचर्याश्रमाची केवळ थट्टा होत आहे, असेंच म्हणणें भाग पडतें. आठ नऊ वर्षांच्या वयांत उपनयनसंस्कार ताशेबाजे लावून केला, व दोन चार दिवसांनीं म्हणा किंवा दोनचार महिन्यांनीं

म्हणा समावर्तन किंवा सोडमुंज केली, म्हणजे आपण आपणास कृतकृत्य समजतों. पण हा केवळ देखावा आहे. ब्रह्मचर्याश्रमाचें खरें रहस्य आपण अगदीं विसरून गेलों आहों व म्हणूनच या देशाला अवनति प्राप्त झाली आहे, असें मला वाटतें. शास्त्राच्या हद्दताप्रमाणें जोंपर्यंत आपलीं मुलें ब्रह्मचर्याश्रमांत आपण ठेवणार नाहीं, तोंपर्यंत आपली शारीरिक स्थिति, आपलें नैतिक बल, आपलें विद्यातेज, हीं उन्नत स्थितीस पोंचणार नाहींत.

मुलाचें आठव्या वर्षी उपनयन करून त्यास शिकण्याकरितां गुरुगृहीं ठेवावें, हा ब्रह्मचर्याश्रमाचा पहिला पाया आहे. अति लहानपणीं मुलास शाळेंत घातल्यापासून त्याची शारीरिक वाढ खुंटते हें लक्षांत आणून, ऋषींनीं आठ वर्षांची मर्यादा केली आहे, क्षत्रियांना दहांची आहे, वैश्यांना बारांची आहे. सारांश, आठ, दहा, बारा यांवरच निर्बंध ठेविला पाहिजे असें नाहीं; पण कांहीं काळपावेतों आपल्या मातेच्या मायेखालीं राहून मुलानें खेळावें, वाढावें व टक्केटोणपे खाण्यास तयार व्हावें, हाच या वयोमर्यादेचा गर्भितार्थ आहे. कारण, विद्या शिकणें ती गुरुगृहीं शिकली पाहिजे, हा ब्रह्मचर्याश्रमाचा मुख्य कटाक्ष आहे. व गुरुगृहीं राहण्यास मुलगा हुशार व सशक्त झाला पाहिजे, नाहीं तर त्याची जोपासना होणार नाहीं. हल्लीं गुरुगृहीं ठेवणें हें या देशांतून नाहींसें झालें आहे. कदाचित् गुरु तसे नसतील, किंवा मुलांना आपल्यापासून निराळें ठेवणें आईबापांस अत्यंत कठिण वाटत असेल. पाश्चात्य देशांत मुलांस शाळेंत घातल्यानंतर लौकरच 'हेडमास्तर'च्या देखरेखीखालीं शाळेंत राहावें लागतें, ही व्यवस्था अद्यापहि अमलांत आहे. शाळेंत राहिल्यानें किंवा गुरुगृहीं राहिल्यानें मुलाचा विद्याभ्यास चांगला होतो; मुलगा हुशार होऊन स्वावलंबी होतो; मुलाचें लक्ष इतर व्यवसायांकडे—विशेषतः कुटुंबांतील व समाजांतील अनेक

मोहक गोष्टींकडे—लागत नाहीं. सारांश, मुलें या आश्रमांत सर्व तऱ्हेनें आपला पुढील आश्रम स्वीकारण्यास योग्य होतात. हल्लीं आपल्या देशांत गुरुगृहीं राहण्याची चाल बंद पडली आहे. तिचें पुनरुज्जीवन आपण जरी केलें नाहीं, तरी पाश्चात्य देशांतील व्यवस्थेप्रमाणें मुलें राहण्याजोग्या शाळा उत्पन्न होणें शक्य आहे व अवश्य आहे. पण अशा शाळांचीं सूत्रें स्वतः हातीं घेण्यासारखे उत्तम वर्तणुकीचे, ममताळू व भरंवसा ठेवण्यालायक लोक उत्पन्न व तयार झाले पाहिजेत. सारांश, ब्रह्मचर्याश्रमाचें मुख्य अंग जसें शिष्य आहेत, तसे उत्तम गुरु आहेत, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे.

गुरुगृहीं राहून वेदग्रहण करणें हें कार्य धर्मदृष्ट्या आद्य कर्तव्य आहे. पण मनुस्मृतींत इतर विद्याहि शिकविण्याविषयीं निषेध नाहीं,—किंबहुना स्पष्ट परवानगी आहे. तिन्ही प्रकारचे गुरु वंद्य आहेत,—जे लौकिक ज्ञान देतील, जे वैदिक ज्ञान देतील, किंवा जे आध्यात्मिक ज्ञान देतील,—असें स्पष्ट सांगितलें आहे.

लौकिकं वैदिकं वापि तथाध्यात्मिकमेव च ।
आददीत यतो ज्ञानं तं पूर्वमभिवादयेत् ॥

तेव्हां, हल्लींच्या स्थितीचा विचार करितांहि जरी आपण इंग्रजी विद्या शिकण्याविषयीं आपल्या मुलांस सांगितलें, तरी ती विद्या देणारे गुरु हे पूज्य आहेत, व त्यांस नमस्कार केला पाहिजे; व अशी विद्या शिकतांनाहि ब्रह्मचर्यधर्म पाळण्यांत कोणतीच आडकाठी नाहीं. कोणतीहि विद्या शिकतांना ब्रह्मचाऱ्यानें कसें वागावें, कसा अभ्यास करावा, इत्यादि गोष्टींविषयीं जे नियम मनुस्मृतींत फार विस्तृतरूपानें सांगितले आहेत, ते सर्व सांगत बसून वाचकांचा काळ मी घेऊं इच्छीत नाहीं. पण त्यांतील मुख्य मुख्य दोन चार सांगतो.

वर्जयेन्मधु मांसं च गंधं माल्यं रसान् स्त्रियः ।
अभ्यंगमंजनं चाक्ष्णोरुपानच्छत्रधारणम् ।
द्यूतं च जनवादं च परिवादं तथानृतम् ।
एकः शयीत सर्वत्र न रेतः स्कंदयेत् क्वचित् ।
नैनं ग्रामेऽभिनिम्लोचेत्सूर्यो नाभ्युदियात् क्वचित् ।
तं चेदभ्युदियात्सूर्यः शयानं कामचारतः ।
निम्लोचेद्वाप्यविज्ञानाज्जपन्नुपवसेद्दिनम् ।
चोदितो गुरुणा नित्यमचोदित एव वा ।
कुर्यादध्ययने यत्नमाचार्यस्य हितेषु च ॥

" ब्रह्मचाऱ्यांनें मद्य, मांस, सुवासिक अत्तरें, फुलें, मिष्टान्न, स्त्रिया, अभ्यंग ( उटणें लावून स्नान करणें ), डोळ्यांत काजळ घालणें, छत्री, जोडा, द्यूत, जनवाद, निंदा, खोटें बोलणें, हीं नेहमीं वर्ज्य करावीं. नेहमीं एकटें निजावें. समजून रेतस्कंद करूं नये. गांवांत असतांना सूर्योदय किंवा सूर्यास्त होऊं नये. विशेषतः ब्रह्मचारी निजला असतां जर सूर्योदय किंवा सूर्यास्त होईल, तर दिवसभर उपवास प्रायश्चित्त केलें पाहिजे. गुरु नेहमीं सांगतील त्याप्रमाणें विद्याभ्यास करावा, व न सांगतील तरी विद्याभ्यास करावा." वरील नियम ब्रह्मचारी विद्यार्थ्यांस किती अवश्य आहेत व कोणत्याहि काळीं व कोणत्याहि देशांत किती फायदेशीर आहेत, याचा विचार केला असतां मनूचे नियम त्रिकालाबाधित आहेत हें ध्यानांत येईल.

कदाचित् कोणी म्हणेल कीं, स्पार्टन लोकांतील लायकरगसानें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें हे फार कडकडीत आहेत. पण मला वाटतें कीं, लायकरगसाचे नियम मनुष्यस्वभावाला अत्यंत जखडून टाकणारे होते, तसे हे नियम नाहींत. लहानपणीं मुलांस जशी

संवय लावावी, तशी त्यांस लागूं शकते. ती त्यांच्या प्रकृतिधर्मांच्या विरुद्ध नाहीं. तसेंच विद्याभ्यास करणें हें लहानपणचेंच काम आहे. त्या वेळेस जसें चित्त एकाग्र होत असतें, तसें पुढें होत नाहीं. याकरितां विद्याभ्यासास, एकंदरींत शरीरप्रकृति सुदृढ होण्यास व नीतीचा पाया बळकट घालण्यास जशी बालवयांत संधि आहे, तशी पुढें नाहीं. पुढें पुष्कळ उपदेश केला, स्वत समजूं लायलें, किंवा ज्याचा त्यानें निश्चय केला,तरी दृढ झालेल्या झाडाच्या खोडाप्रमाणें मनुष्याच्या संवयी पालटत नाहींत. याशिवाय मुलगा गुरुगृहीं असल्यामुळें त्याजला लायकरगसच्या कायद्याप्रमाणें केवळ कडकडीत नियमनाचा वांटा मिळत नाहीं, तर ममता व गृहसौख्य अल्प प्रमाणानें मिळत असतें. ब्राह्मणांनीं मधुकरी वृत्तीनें पोट भरावें व गुरूला भिक्षेनें मिळविलेलें अन्न निवेदन करून खावें, असें सांगितलें आहे खरें. पण हा नियम क्षत्रियवैश्यांना लागू नाहीं, असें स्पष्ट सांगितलें आहे. अलीकडच्या ब्राह्मणांचाहि विद्याभ्यास क्षत्रियवैश्यांसारखाच असल्यानें त्यांस भैक्ष्यचर्याचा नियम लागू नाहीं. सारांश, आईबापांनीं मुलांची जेवणाखाण्याची तरतूद व्यवस्थित ठेवावी, पण ती गुरुगृही किंवा गुरूच्या नजरेखालीं असली पाहिजे. तात्पर्य, वर दिलेले ब्रह्मचर्याचे नियम पाळण्यास कठिण नाहींत; व असे नियम पाळून ब्रह्मचर्याश्रमीं जे तयार होतील, ते खरोखर देशाच्या भावी कल्याणाचे आधारस्तंभच होतील. नियमित आचरणानें व सात्त्विक अन्नानें सुदृढ व निरोगी झालेल्या शरीराचे, विद्यार्जनानें संस्कृत झालेल्या मनाचे व कडकडित ब्रह्मचर्य पाळल्यानें कधींहि झांकलें न जाणाऱ्या तेजानें सोज्ज्वल दिसणाऱ्या मुखश्रीचे, तरुण लोक पुढील गृहस्थाश्रम घेण्यास अत्यंत योग्य आहेत; इतकेंच नव्हे, तर शरीरानें व नीतीनें अधिकाधिक उन्नत स्थितीस पोंचणाऱ्या भावी प्रजेचे मूळ आहेत असें कोण

म्हणणार नाहीं ? सारांश, ब्रह्मचर्याश्रम म्हणजे a sound mind in a sound body साध्य करण्याचा सर्वोत्तम मार्ग आहे, असें कोणीहि कबूल करील.

ब्रह्मचर्याश्रमानंतर दुसरा आश्रय गृहस्थाश्रमाचा. गृहस्थाश्रम कसा पाळावा याजबद्दलहि विशेष नियम पाहिजेत असें सकृद्दर्शनीं वाटत नाहीं. पण या आश्रमाचे नियम ब्रह्मचर्याश्रमासारखेच अवश्य व उपयुक्त आहेत, हें आपल्या सहज लक्षांत येईल. प्रथम ब्रह्मचर्याश्रम संपवून गृहस्थाश्रम केव्हां स्वीकारावा, याविषयीं विचार करूं. संपूर्ण विद्या अवगत केल्यानंतर गुरुची आज्ञा घेऊन, गुरूला दक्षिणा देऊन नंतर विवाहविधि करावा, अशी आपल्या आश्रमव्यवस्थेची आज्ञा आहे. पण ब्रह्मचर्याश्रमाचा जसा आपल्यांत फार्स मात्र राहिला आहे त्याचप्रमाणें गृहस्थाश्रमाचा फार्मच राहिला आहे. मुलाची विद्या संपण्यापूर्वींच कित्येक वर्षे आपण त्याचें लग्न करतों. मुळीं ब्रह्मचर्यच जें आपण थोडें केलें आहे, त्याचा उद्देश तरी मुलाचें लग्न लवकर करितां यावें, हाच आहे. पण असें करण्यानें गृहस्थाश्रम केवळ नामशेप मात्र राहिला आहे. त्याचा खरा उद्देश आपण विसरलों आहों, यांत शंका नाहीं. संपूर्ण विद्या झाल्याशिवाय गृहस्थाश्रमाकडे वळतांच येत नाहीं, या तत्त्वावर कोणीच कटाक्ष ठेवीत नाहीं. प्रत्येक वेदाला बारा वर्षें, याप्रमाणें छत्तीस वर्षें ब्रह्मचर्य पाळावें असा मनुस्मृतीचा प्रथम कल्प आहे. एक वेद जरी घेतला, तरी बारा वर्षें हीं पाहिजेतच. अलीकडे वेदविद्या जरी आपण शिकत नाहीं, इतर विद्या शिकतों, तरी बारा वर्षांहून कोणत्याहि विद्येस कमी काळ लागत नाहीं. निदान बारा वर्षें, म्हणजे एक तप विद्येंत घातलें पाहिजे; म्हणजे कमींत कमी आठवे वर्षीं उपनयन आणि बारा वर्षें विद्याभ्यास, मिळून वीस वर्षांच्या आंत विवाह करितां येत नाहीं. पुराणांतलीं

वांगीं पुराणांत म्हणून या विषयाकडे धर्मशास्त्रदृष्ट्या, जरी आपण पाहिलें नाहीं, तरी अर्थशास्त्रदृष्ट्या, व्यवहारदृष्ट्या, शारीरिकशास्त्रदृष्ट्या वीस वर्षांपूर्वी मुलाचा विवाह करणें इष्ट नाहीं. मनूची आज्ञा यासंबंधीं स्पष्ट व विचार करण्यासारखी आहे.

त्रिंशद्वर्षोद्वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम्
त्र्यष्टवर्षोऽष्टवर्षां वा धर्मे सीदति सत्वरः ।

" तीस वर्षांच्या मनुष्यानें बारा वर्षांच्या मुलीबरोबर विवाह करावा, चोवीस वर्षांच्या मनुष्यानें आठ वर्षांच्या मुलीशीं विवाह करावा, याहून जलदी करील तर धर्महानि होईल. " वरील वचनावरून चोवीस वर्षांच्या पूर्वी विवाह करण्याची घाई पुरुषानें करूं नये हें मनूनें स्पष्ट सांगितलें आहे. मनूनें केलेलें हें गृहस्थाश्रमाचें वर्णन पुष्कळसें पाश्चात्य स्थितीस लागू पडतें. इकडे आपलेकडे मनु केवळ शब्दानेंच पूज्य आहे, हें उघड आहे. गुरुगृहीं विद्याभ्यासाचें तत्त्व जसें पाश्चात्य देशांत अद्याप जागृत आहे, तसें पुरुषांनीं चोवीस वर्षांपूर्वी विवाह कारण्याची घाई न करणें, हेंहि त्याच देशांत अद्याप प्रचलित आहे. या श्लोकांत मुलीच्या 'वयाची मर्यादा फार थोडी आहे, असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण वरील श्लोकांत पुरुषाच्या वयाची कमींत कमी मर्यादा जशी दिली आहे तशीच बायकांची कमींत कमी मर्यादा दिली आहे, हें आपण लक्षांत आणलें पाहिजे. म्हणजे याहून मुलगी जास्त नसावी असा कटाक्ष नाहीं, तर याहून कमी नसावी असा कटाक्ष आहे. धर्मे सीदति सत्वरः हें कारण स्त्रीपुरुषांस दोघांसहि लागू आहे व त्याचें बीज शोधण्यास फार लांब जाणें नको. जर गृहस्थाश्रम स्वीकारल्यावर पतिपत्नींनीं गार्हपत्य—अग्निहोत्र स्वीकारावयाचें आहे, तर लहान मुलगी कशी चालेल ? सारांश पुरुषाची कमींत कमी वयोमर्यादा चोवीस व मुलींची आठ सांगि-

तली आहे. याहून मोठी असली तर चालेल इतकेंच नाहीं, तर यांतील पदांवरून मोठीच प्रशस्त आहे.

गृहस्थाश्रम प्रारंभ करितांना वयोमर्यादेचे जसे नियम आम्ही धाऱ्यावर ठेविले आहेत, त्याप्रमाणें तो पाळण्याचेहि नियम तसेच सोडून दिले आहेत, असें म्हणावें लागतें. प्रथम अग्निहोत्र हें तर लुप्त झालेंच आहे. पण तो विषग केवळ धर्मसंबंधीं आहे म्हणून आपण सध्या तो एकीकडे ठेवूं. अग्निहोत्र न बाळगतां दुसरा उद्योग आपण करितों त्यामुळें आपणास अग्नि ठेवितां येत नाहीं असें जरी मानिलें, तरी तो उद्योग तरी आम्ही गृहस्थाश्रमाच्या नियमाप्रमाणें करितों आहों काय? व जे धर्म पाळण्यास आमचे व्यवसाय आमचे आड येत नाहींत, तेहि आम्ही कितपत पाळतों, याचा विचार केला पाहिजे. गृहस्थाचे धर्म मनुस्मृतींत अनेक दिले आहेत, पण ते सर्व येथें सांगणें दुरापास्त आहे. ब्रह्मचर्याश्रमाचे मुख्य नियम जसे पूर्वी दिले, तसे गृहस्थाश्रमाचे मुख्य नियम येथें देतों. प्रथम प्रारंभ स्त्रीचा संतोष ठेवणें येथून मनूनें केला आहे.

यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥
संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥

"ज्या कुटुंबांत बायकांस पूज्य मानिलें जात नाहीं, त्या ठिकाणीं सर्व क्रिया निष्फळ आहेत व जेथें त्या पूज्य मानिल्या जातात, तेथें देवता रममाण होतात. नवऱ्यानें बायकोशीं संतुष्ट व बायकोनें नवऱ्याशीं संतुष्ट असावें. असें असते तेथें कल्याण नेहमीं राहणार आहे." सारांश, गृहस्थधर्म पतिपत्नींना आचरण करणें आहे, तो परस्परांनीं प्रेमानें व पूज्यभावानें करावा, हें प्रथम कर्तव्य आहे. दुसरें कर्तव्य

अतिथिपूजन आहे. अन्न देववत नसेल, तर इतर रीतीनें अतिथीचा संतोष केला पाहिजे.

तृणानि भूमिरुदकं वाक्चतुर्थीच सूनृता ।
एतान्यपि सतां बेहे नोच्छिद्यन्ते कदाचन ॥

हा प्रसिद्ध श्लोक मनुस्मृतींतला आहे. आतां येथें अशी शंका येईल कीं अतिथीला जेवावयाला घालणें म्हणजे या काळांत मोठें कठिण आहे. पण या गोष्टीचा विचार स्मृतिकारांनीं पूर्ण केला आहे. कधीं काळीं प्रयासानें येणारा विद्वान् गरीब ब्राह्मण असेल व जो एकटा राहणार असेल, तोच अतिथि समजावा, इतर अतिथि नाहींत, असें स्पष्ट सांगितलें आहे. भिक्षा मागणें किंवा उगीच्या उगीच दुसऱ्याच्या उद्योगावर आपलें पोट भरणें, हें धर्मशास्त्रास मुळींच पसंत नाहीं. यासंबंधानें आपल्या लोकांत बराच गैरसमज झालेला आहे. हा एक स्वतंत्र विषय आहे; तो येथें विशेपरीतीनें प्रतिपादन केल्यास विषयांतर होईल. पण एवढें सांगणें येथें जरूर आहे कीं, धर्म करणें किंवा भिक्षा देणें हा पुण्यासाधनाचा उत्तम मार्ग आहे, असें आपलीं शास्त्रें सांगतात, त्याबरोबर हीहि गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, दान घेणें किंवा भिक्षा मागणें हें त्याहूनहि प्रबल पापाचें साधन आहे, असें शास्त्र म्हणतें. हल्लीं दुसऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून, पहिल्या गोष्टीकडेसच जास्त लक्ष असल्याचें दिसतें. गृहस्थाश्रम्याला आपलें आपण पोट भरतां आलें पाहिजे व त्यानें उद्योगाचा अवलंब केला पाहिजे. भिक्षेचा अवलंब करणें अगदीं गर्ह्य आहे. अतिथिवृत्तीनें दुसऱ्याचे घरीं जाणें केवळ ब्राह्मणालाच अनुज्ञात आहे, इतरांस नाहीं. व जे ब्राह्मण प्रतिग्रह घेत नाहींत—म्हणजे क्षत्रवृत्तीनें राहातात त्यांसहि अतिथिवृत्तीनें जाणें योग्य नाहीं. सारांश, ब्राह्मणाला सुद्धां भिक्षावृत्ति

निंद्य सांगितली आहे. फारच प्रसंग आला तर राजापासून, किंवा यजमान किंवा शिष्य यांजपासून धन मागावें, दुसऱ्यापाशीं मागूं नये.

राजतो धनमन्विच्छेत् संसीदन्स्नातकः क्षुधा ।
याज्यान्तेवासिनोर्वापि न त्वन्यत इति स्थितिः ॥
न सीदेत् स्नातको विप्रः क्षुधा शक्तः कथंचन ।
न जीर्णमलवद्वासा भवेच्च विभवे सति ॥

"आपल्या जवळ ऐपत आहे, तर गृहस्थानें जीर्ण मळकट वस्त्रें कधीं परिधान करूं नयेत." हा महत्वाचा आदेश लक्षांत ठेवला पाहिजे.

गृहस्थाश्रम्यांनीं परावलंबन न करितां, भिक्षा न मागतां, आपल्या उद्योगानें पोट भरलें पाहिजे, इतकेंच नव्हे, तर अश्रान्त मेहनत करून आपली संपत्ति व ऐश्वर्य वाढविण्याविषयीं यत्न केला पाहिजे. हें त्याचें तिसरें कर्तव्य आहे. हिंदु लोकांचा धर्म केवळ निवृत्तिपर आहे असें पुष्कळ लोक मानितात, व गृहस्थांनीं फार मेहनत न घेतां केवळ आपला चरितार्थ चालवावा एवढीच धर्मशास्त्राची इच्छा आहे, असें कित्येक समजतात. अशा समजुतीमुळें आपल्या लोकांस मुर्दाड, भ्याड,आळशी अशा संज्ञा प्राप्त झाल्या आहेत. मला वाटतें कीं, गृहस्थाश्रम्यांच्या कर्तव्याविषयीं हा एक मोठा गैरसमज आहे.मनुस्मृतीची आज्ञा याहून अगदीं उलट आहे, हें खालील श्लोकावरून व्यक्त होईल—

नात्मानमवमन्येत पूर्वाभिरसमृद्धिभिः ।
आमृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभाम् ॥

"आपण पूर्वीं असमृद्ध किंवा दरिद्री होतों किंवा हल्लीं आहों असें म्हणून गृहस्थानें आपली स्वतःची अवहेलना कधींहि करूं नये. तर जोंपर्यंत जिवांत जीव आहे, तोंपर्यंत गृहस्थानें श्री म्हणजे संपत्ती-करितां यत्न करावा, ती दुर्मिळ आहे असें कधींहि समजूं नये." संसाराच्या दुर्गम यात्रेंत वारंवार निराश होण्याऱ्या गृहस्थास निरंतर

उद्योग करण्याविषयीं धैर्य देणारे हे मनूचे शब्द किती जोरदार व मार्मिक आहेत !

गृहस्थानें उद्योग करून लक्ष्मी प्राप्त करून घेण्याविषयीं जसा स्मृतीचा प्रशंसनीय उपदेश आहे, तसाच उद्योग कोणता करावा याजविषयींहि मनूची आज्ञा फारच उदात्त आहे. परावलंबी उद्योग न करितां स्वावलंबी उद्योग गृहस्थानें करावे, याजविषयीं खालचे श्लोक सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखे आहेत.

यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत् ।
यद्यदात्मवशं तु स्यात्तत्तत्सेवेत यत्नतः ॥
सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।
एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥

स्वतंत्र उद्योग करून गृहस्थानें पोट भरावें, याविषयीं मनुस्मृतीची आज्ञा सर्वथैव योग्य व सर्व देशांस सर्व काळीं लागू पडणारी आहे. विशेषतः ब्राह्मणांनीं राजसेवा करूं नये, याविषयीं धर्मशास्त्राचा कटाक्ष आहे. जरी तो अलीकडच्या स्थितींत विशेष मान्य होण्यासारखा नाहीं व राजसेवेशिवाय ब्राह्मणाचें चालणें दुरापास्त आहे, तत्रापि क्षात्रवृत्ति ब्राह्मणाखेरीज इतरांनीं तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

गृहस्थांनीं साधारणरीत्या कसें वागलें पाहिजे याविषयींचे मनुस्मृतींतील उदात्त विचार वाचकांना सादर करून, हा भाग आपण पुरा करूं. प्रत्येक मनुष्यास संसारांत असें दिसून येतें कीं, धर्माचरणानें कधीं कधीं आपलें नुकसान होतें, व अधर्माचरण करणारे लोक सुस्थिति पावतात; त्यामुळें मनाची साहजिक प्रवृत्ति होते कीं, सध्यां फायदा होत आहे किंवा नुकसान टळतें आहे, तर एवढा वेळ खोटें बोलूं या किंवा खोटें कर्म करूं या, असा आपल्या बुद्धीला या

विचित्र संसारांत, विशेषतः गृहस्थाश्रम्यास वारंवार व्यामोह होतो परंतु अशा प्रसंगीं मनुष्यानें नीतिधैर्य कधींहि सोडतां कामा नये.

न सीदन्नपि धर्मेण मनोऽधर्मे निवेशयेत् ।
अधार्मिकाणां पापानामाशु पश्यन्विपर्ययम् ॥
अधर्मेणैधते तावत् ततो भद्राणि पश्यति ।
ततः सपत्नाञ्जयति समूलस्तु विनश्यति ॥

" धर्माचरणापासून आपल्यास त्रास होत असला तरीहि मन अधर्माकडे प्रवृत्त होऊं देऊं नये. कारण, अधार्मिक पापवृत्ति लोक यांचा नाश लौकरच होतो, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. कांहीं वेळपर्यंत अधर्मानें मनुष्य वाढतो, नानाप्रकारचीं सुखें भोगतो, आपल्या शत्रूस जिंकितो; पण शेवटीं त्याचा समूळ नाश होतो. "

न ईदृशमनायुष्यं लोके किंचन विद्यते ।
यादृशं पुरुषस्येह परदारोपसेवनम् ॥

हेंहि व्रत गृहस्थांनीं नीट लक्षांत ठेविलें पाहिजे.

मातापितृभ्यां यामीभिर्भ्रात्रा पुत्रेण भार्यया ।
दुहित्रा दासवर्गेण विवादं न समाचरेत् ॥

हा उपदेशहि मार्मिकतेचा आहे. आईबाप, भावजया, भाऊ, पुत्र, भार्या, मुली आणि आपले सेवक यांशीं विवाद अथवा भांडण करूं नये. प्रसंगानें आपल्यास जर हार खावी लागली, तरी खावी व त्यांस वश ठेवावें. कारण—

एभिर्जितैश्च जयति सर्वांल्लोकानिमान् गृही ।

या बंधुवर्गास आपल्याशीं संतुष्ट ठेविल्यानें गृहस्थाश्रमी सर्व लोकांस जिंकूं शकतो.

तस्मादेतैरधिक्षिप्तः सहेतासज्वरः सदा ।

तेव्हां हे आप्तवर्ग आपल्यास टाकून बोलले, तरी त्यांचें बोलणें राग न मानतां सहन करावें.

परित्यजेदर्थकामौ यौ स्यातां धर्मवर्जितौ ।
धर्मं चाप्यसुखोदर्कं लोकविक्रुष्टमेव च ।

या वाक्यांत थोडक्यांत साधारणरीत्या गृहस्थानें कसें आचरण करावें, हें सांगितलें आहे. अर्थ, काम हे धर्माला अविरुद्ध असतील तितके सेवन करावे, व धर्म तोच सेवन करावा कीं, ज्यापासून असुख किंवा लोकनिंदा प्राप्त होणार नाहीं. याप्रमाणें धर्म, अर्थ व काम या तिहींचें यथाशक्ति सेवन करून

महर्षिपितृदेवानां गत्वानृण्यं यथाविधि
द्वितीयमायुषो भागः कृतदारो गृहे वसेत् ॥

तें कोठपर्यंत ?—

गृहस्थस्तु यदा पश्येत् वलीपलितमात्मनः
अपत्यस्यैव चापत्यं तदारण्यं समाश्रयेत् ॥

"आपल्या अंगास चिरम्या पडल्या किंवा केंस पांढरे झाले व पुत्रास पुत्र झाला असें पाहून गृहस्थाश्रम संपवून मनुष्यानें वानप्रस्थ आश्रम स्वीकारावा." आतां आपण पुढील दोन आश्रमांचा विचार करूं.

ब्रह्मचर्याश्रम व गृहस्थाश्रम हे प्रत्येक देशांत व प्रत्येक काळांत आहेत. कारण हे मनुष्याच्या साहजिक प्रवृत्तीलाच धरून आहेत. पण पुढचे वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम अन्य देशांत सांपडत नाहींत. किंबहुना ते हिंदुस्थानांत प्राचीन ऋषींनींच अमलांत आणले, असें म्हणावें लागतें. पाश्चात्य लोकांत पहिल्या दोन आश्रमांचें सेवन उत्तम प्रकारें होतें, व आपल्यांत त्याची हल्लीं बहुतेक थट्टा होत आहे, असें मी प्रारंभीं ह्मटलें. पण पुढील आश्रमांचें कोठें अस्तित्व

खरोखर असेल, तर तें आपल्यांतच आहे, व पाश्चात्य देशांत त्यांची कल्पना नाहीं आणि कदाचित् असली तर ती वरकरणीच आहे असें म्हटलें पाहिजे. प्रवृत्ति व निवृत्ति हे दोन मनाचे ओघ बहुतेक सर्व देशांत व सर्व लोकांत आहेत. पण प्रवृत्तीचा ओघ नेहमीं जास्त बलवान् असून निवृत्तीचा झटका क्षणिक असतो. दोन्ही वृत्तींचें यथाकाल व यथायोग्य सेवन कसें करावें, हेंच आश्रमव्यवस्थेचें खरें रहस्य आहे, व ती व्यवस्था लावण्याचें श्रेय आर्य ऋषींकडे आहे. हा विषय किंचित् गहन असून बराच वादग्रस्त आहे. निवृत्तिमार्ग सेवन करण्यासारखा आहे किंवा नाहीं हाच प्रश्न प्रथमदर्शनीं उद्भवतो. पाश्चात्य सुधारणेच्या अग्रणी लोकांनीं निवृत्तिसेवन सर्वथैव टाकिलें आहे, असें दिसतें. संसारांतील सुखाचें सेवन करणें हेंच मनुष्याचें खरें कर्तव्य आहे असें पुष्कळ लोकांचें मत आहे. संसारांतील सुखापासून पराङ्मुख होणें कोणत्याहि दृष्टीनें न्याय्य नाहीं. ऐहिक दृष्टीनें म्हणा किंवा परमार्थदृष्टीनें म्हणा तपश्चरणापासून कांहीं फायदा होतो, असें म्हणणें पुष्कळांस ग्राह्य नाहीं. हा एक पक्ष आहे. दुसऱ्या पक्षीं असें मत आहे कीं, इंद्रियांनीं भोगिलेल्या विषयांचें क्षणिक सुख हें कधीं खरें सुख मानलें जाण्यासारखें नाहीं. कारण त्याचा अंत नेहमीं दुःखांत आहे. हें सुख शाश्वत नाहीं, नाशिवंत आहे. व इंद्रियदमन केल्यानेंच मनुष्यास मानसिक चिरस्थायि सुख भोगितां येतें. इंद्रियदमन केल्यानें मोक्ष किंवा त्याप्रकारचें दुसरें परत्रसुख मिळेल, हा भाग जरी एके बाजूस ठेविला, तरी याच देहांत इंद्रियदमनापासून खरें सुख मनुष्यास अनुभवितां येते; सर्व प्रकारचे विकार सहन करण्याची शक्ति त्यास प्राप्त होते. संसारांतील जय अपजय, मान अपमान इत्यादि अपरिहार्य गोष्टींनीं होणारें नाशिवंत सुख व दुःख त्यास कधीं होत नाहीं, सारांश, प्रवृत्तिमार्गापेक्षां निवृत्ति मार्गांतच मनुष्यास खरें सुख आहे.

व त्यांचेंच सेवन नेहमीं करावें हा दुसरा पक्ष आहे. या दोन्ही पक्षांचीच, Material and Spiritual, प्रवृत्ति व निवृत्ति, Epicuriansm and Stoicism अशीं नांवें व स्वरूपें आहेत, असें म्हटलें तरी चालेल.

इतिहासाचें आलोचन केलें असतां निवृत्तीचा मूळ उगम हिंदुस्थानांत दृष्टीस पडतो. येथूनच त्याचा प्रवाह पाश्चात्य देशांत गेला असावा. ग्रीक लोकांत स्वतंत्रपणें अशा प्रकारचे दोन पक्ष उत्पन्न झाले होते यांत शंका नाहीं. पण एपिक्यूरियन व स्टोईक या तत्त्वांस किंवा तत्त्ववेत्यांच्या मतांस धर्माचें स्वरूप प्राप्त झालें नाहीं. वैराग्य व वैराग्यापासून साहजिक उत्पन्न होणारा संसार सोडून अरण्यांत जाऊन राहण्याचा संप्रदाय, आणि त्या ठिकाणीं शारीरिक व मानसिक तप आचरण्याचा प्रघात हीं प्रथमतः आर्य ऋषींत उत्पन्न झाली. त्यानंतर त्याचें एक अंग बुद्धानें उचललें. जगांतील नानाप्रकारचीं कष्टप्राय दुःखें पाहून हरएक मनुष्याच्या मनांत क्षणिक वैराग्य उत्पन्न होतें. पण असें श्मशानादि वैराग्य थोडाच वेळ राहून पुनः मनुष्य संसाराकडे प्रवण होतो.अलौकिक कल्पनाशक्तीच्या माणसांची गोष्ट निराळी आहे. झाडावरून फळ पडतांना साधारण मनुष्यास कांहीं चमत्कार वाटणार नाहीं. पण याच चमत्काराच्या द्वारानें न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत काढला. गौतमबुद्ध हा राजपुत्र होता. राजपुत्राचें सर्व ऐश्वर्य भोगीत असतां वृद्ध मनुष्य, आजारी मनुष्य, व मेलेला मनुष्य अशा तीन मनुष्य देहाच्या नेहमीं होणाऱ्या अवस्था पाहून, तो एकदम विरक्त झाला. संसारांतील सुख सर्व नश्वर आहे असें त्याच्या हृदयांत पूर्ण बिंबलें. व बायकोची व प्रिय पुत्राची भेट न घेतां,तो तसाच अरण्यांत निघून जाऊन संसाराच्या या अतर्क्य घडामोडीसंबंधानें विचार करीत बसला. त्यानें एक नवीन धर्म स्थापन

केला. त्यांत संन्यासवृत्तीला इतकें पसंत केलें आहे कीं, भिक्षु आणि भिक्षुकिणी यांनीं गांवापासून निराळ्या विहारांत राहून केवळ भिक्षा मागून पोठ भरून योगसाधन करावें, असा त्यानें निर्बंध केला. त्याप्रमाणें बुद्धभिक्षूंकरितां धार्मिक लोकांनीं अनेक विहार बांधून दिले. बुद्धधर्माच्या या स्वरूपाचा पगडा ख्रिस्तीधर्मावर पडला, असें मला वाटतें. जगतांतील सुखें तुच्छ मानून, त्यांजवर लाथ मारून निवृत्त होण्याचा पंथ ख्रिस्तीधर्मांतहि यापुढें उत्पन्न झाला. 'मंक' म्हणतात ते एक स्वरूपाचे भिक्षुच होत; व स्त्रिया याप्रमाणें कांहीं विशेष दुःखाच्या झटक्यांत विरक्त झाल्या असतां 'ननूस्' अथवा भिक्षुकिणी होऊं लागल्या. Monks म्हणजे भिक्षु व Nuns म्हणजे भिक्षुकिणी, यांना राहाण्याकरितां व धर्माचरण आणि तपश्चरण करितां यावें या हेतूनें माठे मोठे मठ ठिकठिकाणीं श्रीमान् धर्मशील लोकांनीं बांधून दिलें. भिक्षु व भिक्षुकिणी यांनीं ईश्वरोपासना करावी एयढेंच मत कायम झालें असें नाहीं, तर हिंदु धर्मांतील कल्पनेप्रमाणें शारीरिक तप त्यांनीं करावें असें तत्त्व ख्रिस्तीधर्मांत प्रथमथः स्वीकृत झालें. शारीरिक तपाची कमाल जशी आपल्या देशांत होती, त्याप्रमाणें प्रथम प्रथम ख्रिस्ती लोकांनीं केली. एका साधूची गिबननें हकीगत दिली आहे त्यांत, त्या साधूनें एका उंच खांबावर राहून खालीं न येतां वर्षानुवर्षें तपश्चरण केलें व पुढें तो ख्रिस्ती धर्मांत Saint म्हणून प्रसिद्ध झाला, असें हें वर्णन आहे, संसारत्याग करून परमेश्वरसेवेंत किंवा शारीरिक तपांत आयुष्य घालविणें हें एक अत्यंत पवित्र व्रत आहे, व त्यापासून मनुष्यास ऐहिक सुख न मिळालें तरी पारमार्थिक आनंद मिळून कांहीं एक प्रकारची विशिष्ट शक्ति त्यास प्राप्त होते, हें तत्त्व व ही कल्पना मुसलमानी धर्माच्या इतिहासांतहि दृष्टीस पडते.

निवृत्ति धर्म, संन्यास, योग इत्यादि गोष्टींचें बीज प्राचीन ऋषींच्या

धर्मांत प्रथम आहे, व तेंच वृक्षरूपानें बौद्धधर्मांत व नंतर ख्रिस्ती धर्मांत दृष्टीस पडतें. पण त्या धर्मांत त्या गोष्टींना जे आळे पाहिजे होते ते घातले नसल्यामुळें पुढें तो वृक्ष सुस्थितीस पोहोंचला नाहीं. पाहिजे त्या मनुष्यास पाहिजे त्या वेळेस भिक्षु अथवा मंक होण्याची परवानगी असल्यामुळें हळूहळू त्याचें निवृत्तिस्वरूप कमी होत गेलें. मनुष्यास अनेक प्रसंग असे येतात कीं, त्या वेळेस त्यास संसार नको असें वाटतें, व तो झटका बळकट असल्यास व त्या मनुष्याचें चित्त कोमल असल्यास अशा प्रसंगीं तो मोठ्या उत्साहानें भिक्षु अथवा मंक होतो. पण, निवृत्तिवृत्तीला टिकाव धरणें फार कठिण आहे. थोडक्याच काळानें त्या वृत्तीचा लोप होऊन मनुष्याचें अंतः-करण आपल्या आप्तवर्गाकडे, आपल्या इष्टमित्रांकडे, आपल्या आव-डत्या व्यवसायाकडे पुनः धावूं लागतें; किंबहुना त्याचे मनोविकार इतके प्रबल होतात कीं, त्यास त्या नवीन निवृत्तिस्थितींत राहणें कठिण पडतें. अशा प्रकारच्या अनुकंपनीय मुग्ध लोकांचें वर्णन अनेक इंग्लिश कादंबऱ्यांतून आपण वाचतों. स्कॉटच्या ग्रंथामध्यें असे पुरुष व स्त्रिया यांच्या अंतःकरणाच्या स्थितीचीं चित्रें फारच अप्रतिम काढलीं आहेत. अलीकडील एका इंग्रजी कादंबरींत या विषयाचें फारच मनोहर चित्र काढलेलें मीं वाचलें आहे. त्यांतील नायिका Miss Glory ही प्रवृत्तीची पुतळी आहे असें ग्रंथकर्त्यानें कल्पिलें आहे, व त्यांतील नायक Mr, Storm हा निवृत्तीचा कट्टा अभिमानी आहे. निवृत्त होऊन मठांत गेला असतांहि आपल्या नाटकांत गेलेल्या प्रियेविषयीं त्याला आठवण होऊन त्याचे मनोवि-कार वारंवार अनावर कसे होऊं लागले, व त्याच्या मठांत असलेल्या इतर लोकांच्याहि मनाची स्थिति अंतस्थ रीतीनें आपल्याचप्रमाणें होती हें त्याच्या उघडकीस कसें आलें, व शेवटीं तो मठ अशा

कारणांनीं कसा मोडकळीस आला, याचें मनोहर वर्णन या कादंबरींत केलें आहे.

बुद्धधर्मांत स्थापिलेल्या मठांची व पाश्चात्य देशांत रोमन क्याथलिक धर्मांत स्थापिलेल्या मोनॅस्टरीजची हीच वाट झाली. पाहिजे त्या वयांतले लोक मठांत घेतल्यामुळें—वैराग्याचें तेज फार वेळ टिकत नसल्यानें—मठवासी लोक निवृत्तिमार्गांत टिकत नाहींसे झाले. याशिवाय निवृत्तीमध्यें जनसमूह एके ठिकाणीं करणें हेंहि विघातक आहे. भिक्षूंचा मठ स्थापन करणें हेंच माझ्या मतें त्या मठाच्या चिरस्थायिपणाला मोठें हानिकारक आहे. कारण समूहाचें काम उच्चनीच भावाशिवाय व समाजव्यवस्थेशिवाय होत नाहीं. तसेंच मोठ्या समूहाची व्यवस्था लागणें पैशाशिवाय होत नाहीं. पैसा येऊं लागला, जमीन तुम्ही संपादन होऊन वहिवाटूं लागला, कीं लागलीच निवृत्तिवृत्तीचा उच्छेद होऊन प्रवृत्तिमार्गाकडे मनाला ओढतें लागतें. सारांश, अशा अनेक कारणांनीं भिक्षुमठांची संस्था चांगली राहिली नाहीं, व चांगली न राहिल्यामुळें हिंदुस्थानांत जसा तिचा उच्छेद झाला, त्याचप्रमाणें पाश्चात्य देशांतहि monasteries ची वाढलेली संपत्ति व मंक्स् लोकांचें परमार्थाला सोडून केवळ ऐहिक विषयांत निमग्न झालेलें आचरण हेंच त्यांच्या नाशास कारण झालें, व तिकडे प्रॉटेस्टंट देशांतून मोनॅस्टरींच्या संस्था नाहींशा झाल्या.

निवृत्तिपर संस्थांचा असा साद्यंत पण थोडक्यांत इतिहास देण्याचें कारण इतकेंच कीं, तो इतिहास मनांत आणिला असतां हिंदु धर्मांतील ऋषींची निवृत्तिपर आश्रमव्यवस्था किती शहाणपणाची आहे, हें आपल्या सहज लक्षांत येईल. प्रथम आयुष्याचे चार भाग करून पहिले दोन भाग प्रवृत्तिपर दोन आश्रमांस दिले; व पुढचे दोन भाग निवृत्तिपर दोन आश्रमांस दिले. ज्या पाश्चात्य देशांत निवृत्तीचें मुळींच

वारें राहिलें नाहीं, ते देश म्हणजे चुकले आहेत किंवा अधार्मिक आहेत, असा माझ्या म्हणण्याचा भाव नाहीं. पण हिंदुस्थानांत निवृत्तीचें बीज फार जुनें असल्याकारणानें मनुष्यानें आपल्या आयुष्यांत नेहमींच विषयोपभोगांत मग्न न राहतां केव्हांतरी वैराग्याकडे वळावें असा शास्त्राचा कटाक्ष आहे; आणि हा वावगा नाहीं असें मला वाटतें. पण शास्त्रानें असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, इंद्रियग्राम बलवान् आहे तोंपर्यंत वैराग्याकडे वळणें हें व्यर्थ आहे. इंद्रियें शिथिल झाल्यावर विषयसुखांत लंपट राहणें हें मात्र ठीक नाहीं असें या व्यवस्थेचें इंगित आहे. करितां मनुस्मृतीनें वानप्रस्थ आश्रम घेण्याकरितां जी वयाची मर्यादा सांगितली आहे, ती खरोखर मोठी दूरदृष्टीची आहे असें म्हटलें पाहिजे.

ब्रह्मचर्याश्रमांतूनच प्रव्रज्याश्रम करावा असें कांहीं ठिकाणीं शास्त्रांत लिहिलें जाहे. पण हें लक्षांपैकीं,शंकराचार्य—रामदासासारख्या एखाद्या व्यक्तीकरितां आहे. सर्वसामान्य नियम म्हटला म्हणजे ब्रह्मचर्यांतून गृहस्थाश्रमांत जाऊन पुत्रपौत्र झाले, म्हणजे मगच वानप्रस्थ आश्रम घेण्याविषयींची आज्ञा धर्मशास्त्रांतून स्पष्ट आहे. बरें, एकदम संन्यास घेण्याविषयीं शास्त्राज्ञा नाहीं. जसें प्रवृत्तीचे दोन आश्रम केले आहेत; म्हणजे एक दुसऱ्याच्या तयारीचा आश्रम आहे,ब्रह्मचर्याश्रमांत राहून गृहस्थाश्रम उत्तम करितां यावा हेंच कर्तव्य आहे, त्याप्रमाणें संन्याशाला तयारी करण्यासाठीं वानप्रस्थ हा आश्रम ठेविला आहे. आजपर्यंत सांसारिक सुखांत मग्न झालेला मनुष्य एकदम निवृत्तस्थितींत जाणें अशक्य आहे असें जाणून, प्रथम वानप्रस्थ आश्रमांत जाणें जरूर आहे, असें ठरविलें आहे. वानप्रस्थाश्रमांत विषयसंग हळूहळू सोडला पाहिजे. पत्नी जिवंत असली तर तिला पुत्राचे स्वाधीन किंवा तिजला बरोबर घेऊन वनांत जावें. नानाप्रकारचीं व्रतें करून शरीर सहन-

शील करावें. आपण आपलें अन्न मिळवून अतिथीचा यथाक्षम समाचार गेऊन आपलें पोषण करावें. मद्यमांसादि सोडून देऊन सात्त्विक आहार करावा. याप्रमाणें जितकीं वर्षें होईल तितकीं वर्षें वानप्रस्थ आश्रम आचरण करावा. आतां कदाचित् हल्लींच्या स्थितीला असलें तपश्चरण कष्टसाध्य वाटलें तरी प्रत्येक वृद्ध मनुष्यानें परोपकाराचा उद्योग धरिला तरी तोहि तपश्चरणासारखाच श्रेष्ठ आहे यांत शंका नाहीं असें मला वाटतें; किंवा उपनिषदुक्त विचारांचें सेवन करावें. याप्रमाणें आयुष्याचा तृतीय भाग वानप्रस्थ आश्रमांत घालवून, शेवटच्या भागांत संन्यास घेणें हें मनुस्मृतीला इष्ट आहे, हें खालील दिलेल्या श्लोकावरून व्यक्त आहे:—

आश्रमादाश्रमं गत्वा हुतहोमो जितेंद्रियः ।
भिक्षाबलिपरिश्रान्तः प्रव्रजन् प्रेत्य वर्धते ॥

किंबहुना ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम केल्याशिवाय संन्यासमार्ग जो स्वीकारितो, तो अधोगतीला जातो, असें स्पष्ट म्हटलें आहे.

अनधीत्य द्विजो वेदान् अनुत्पाद्य तथा सुतान् ।
अनिष्ट्वा चैव यज्ञैश्च मोक्षमिच्छन् व्रजत्यधः ॥

आतां आपण मनुस्मृतींत संन्यासधर्म काय सांगितले आहेत तें पाहूं. बौद्धसंन्यास आणि ऋषींनीं सांगितलेला संन्यास यांत किती अंतर आहे, हें आपल्या ताबडतोब लक्षांत येईल. प्रथम—

एक एव चरेन्नित्यं सिध्यर्थमसहायवान्

हा नियम आहे. भिक्षूंचा समुदाय एके ठिकाणीं झाला असतां कसे दोष उत्पन्न होतात हें आपण वर पाहिलेंच आहे. किंबहुना ज्या गांवावर त्यांचा उदरनिर्वाह होतो, त्या गांवालाहि तो जड जातो हें लक्षांत आणलें पाहिजे. दुसरें—

अभिपूजितलाभांस्तु जुगुप्सेतैव सर्वशः ॥
अभिपूजितलाभैश्च यतिर्मुक्तोऽपि बध्यते ॥

" आदरसमवेत जेथें भिक्षा मिळेल, तेथें जाऊं नये. कारण पुढी लावून मिष्टान्नाकडे यतीची प्रवृत्ति झाली कीं तो मुक्त न होतां बद्ध मात्र होतो. "

नाभिनंदेत मरणं नाभिनंदेत जीवितम्
कालमेव प्रतीक्षेत निदेशं भृतको यथा ॥

" मरण आल्याचा आनंद मानूं नये, किंवा जिवंत राहिल्याचाहि आनंद मानूं नये. केवळ चाकर जसा धन्याच्या आज्ञेची प्रतीक्षा कारितो, त्याप्रमाणें देवाच्या आज्ञेची प्रतीक्षा करावी. " इत्यादि प्रकारचे यतिधर्म मनुष्य शान्तदान्त झाल्याशिवाय कधींहि पाळितां येणार नाहींत. परंतु त्याचा बिलकुल विचार न करितां हल्लींहि कित्येक लोक अकाळीं, अस्थानीं यतिधर्म पाळतात,याचें मोठें आश्चर्य वाटतें. उत्तरहिंदुस्थानांत रामसनेई नांवाचा एक पंथ आहे. त्याची स्थिति पाहिली म्हणजे खरोखर यतिधर्माचा ठिकठिकाणीं अस्थानीं उपयोग कसा केला जात आहे, हें लक्षांत येईल. रामसनेई पंथांत मोठे विद्वान् भक्तिवान् , तपस्वी लोक नाहींत असें मी म्हणत नाहीं. पण यतिधर्म कोणास आचरण करण्यास लावावें ही मर्यादा पाळणें अत्यंत इष्ट आहे. रामसनेई पंथाच्या लोकांच्या देवळांत मूर्ति मुळींच नसून केवळ रामनामाचा एक तखता असतो. त्यांचा मठ व देऊळ बहुतकरून गांवाच्या बाहेर असतात. तें चांगलें स्वच्छ व रमणीय ठेवितात. त्यांत दिवा मुळींच लावीत नाहींत. त्या मठांतले लोक दिवसा एकदा गांवांतून भिक्षा मागून आणतात व अन्न एकदा खातात. मठांत अन्न कधींहि शिजवीत नाहींत, किंवा अन्नसामुग्री, भांडींकुंडीं वगैरे तेथें कांहीं नसतें. संध्याकाळच्या वेळीं

मठाधिपति व इतर शिष्य आसनावर बसून रामनामाचा जप माळेनें करितात व जेव्हां झोंप येईल तेव्हां आसनावरच निजतात. मी एकदा असा एक मठ पाहण्यास गेलों होतों. त्या वेळेस एक दहा वर्षांचा मुलगा तांबडीं वस्त्रें परिधान केलेला रामनामाचा जप करीत बसलेला मीं पाहिला, तेव्हां मजला खरोखर त्या मुलाची दया आली. मठांत स्त्रिया घेत नाहींत. तेव्हां नवीन शिष्य होतात ते बाहेरूनच येतात. त्या मुलास त्याच्या आईबापांनीं मठास अर्पण केला होता असें मला समजलें. रामसनेई पंथाचे महादुरापास्त धर्म त्या मुलाकडून कसे पाळिले जातील याविषयीं जेव्हां माझ्या मनांत विचार येऊं लागले, तेव्हां ऋषिप्रणित आश्रमव्यवस्था किती दूरदृष्टीची आहे, ह्याचें चित्र स्पष्टाक्षरांनीं माझ्यासमोर उभे राहिलें. हिंदुसमाजांत निवृत्तीचें प्राबल्य किती आहे याचा विचार केला असतां, लहानपणापासून विषयत्याग करणारे शेंकडो लोक दृष्टीस पडतात; व हजारों लोक लग्नाशिवाय राहून भिक्षेवर आपला उदरनिर्वाह करून आपला जन्म कांहीं तरी प्रकारच्या ईश्वरसेवेंत घालवितात, याचें एकीकडे आश्चर्य वाटतें. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं शेंकडो मठ असतील व तेथें हजारों संन्यासी, यति, बैरागी राहत असतील. पण दुसऱ्या पक्षीं विचार केला असतां योग्य वय होण्यापूर्वी बैराग्यदीक्षा घेतली असतां ती कधींहि टिकणार नाहीं. बलवान् इंद्रियांच्या आधीन होऊन वारंवार कित्येक मठवासीयांची नीति बिघडत असेल हें निःसंदेह आहे. याशिवाय हजारो लोकांचें तारुण्याचें सामर्थ्य व बुद्धिमत्ता हीं व्यर्थ जावीं हीहि एक मोठी हानि आहे. ज्या संपत्तीचा, ज्या मिळकतीचा, ज्या शरीर व बुद्धि यांच्या सामर्थ्याचा उपयोग सर्व आश्रमांत श्रेष्ठ मानलेल्या व आश्रमवासीयांस आश्रयभूत झालेल्या गृहस्थाश्रमाकडे व्हावा, त्या सर्वांचा दुसरीकडे उपयोग होतो हें शोचनीय वाटतें.

सारांश, प्रत्येक वयोभागाची मुख्य कर्तव्यता काय आहे हें लक्षांत आणून, पूर्ववयांत निवृत्तीचें सेवन जितकें अशक्य व अयोग्य आहे, तितकेंच उत्तरवयांत प्रवृत्तीला धरून बसणें अस्थानीं आहे, हें जाणून तदनुरूप प्रवृत्तिमार्गाला व निवृत्तिमार्गाला कोणते कोणते आळे घातले पाहिजेत हें ध्यानांत घेऊन, पूर्व ऋषींनीं जी आश्रमव्यवस्था घालून दिली आहे, ती प्रशंसनीय आहे. मात्र जसें हल्लीं आश्रमव्यवस्थेचें केवळ बाह्यस्वरूप आपल्यांत थोडें थोडें राहिलें आहे, तेवढेंच न ठेवितां कालिदासानें—

> शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् ।
> वार्धके मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम् ॥

या श्लोकांत मधुर शब्दानें थोडक्यांत सांगितलेलें आश्रमव्यवस्थेचें हृद्गत, आपण ओळखिलें पाहिजे व त्याप्रमाणें आपली वर्तणूक ठेविली पाहिजे, हें कोण कबूल करणार नाहीं ?

---

## वेदान्ततत्त्वज्ञान.

**विषयप्रशंसा.**

परमपूज्य भारतवर्षीय प्राचीन ऋषींनीं जीं कित्येक शास्त्रें आपल्या बुद्धिमत्तेच्या विशालतेनें निर्माण केलीं आहेत त्यांत वेदान्तशास्त्र हें अतिश्रेष्ठ होय. ग्रीक लोकांची जशी ख्याति त्यांच्या सामाजिक व राष्ट्रीय तत्त्वशास्त्रामुळें अजरामर आहे; रोमन लोक जसे कायदाशास्त्राचे आदिभूत समजले जाऊन त्यांचे कायदे पृथ्वीवर मान्य व शिक्षणक्रमांतर्गत आहेत; अर्वाचीन फ्रेंच, इटालियन, अमेरिकन, इंग्लिश वगैरे लोक आपल्या विलक्षण आधिभौतिक शोधांनीं सर्व जगास जसे दिपवून टाकीत

आहेत; त्याचप्रमाणें भारतीय प्राचीन आर्यांचा वेदान्तशास्त्र एक कीर्तिस्तंभच आहे, असें सर्व देशांतील बुद्धिमान् लोक मानतात. वेदान्तशास्त्राचा पूर्ण विकास ज्या दशोपनिषदांत आहे त्यांजविषयीं शापेनार नामक जर्मन पंडित म्हणतो:—" In the whole world there is no study so beneficial and so elevating as that of the Upanishads. It has been the solace of my life. It will be the solace of my death." " या सर्व पृथ्वीतलावर उपनिषदांच्या अभ्यासासारखा दुसरा कोणताहि अभ्यास इतका उपयुक्त व उन्नतीस देणारा नाहीं. हा अभ्यास माझ्या आयुष्याचा आधार आहे, व मरणकालीं तोच मला आधार होईल. " प्रो. मॅक्समुल्लरहि या शापेनारच्या मतास पूर्ण अनुमोदन देतात. मात्र ते वेदान्तसूत्रांची किंमत उपनिषदांहून कांहीं अधिक मानतात. त्यांच्या मतें वेदान्तसूत्रें द्राक्षासवासारखीं आहेत आणि उपनिषदें हीं द्राक्षांप्रमाणें आहेत. मला वाटतें, हिंदुस्थानचे लोक द्राक्षासवापेक्षां द्राक्षें शतपट सहजमनोहर, रसाळ व गुणकारी आहेत असेंच समजतील. द्राक्षांपासून द्राक्षासवाप्रमाणें नुकसान होण्याचा कधींच संभव नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे.

**इतिहास.**

२. दशोपनिषदें ( वेदान्तशास्त्राचे आदिग्रंथ ) चार हजार वर्षांच्या सुमारें आर्यलोक हिंदुस्थानचे रहिवाशी झाल्यावर लिहिलीं गेलीं असावीं असा माझा अंदाज आहे. श्वेताश्वतरादि कांहीं इतर उपनिषदें यांहून नंतरचीं आहेत. उपनिषदांचे मागून इ. स. पू. १२०० त सुमारें श्रीमद्भगवद्गीता झाली असावी. गीतेचें माहात्म्य वेदान्तशास्त्रांत उपनिषदांबरोबरचें मानिलें जातें. सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीं बादरायण ऋषींनीं वेदान्तसूत्रें लिहिलीं. प्रो. मॅक्समूलरच्या मतें सर्व सूत्रांत वेदान्तसूत्रें

प्राचीन आहेत; परंतु माझा अंदाज यांच्या उलट आहे. सांख्य, योग, न्याय, बौद्ध, जैन, पाशुपत वगैरे अनेक मतांचें खंडन या सूत्रांत केलें आहे. तेव्हां इसवी सनापूर्वी सुमारें दोनशें वर्षांपेक्षां हीं सूत्रें प्राचीन नसावीं असें अनुमान होतें. गीतेंत " ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितम् " असें वाक्य आहे. यावरून सूत्रें गीतेच्या पूर्वीचीं किंवा समकालीन असावीं असें मॅक्समुलर व प्रो. अमळनेरकर मानितात पण ' ब्रह्मसूत्रपदैः ' याचा अर्थ टीकाकारांनीं निराळा केला आहे. शिवाय, सूत्रांतहि गीतेचा आधार दिला आहे, यावरून गीता फार प्राचीन असावी. हा विषय स्वतंत्र प्रतिपादण्यासारखा आहे. बादरायणसूत्रानें वेदान्तास शास्त्रीय स्वरूप आलें. पाणिनीय सूत्रांवर जसें पतंजलीचें भाष्य आहे, त्याप्रमाणें वेदान्तसूत्रांवर श्रीशंकराचार्यांचें भाष्य सुमारें एक हजार वर्षांनंतर झालें. शंकराचार्यांच्या शारीरभाष्यापूर्वी वेदान्तसूत्रांचा अर्थ सागणारी कांहीं तरी वृत्ति असावी असें अनुमान होतें. कारण, अशा गूढ व अत्यंत संकलित सूत्रांचा अर्थ तीशिवाय लागणारच नाहीं. उपवर्ष, बौधायन वगैरे नांवें भाष्यांत येतात. परंतु त्यांचे ग्रंथ सध्या उपलब्ध नाहींत ही दुःखाची गोष्ट आहे. असो. शंकराचार्यांचें भाष्य ज्यांनीं ज्यांनीं वाचिलें आहे त्यांस त्यांच्या बुद्धिमत्तेचें आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं. कोणत्याहि प्रश्नासंबंधानें शंका म्हणून त्यांनीं ठेविलीच नाहीं. या सिद्धांतावर असा आक्षेप घेण्यासारखा आहे असें आपल्या मनांत येतें न येतें तों तोच आक्षेप घेऊन आचार्यांनीं त्याचें निरसन केलेलें दृष्टीस पडतें. सारांश, सर्व मतांचें खंडन करून शंकराचार्यांनीं दिग्विजय केला हें मुळींच असंभवनीय नाहीं. शारीरभाष्याशिवाय वेदान्तसूत्रांवर मध्व, रामानुज व वल्लभाचार्य यांचीं भाष्यें आहेत. त्यांत त्यांनीं कांहीं कांहीं ठिकाणीं सूत्रांचा अर्थ निराळा केला आहे, यामुळें वेदान्तांत शुद्धाद्वैत, विशिष्टा-

द्वैत, द्वैत आणि अद्वैत, अशीं चार निराळीं मतें उत्पन्न झालीं आहेत. मराठींत शंकराचार्यांच्या अद्वैत मतास धरून ज्ञानेश्वर, वामन, रामदास यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. वेदान्तशास्त्रावर खास रीतीनें लिहिलेले ग्रंथ दुसऱ्या कोणत्याहि देशी भाषेंत आहेत असें मला वाटत नाहीं. सर्व धर्मांशीं समानभाव धरणाऱ्या अकबराच्या वेळेस उपनिषदांचीं पर्शियनमध्यें भाषांतरें झालीं व तींच भाषांतरें शापेनारनें वाचलीं होतीं. हल्लींचे विद्याप्रिय इंग्रज, जर्मन व फ्रेंच वगैरे पाश्चात्य लोकांत उपनिषदांचीं, सूत्रांचीं व भाष्याचीं भाषांतरें झालीं आहेत. असो, याप्रमाणें वेदान्तशास्त्रग्रंथांचा थोडक्यांत इतिहास सांगून आपण त्यांच्या मुख्य विषयाकडे वळूं.

**विषयविभाग.** ३. बुद्धिवान् मनुष्य—मग तो कोणत्याहि काळचा, देशाचा किंवा धर्माचा असो,—विचार करूं लागला म्हणजे परमेश्वर हा कोण व कसा आहे? ही सृष्टि कशी झाली? सजीव प्राण्यांत जड सृष्टीशिवाय चेतनबीज कांहीं निराळें आहे काय? असेल तर मरणानंतर त्या चेतनबीजाचें काय होतें? हे प्रश्न त्यापुढें उभे राहतात. बहुतेक धर्मांत या प्रश्नांचें कांहींना कांहीं उत्तर दिलेलें आहे. तसेंच हें निर्विवाद आहे कीं, आधुनिक शास्त्रांच्या प्रयोगरीतीनें या प्रश्नांचा उलगडा होऊं शकणार नाहीं. सबब या विषयास स्पेन्सरप्रभृति महान् तत्त्ववेत्ते Unknowable अप्रमेय अथवा अज्ञेय असें नांव देतात. तत्रापि या विषयांत बुद्धिमत्तेचा उपयोग व सयुक्तिक व अयुक्तिक अशा प्रमेयाचा शिरकाव आहे. वेदान्ताचे सिद्धांत वरील प्रश्नांसंबंधानें इतर मतांहून अधिक बुद्धिमत्तेचे व सुयुक्तिक आहेत, असें मला वाटतें. तें कसें याचा विस्तार यापुढील विवेचनांत मी करणार आहें. किंबहुना आपला मुख्य विषय हाच आहे.

४. परमेश्वर आहे ही कल्पना सर्व धर्मांच्या मुळाशीं आहे. पण तो कसा आहे, कोठें आहे, कोण आहे, याचें सप्रमाण वर्णन कोण करील ? परमेश्वराचें प्रत्यक्ष वर्णन कांहीं वेडगळ धर्मांत असेल; पण सर्व मोठमोठ्या धर्मांत परमेश्वराचें अप्रत्यक्ष वर्णन केलेलें आहे. तो अत्यंत पवित्र आहे,तेजोमय आहे,सर्वशक्तिमान् आहे, सर्वेश्वर आहे, वगैरे उदात्त वर्णनें जशीं अन्य धर्मांत आहेत त्याप्रमाणेंच उपनिषदांतहि "सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः सर्वेश्वरः" वगैरे आहेत. परंतु परमेश्वराचें स्वरूप सृष्टीच्या स्वरूपाहून भिन्न नाहीं, किंवा सृष्टि हें एक परमेश्वराचेंच रूप आहे, ही कल्पना फक्त वेदान्ताचीच आहे. मी येथें कोणत्याहि धर्माचे विरुद्ध लिहितों आहें, असें समजूं नये. कारण परमेश्वर अचिंत्यशक्ति आहे हें विधान सर्वमतवाद्यांस कबूल केलें पाहिजे. तेव्हां अचिंत्यशक्ति परमेश्वर जशी कल्पना करावी तसा असूं शकतो. माझ्या पुढील म्हणण्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं वर सांगितलेलें परमेश्वराच्या स्वरूपाविषयींचें वेदान्ताचें मत सयुक्तिक आहे. परमेश्वर आकाशांत किंवा सप्तस्वर्गापलीकडे किंवा वैकुंठांत राहून तेथून पृथ्वीवरील अणुरेणु जाणत असून प्रत्येक जीवमात्रास तो आपल्या अचिंत्यशक्तीनें आकलन करून आहे हें संभाव्य व खरें असेल. पण यापेक्षां तो पृथ्वीवरहि आहे व सर्व अणुरेणु व जीवमात्राला व्यापून राहून त्यांचें आकलन करितो ही कल्पना अधिक सयुक्तिक दिसते. " सर्वं खल्विदं ब्रह्म " असा सिद्धांत करतांना " तज्जलान् " (तज्जं तल्लं तदनम्) असा हेतु लागलीच शांडिल्यांनीं (छां०) दाखवून दिला. सर्व जातमात्र परमेश्वरापासून उत्पन्न झालें, त्याचे ठिकाणीं लयास जाणार व त्याचेच जोरावर चाललें आहे, तेव्हां तें त्याच्याहून भिन्न कसें होऊं शकेल ? यावरून कदाचित् वेदान्तमतावर नास्तिकत्वाचा भास होऊन परमेश्वर मुळींच नाहीं, केवळ सृष्टिच

परमेश्वराचें स्वरूप.

आहे असें वाटण्याचा संभव आहे. पण वेदान्तमताचा अभिप्राय तसा नाहीं. बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्य व जनक यांचे, फारच मनोहर व गूढविषय असूनहि अत्यंत वक्तृत्वानें भरलेले, संवाद आहेत. त्यांत एके ठिकाणीं हा विषय स्पष्ट केला आहे. "यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या अन्तरः यं पृथिवी न वेद यस्य पृथिवी शरीरं यश्च पृथिवीमन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः" या तऱ्हेनें पायऱ्या चढत तेथें वर्णन केलें आहे. सूर्य ही देवता अनेक धर्मांत मानिली आहे. पण वेदान्तमतें सूर्य हा परमेश्वर नव्हे; तर 'जो आदित्यांत असून त्याच्या आंत आहे, परंतु ज्याला आदित्य जाणत नाहीं, ज्याचें शरीर आदित्य आहे, व जो आदित्यास आंत राहून संभाळून आहे, तो परमेश्वर आहे.' सारांश, सर्व सृष्टीचे ठिकाणीं असून सर्व सृष्टीचा अंतर्यामी परमेश्वर आहे. "एष सेतुर्विधरणः एषां लोकानामसंभेदाय" या भुर्भुवस्वर्लोकादि प्रचंड सृष्टीला आपल्या ठिकाणीं ठेवून भलतीकडे वाहून जाऊं न देणारा हा महान् सेतु परमेश्वर आहे अशी उदात्त कल्पना प्राचीन ऋषींनीं केलेली आहे. तात्पर्य, सर्व सृष्टि परमेश्वराचें शरीर असून तिचे ठिकाणीं तो ओतप्रोत राहून तिचें नियमन करून तिला त्यानें आपल्या ठिकाणीं स्तंभन करून ठेविलें आहे, असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे.

५. परमेश्वराची याप्रमाणें कल्पना केली म्हणजे मग ज्या पुष्कळ गोष्टी आपण त्याजवर विनाकारण लादतों, त्या परमेश्वराचे ठिकाणीं संभवत नाहींत. मनुष्यस्वभावच असा आहे कीं, तो आपल्या गुणदोषांचा आरोप परमेश्वरावर करतो. या प्रवृत्तीस Anthropomorphism हें नांव अलीकडील तत्त्ववेत्त्यांनीं दिलें आहे. या Anthropomorphism चा दोष वेदान्त मतावर मुळींच येऊं शकत नाहीं. परमेश्वराचें वसतिस्थान एक स्वतंत्र आहे; त्याचें रूप अत्यन्त सुंदर

आहे; त्यास स्त्रीपुत्रादि आप्त आहेत; त्याचे ठिकाणीं प्रेम व क्रोध असून तत्तदनुरूप लोकांस तो सुखदुःख देतो; अशा कल्पना पुष्कळ धर्मांत आढळतात. ग्रीक लोकांचा जुपिटर आलिंपस पर्वतावर राहतो तो आपल्या जुनो नामक बायकोवर कधीं तुष्ट व कधीं रुष्ट होऊन तिच्या भक्तांस कधीं त्रास व कधीं संपत्ति व सौख्य देतो.—इत्यादि वेडसर कल्पना वेदान्तांतील परमेश्वराचे ठिकाणीं मुळींच संभवत नाहींत. "त्वं स्त्री त्वं पुमानसि त्वं कुमार उत वा कुमारी। त्वं जीर्णो-दण्डेन वञ्चसि त्वं भवसि विश्वतोमुखः ॥" तूंच स्त्री, तूंच पुरुष, तूंच लहान मुलगा व लहान मुलगी आहेस; हातांत दण्ड घेऊन टेकीत जाणारा म्हाताराहि तूंच आहेस.' असें मनुष्य सृष्टीशीं ज्याचें तादात्म्य झालें, त्याला बायकामुलें कोठून येणार ?—किंवा सर्वच त्याचे ठिकाणीं संभवनीय आहे. सौंदर्यहि आहे, कुरूपणाहि आहे, स्त्रीत्व आहे व पुरुषत्वहि आहे. सारांश, खोल विचार करणाऱ्या संस्कृत बुद्धीस वेदान्तांत कल्पना केलेल्या परमेश्वराचें स्वरूप सयुक्तिक व ग्राह्य वाटेल यांत संशय नाहीं. मॅक्समुलर म्हणतोः—

The Vedic poets had arrived at a conception of the God-head, which was reached once more by some of the Christian philosophers of Alexandria, but which even at present is beyond the reach of many who call themselves Christian.

**सृष्टीची उत्पत्ति.**

६. वेदान्तशास्त्राचा सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधानें सिद्धांत अलीकडील भौतिक शास्त्रिय शोधांनीं दीप्त झालेल्या बुद्धीस याहूनहि अधिक सयुक्तिक वाटेल. " आत्मनः आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधिभ्योऽन्नम् ।

अन्नात्पुरुषः" असा सृष्टीचा उत्पत्तिक्रम उपनिषदांत सांगितला आहे. परमेश्वरापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथ्वीपासून ओषधि आणि ओषधीपासून मनुष्यें उत्पन्न झालीं. वेदान्ताचें असेंहि मत आहे कीं, याच क्रमानें उलट सृष्टीचा लय होणार आहे. एकंदर विचार केला तर, अर्वाचीन भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र इत्यादिकांचे आधारें डार्विन, स्पेन्सर वगैरे तत्त्ववेत्त्यांनीं काढलेला Evolution व Dissolution उत्क्रांतिसिद्धांत आणि अवक्रांतिसिद्धांत वेदान्तानें फार प्राचीन काळीं केवळ बुद्धिमत्तेनें कल्पिला होता, हें पाहून मोठें आश्चर्य वाटतें. परमेश्वराच्या अचिंत्य शक्तीनें पाणी, उजेड, वनस्पति, जीव, निरानिराळे एकदम उत्पन्न झाले, व त्यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नाहीं, हें मत संभवनीय आहे. पण यापेक्षां, एकापासून दुसरें, त्यापासून तिसरें झालें, याप्रमाणें सृष्टीचा उत्पत्तिक्रम आहे व तसाच उलट लय होणार आहे, हें आधुनिक शास्त्रपूत दृष्टीस अधिक सयुक्तिक वाटेल.

वरील क्रमाचा सूक्ष्म विचार केला तर आकाशतत्त्वाची खरी कल्पना वेदान्तानेंच प्रथम केली असें दिसेल, व ती शास्त्रीय शोधांनीं साधार होऊं पहात आहे. आकाश म्हणजे केवळ पोकळी नव्हे अथवा वस्तूचा अभाव नव्हे. तर सर्व सृष्टीला व्यापून टाकणारें एक नित्य तत्त्व आहे असें वेदान्ताचें मत आहे. X–rays ची कल्पना आकाशतत्त्व मानल्यावांचून संभवत नाहीं असें स्पष्ट आहे. अपारदर्शक पदार्थांतूनहि इकडचे किरण तिकडे कसे जातात याची उपपत्ति पाहिली तर प्रत्येक पदार्थाच्या परमाणु–परमाणुमध्यें आकाश असून तो आकाशतत्त्वानें भरला आहे असें म्हणावें लागतें. कित्येक शास्त्रें आकाशतत्त्वास मुळींच मानीत नाहींत कारण तीं त्यास अभाववाची

समजतात. पण वेदान्तशास्त्रानें आकाशाची सर्वगतता व नित्यता इतकी दृढ मामली आहे कीं, परमेश्वरापासून झालेली प्रथम वस्तु आकाशच आहे. किंबहुना आकाश शब्द उपनिषदांत कित्येक ठिकाणीं परमेश्वराचीच योजलेला आहे. 'आकाशस्तल्लिंगात्' हें अधिकरण ब्रह्मसूत्रांत प्रसिद्ध आहे. अग्नि हें तत्त्व काय आहे हें हल्लींच्या शास्त्रीय भाषेंत सांगतां येणार नाहीं; पण वायु, आपः, पृथ्वी हे शब्द Gaseous, liquid आणि solid स्थितींचा अनुवाद आहे, असें दिसतें. प्रथम सर्व पदार्थांचें वायुरूप स्वरूप होतें, नंतर liquid म्हणजे पातळ झालें, व नंतर पृथ्वी म्हणजे घट्ट झालें. दुसरें, निर्जीव जड पदार्थापासून सजीव पण अचेतन वनस्पति निर्माण झाल्या, व सजीव अचेतनापासून सजीव सचेतन प्राणिवर्ग उत्पन्न झाला, असा 'पृथ्वीव्या ओषधयः। ओषधिभ्यः पुरुषः।' याचा भावार्थ आहे. हल्लीं वनस्पति शास्त्रांत असा शोध लागत आहे कीं, जडापासून वनस्पति उत्पन्न झाली. तसेंच वनस्पतिवर्ग व प्राणिवर्ग यांच्या दरम्यान सांधणारी सांखळी असावी असें अलीकडील शास्त्रीय मताचें धोरण दिसतें. सारांश, Evolution म्हणजे उत्तरोत्तर सुधरत जाणारी सृष्टि व Dissolution म्हणजे त्याच क्रमानें होत जाणारा सृष्टीचा ऱ्हास ही वेदान्ताची कल्पना सयुक्तिक आहे; व ती इतक्या प्राचीन काळीं ऋषींनीं केवळ बुद्धिमत्तेच्या जोरानें काढली, याचें आश्चर्य वाटतें.

**सृष्टीचें उपादान कारण.**

७. सृष्ट्युत्पत्तीसंबंधानें आणखी एक प्रश्न असा आहे कीं, परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न केली तिचें उपादानकारण कोणतें? कुंभार मातीचा घट करतो, या उदाहरणांत कुंभार हा निमित्तकारण म्हणजे कर्ता आहे; माती हें उपादानकारण म्हणजे सामान आहे; आणि घट कार्य आहे. तसेंच चक्र वगैरे हीं साधनें किंवा कारणें आहेत. तेव्हां त्याच

न्यायानें, परमेश्वरानें कर्ता होऊन सृष्टि उत्पन्न केली तेव्हां त्याजवळ सामान कोणतें होतें म्हणजे त्यानें कशाची सृष्टि केली ? हा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. सृष्टीचें उपादानकारण कोणतें आहे या कठिण प्रश्नाचा जबाब निरानिराळे धर्म निरनिराळ्या रीतीनें देतात. साधारणपणें दोन पक्ष आहेत. एक सृष्टीची उत्पत्ति शून्यापासून मानतो, म्हणजे कांहीं नव्हतें तेथें इच्छामात्रें परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न केली असें मानतो. कांहीं असें मानतात कीं, कांहीं उपादान अव्यक्त रूपानें होतें, त्याची व्यक्त रूपानें परमेश्वरानें सृष्टि बनविली. शास्त्रदृष्टया कांहीं तरी पूर्वी होतें हें मान्य; मॅटर (Matter) अनादि आहे, त्याचे प्रथम केऑस (Chaos) अथवा अव्यक्त स्वरूप होतें, हें म्हणणें सयुक्तिक दिसतें. “ कथमसतः सज्जायेत इति सदेव सोम्येदमग्र आसीत् ” ( नाहीं त्यापासून आहे कसें उत्पन्न होईल ? तेव्हां आहे अशी वस्तु प्रारंभीं होती ) म्हणून छांदोग्योपनिषदांत याच प्रश्नाचा ऊह करून कांहीं तरी सत् प्रारंभीं होतें हें निर्णीत केलें. पण एवढ्यानें निकाल लागत नाहीं. spirit स्पिरिट आणि matter मॅटर, जड आणि चेतन, पुरुष आणि प्रकृति, ह्या भिन्न कोटि येथें प्राप्त होऊन दोघांचें अनादित्वहि प्राप्त होतें.यांत एक प्रकारचें परमेश्वराच्या बरोबरीचें एक मॅटररूपी प्रस्थ स्वतंत्र मानावें लागतें. वेदान्त शास्त्राचा असा सिद्धान्त आहे कीं, परमेश्वर आणि उपादानभूत सृष्टिबीज हीं एकच आहेत. म्हणजे परमेश्वरानें “ ससर्जात्मानमात्मना ” आपण आपणाला उत्पन्न केलें; यास अभिन्ननिमित्तोपादनसिद्धांत असें म्हणतात; म्हणजे सृष्टीचें निमित्तकारण व उपादानकारण एकच आहे. ह्या वेदान्तमताचा सयुक्तिकपणा कसा आहे व याचा परिणाम कोठवर गेला आहे याचा आपणास विचार केला पाहिजे. प्रथमतः परमेश्वराचें स्वरूप सृष्टि आहे, हें जें प्रथम सिद्धांतांत वर्णन केलें त्याशीं

या सिद्धान्ताचा मेळ पूर्ण बनतो. परमेश्वरानें आपलीच सृष्टि बनविली आहे, यावरून त्याचें सृष्टि हें एक रूप आहे हें साहजिक सिद्ध होतें. दुसरें, spirit आणि matter चेतन आणि जड–यांचा जो एक दुस्तर भिन्नभाव आपणांस दृष्टीस पडत आहे व ज्यामुळें पुष्कळ धर्मांत नानाप्रकारच्या कल्पना केलेल्या दृष्टीस पडतात, तो मुळींच राहत नाहीं. जर सर्व सृष्टि परमेश्वरानें आपल्यापासूनच निर्माण केली आहे तर मॅटरमध्यें स्पिरिट आहेच; मात्र तें अव्यक्त आहे हें सिद्ध होतें. प्रल्हादास—जळीं, स्थळीं, काष्ठीं परमेश्वर आहे, तेव्हां या खांबांतहि आहे काय—असें बापानें विचारलें, तेव्हां खांबांतूनहि परब्रह्म प्रकट झालें, ही गोष्ट सर्वांस ठाऊक आहेच. सारांश, सर्वच चराचर व्यापून राहणारा परमेश्वर सृष्टीचें उपादानकारणहि आहे. असें झाल्यानें पूर्वसिद्धान्ताची आधिक बळकटी होते.

कारण आणि कार्य पाहिले म्हणजे वस्तुतः एकच आहेत. कारणाव्यतिरिक्त कार्यांत कोणताहि अंश येऊं शकत नाहीं हें उघड आहे. या न्यायानें कार्यकरणाचा अभेद वेदान्तांत मानिला आहे. आणि याच हिशोबानें जेव्हां कार्याचा लय होतो तेव्हां तो कारणांतच झाला पाहिजे. जगदुत्पत्तीविषयीं जें वर सांगितलें तेंच त्याच्या लयाविषयीं मानिलें पाहिजे. जे लोक सृष्टि शून्यापासून झाली असें मानतात, ते सृष्टीचा नाश झाला म्हणजे ती शून्य होते किंवा नाहींशीं होते असें म्हणतात. वेदान्तमतानें परमेश्वरापासून झालेली सृष्टि विनाशकालीं परमेश्वरांतच लीन होणार आहे. सारांश या दृष्टीनें वेदान्तमत सयुक्तिक व आधुनिक शास्त्रीय बुद्धीला बरें दिसेल. Indestructibility of matter म्हणजे जडाचें अविनाशित्व अलीकडील भौतिक शास्त्रामध्यें मानतात, त्या मताला वेदान्तमत येथें जुळून येतें. कारण सृष्टीचा परमेश्वराचे ठिकाणीं लय मात्र होतो.

एकंदर दृष्टीनें पाहिलें म्हणजे यासंबंधानें गीतेंत केलेली उत्प्रेक्षा फारच मनोहर व योग्य दिसते. " अव्यक्ताद् व्यक्तय: सर्वा: प्रभवन्त्यहरागमे । रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ " Evolution अत्यन्ताभावापासून उत्पन्न होत नाहीं व Dissolution अत्यन्त नाशहि नव्हे. अशा प्रकारें सृष्टीचा उत्पत्तिस्थितिलयक्रम या दृष्टान्तात सांगितला आहे. जसें पहांटेच्या गुडुप अंधेरांतून हळू हळू हें जग दिसूं लागून सकाळीं पूर्ण दिसूं लागतें, व पुन्हां संध्याकाळीं त्याच क्रमानें हळूहळू कमी दिसत दिसत तें सर्व जग पुन्हा रात्र पडली असतां अंधकारांत दिसत नाहींसें होतें; त्याप्रमाणें व्यक्तय: म्हणजे दृष्ट भिन्न भिन्न पदार्थ व प्राणी--अव्यक्तापासून सृष्ट्युत्पत्तीच्या वेळीं उत्पन्न होतात व त्यांतच प्रलयकाळीं नाहींशा होतात.

परमेश्वराचा सृष्टीशीं कसा अभेद आहे याचें येथपर्यंत झालेलें दिग्दर्शन अर्वाचीन शास्त्रीय मतास धरून आहे इतकेंच नव्हे तर कविस्फूर्तीच्या भरांत आलेले, गूढ विषयांवर विचार करणारे आधुनिक कवि वर्डस्वर्थ, गेटी व टेनिसन वेदान्तमताकडेसच वळतात. टेनिसन म्हणतो:--" Perhaps this earth and all that is in it, storms, mountains, cataracts, the sun and the skies are the Almighty; in fact, such is our petty nature that we cannot see Him, but we see His shadow, as it were a distorted shadow." यावर मॅक्समुलर म्हणतो:--" हा शुद्ध वेदान्त नव्हे काय ? मात्र वेदान्तमताप्रमाणें कारण हें प्रत्यक्ष अनुभवास देणारी वस्तुच नाहीं. आणि टेनिसननें म्हटलेली distorted shadow-म्हणजे बिघडलेली छाया किंवा प्रतिबिंब--ही शंकराचार्यांची अविद्या नव्हे काय ? "

८. येथें वेदान्तसिद्धान्तासंबंधें अत्यंत महत्त्वाचा व अत्यन्त विवादाचा प्रश्न उपस्थित होतो, व याच प्रश्नासंबंधानें पुष्कळ विद्वान् व अविद्वान् लोकांचा वेदान्तशास्त्रासंबंधानें अविश्वास उत्पन्न झालेला आहे. अविद्या किंवा माया काय आहे? प्रतिबिंब व छाया म्हणजे काय? ही सृष्टि परमेश्वरापासून उत्पन्न झालेली, मायामय मिथ्या आहे हें कसें? हे प्रश्न महत्त्वाचे असून त्यांजविषयीं निश्चयानें व खुलाशानें सांगणें फार कठिण आहे. मॅक्समुलरनें आपल्या 'हिंदुस्थानांतील षट्शास्त्रें' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानचे तत्त्ववेत्त्यांची मुख्य तारीफ ही आहे कीं, ते आपल्या मताचे परिणाम म्हणजे त्या मतापासून निघणारे सिद्धांत कधींहि नाकबूल करीत नाहींत किंवा त्यांचीं काय मतें आहेत याविषयीं छपवाछपवी करीत नाहींत. "We may miss the development and the dialectic eloquence with which Plato and Hegel propound their thoughts, but we can always appreciate the perfect freedom, freshness and downrightnesss with which each searcher after truth follows his track without ever looking right or left."

**माया.**

वेदान्तमताचे सृष्टीचे कल्पनेसंबंधानें मॅक्समुलर याच प्रस्तावनेंत म्हणतो:—"जें कांहीं आहे—म्हणजे सत्—तें एक आहे. तेव्हां दुसऱ्याची कल्पना होऊं शकत नाहीं. परमेश्वर सत् अनंत आहे, तेव्हां त्याच्याशिवाय दुसरा पदार्थ—प्रकृति अथवा मॅटर—आहे असें मानणें म्हणजे परमेश्वराची जी कल्पना केली त्यास बाध येतो, हें मी वर दाखविलेंच आहे. तर आतां असा प्रश्न उद्भवतो कीं, हें सत् एक असून अनेक कां झालें? म्हणजे या सृष्टींत अनेकता व वैचित्र्य

कां ? व आपल्या अनुभवांत नेहमीं बदल कां होतो ? परमेश्वर अखंड, निरिच्छ व निर्विकल्प आहे, तेव्हां त्यास स्वतः बुद्धि झाली नाहीं व बाहेरून येण्याचा संभव नाहीं. कारण, दुसरा कोणी नाहींच. तेव्हां या सतत बदलणाऱ्या व अनेकत्वानें भरलेल्या सृष्टीचें समर्पक उपपादन कसें करावे ? याचें उत्तर वेदान्ती असें देतात कीं हीं दिसणारी घडामोड मिथ्या आहे, म्हणजे अविद्याजनित आहे. अविद्या अथवा माया ही जरी आहे तरी, ब्रह्माची व्याख्या करणें जितकें कठीण आहे, तितकेंच अविद्येची व्याख्या करणें कठिण आहे. एवढें मात्र सांगतां येतें कीं, अविद्येचा नाश होऊं शकतो; ब्रह्माचा होत नाहीं. दृश्य जगत् हें वाळवंटांतील मृगजळासारखें परमेश्वराचे ठिकाणीं भासमान होत आहे. जसा चंद्र नदीच्या लहरीयुक्त पाण्यांत प्रतिबिंबित होऊन अनेक दिसतो, परंतु वास्तविक एक आहे, तद्वत् परमेश्वराच्या प्रतिबिंबापासून सृष्टि अनेकमय दिसते.

वरील दृष्टान्तावरून, वेदान्तांत मिथ्या जगाची कल्पना कशी आली व ती कोणत्या प्रकारें आहे हें बरेंच अंशीं कळून येईल. मृगजळाचा व चंद्रप्रतिबिंबाचा दृष्टांत जसा साधारणतः वेदान्तांत या कल्पनेच्या समजुतीकरितां येतो तसा शुक्तिरजताचा येतो. किंबहुना शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यास प्रारंभ याच विषयापासून केला आहे. परमेश्वराच्या ठिकाणीं जगताचा अध्यास कसा होतो, हें त्यांनीं शुक्तिरजताचा दृष्टान्त घेऊन दाखविलें आहे. सर्परज्जूचा दृष्टान्त प्रसिद्ध आहे. एवढें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हे सर्व दृष्टान्त द्वैतनिबंधन आहेत; म्हणजे दोन वस्तु असल्याशिवाय ते होऊं शकत नाहींत. पण परमेश्वर व सृष्टि वस्तुतः दोन वस्तु नाहींत. तथापि हे दृष्टान्त आपल्या इंद्रियजन्य ज्ञानाच्या दृष्टीनें समजुतीकरितां

घ्यावयाचे आहेत. जगताचें मिथ्यात्व कधींच इंद्रियगोचर होऊं शकणार नाहीं; परंतु तें वरील दृष्टांतानुरोधानें विचार केला असतां अनुभवास येणारें आहे.

**जगताचें मिथ्यात्व असंभवनीय दिसतें.**

९. याजवर साहजिक शंका अशी उत्पन्न होते कीं, जें प्रत्यक्ष अनुभवास येतें तें मिथ्या कसें होईल ? अग्नीचें उष्णत्व मिथ्या मानल्यास अंगास चटका बसला म्हणजे लागलीच त्याचें मिथ्यात्व नाहींसें होईल. सूर्य, चंद्र, पृथ्वी वगैरे मोठमोठाले गोल आकाशांत फिरतात.त्यांच्या फिरण्याच्या गति व नियम शोधून काढिले आहेत. त्याप्रमाणेंच ग्रहणें पूर्वीं वर्तविलीं जातात तीं तशीं घडतात. तर काय हे गोलहि मिथ्या, त्यांची गतिहि मिथ्या, त्यांचीं ग्रहणें व गणित हें सर्वच मिथ्या ? जपान व रूस यांमधील नुकतेंच झालेलें लायोयांग येथील भयंकर युद्ध मिथ्या आहे काय ? व जपानी शिपायांनीं दाखविलेलें शौर्य व युद्धकौशल्य व त्यांचा उत्कृष्ट देशाभिमान व एकी व देशकार्यार्थ मरणाची बेपर्वाई, या सर्वच गोष्टी मिथ्या कशा होतील ? सारांश, मी बोलतों व तुम्हीं ऐकतां, आपण येथें बसलों आहों, व वेदान्तविषयाची चर्चा करीत आहों हें जर सर्व मिथ्या झालें, तर जगत मिथ्या आहे हेंहि मिथ्याच आहे. तात्पर्य या ठिकाणीं अनवस्थाप्रसंग प्राप्त होईल.

जगताच्या मिथ्यात्वाची कल्पना शंकराचार्यांनीं आपल्या भाष्याच्या आरंभीं घेऊन तदनुकूल सर्व भाष्य लाविलें आहे.परंतु वेदान्तशास्त्रांत जीं दोन चार भिन्न मतें उत्पन्न झालीं आहेत त्यांपैकीं जगताचें मिथ्यात्व हा एक विषय आहे.कांहीं मतवादी मिथ्यात्व न मानतां परिणामरूपानें जगत् सत्य आहे असें मानतात. विवर्तवाद व परिणामवाद काय

आहेत व उपनिषदें व सूत्रें यांस कोणता वाद संमत आहे हा विषय फार गहन आहे. एवढें मात्र येथें दिग्दर्शन करण्यासारखें आहे कीं, उपनिषदांत जगत् मिथ्या आहे असें स्पष्ट शब्दांनीं कोठें सांगितलें नाहीं. हा शब्द उपनिषदांत आहे. माया शब्द जरी कमी येतो तरी श्वेताश्वतरोपानिषदांत तो आहे. गीतेंत तर स्पष्ट 'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया' असें वचन आहे. पण या 'अविद्या' 'माया' इत्यादि शब्दांवरून जगताचें मिथ्यात्व सिद्ध होतें कीं काय हें वादग्रस्त आहे. ब्रह्मसूत्रांत ठिकठिकाणीं जेथें ऋषींचा मतभेद आहे तेथें अमुक ऋषि अमुक म्हणतो असें स्पष्ट सांगितलें आहे. त्याप्रमाणें या विषयासंबंधानें स्पष्ट मतभेद सांगितलेला नाहीं 'प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टान्तानुपरोधात्' या अधिकरणांत, परमेश्वर जगताची प्रकृति म्हणजे उपादान कारण आहे, असें प्रतिपादन केलें आहे. यापुढें 'आत्मकृते परिमाणात्' असें एक सूत्र आहे, त्यांत परिणाम शब्द आलेला 'तदनन्यत्वमारंभणशब्दादिभ्यः' हें अधिकरण दुसऱ्या अध्यायांत दिलें आहे. तेथें शंकराचार्यांनीं कार्याची असत्यता व मिथ्यात्व मुख्यतः प्रतिपादन केलें आहे. त्या सूत्रांतहि 'अनन्यत्व' शब्द आहे. कार्य खोटें किंवा मिथ्या आहे असें नाहीं. मृद् किंवा शराव म्हणजे माती आणि घट हा दृष्टान्त उपनिषदांत घेतला आहे, सर्प व रज्जु हा घेतला नाहीं. यावरून कार्य मिथ्या आहे असें स्पष्ट म्हटलेलें दिसत नाहीं. घट उत्पन्न झाला त्यापूर्वीं माती होती, घटांत माती आहे, फुटेल तेव्हां मातीच राहील. तेव्हां, माती प्रकृति आहे आणि हीच परमार्थतः आदि, अंत व मध्य कालीं आहे. पण घटाचें स्वरूप सादि व सान्त आहे. तत्रापि एकदा तें होतें असें म्हणावें लागतें. त्याप्रमाणें परमात्मा सर्व उत्पन्न वस्तूंची प्रकृति म्हणजे कारण आहे आणि जातमात्र त्याहून भिन्न नाहीं हें खरें आहे. परंतु, यांत सृष्ट

मृगजलाप्रमाणें मिथ्या आहे असें गृहीत धरावें लागत नाहीं. परमेश्वर अनाद्यनन्त व अविकल्प असून सृष्टिरूप कां धारण करिता झाला ? या प्रश्नांचें उत्तर 'लोकवत्तु लीलाकैवल्यम्' सूत्रांत दिलें आहे. याविरुद्ध सूत्राचे भाष्याचे शेवटीं शंकराचार्यांस आपल्या मताला अनुकूल असा शेरा द्यावा लागला आहे. सृष्टि झालीच नाहीं तेव्हां हे सूत्र सृष्टि झाली आहे हा लोकसमज घेऊन त्यांच्या समाधानाकरितां दिलें आहे असें त्यांस म्हणावें लागलें. तात्पर्य, कित्येक मतवादी सृष्टीचें मिथ्यात्व उपनिषदांत व सूत्रांत सांगितलें नाहीं असें म्हणतात; व परिणामवादाचा अंगीकार करितात. शंकराचार्यांच्या मिथ्यावादाविषयीं मॅक्समुल्लर म्हणतोः—

"The danger with Shankara's Vedantism was that what to him was merely phenomenal, should be taken for purely fictitious. There is, however, as great a difference between the two as there is between Avidya and Mithya-Jayana. Maya is the cause of a phenomenal and not a fictitous world."

**मिथ्यावादाचा व्यवहाराशीं संबंध नाहीं.**

१०. शंकराचार्यांचा मिथ्यावाद खरा किंवा परिणामवाद खरा याचा निर्णय करणें दुरापास्त आहे. याशिवाय, द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत वगैरे वादांत पडण्याचें आपल्यास कारण नाहीं. मात्र येथें एवढें सांगितलें पाहिजे कीं, हा मतभेद असला तरी मुख्य विषयासंबंधानें त्यांचा कोठेंच विरोध नाहीं. पुष्कळ लोक असें समजतात कीं हें मत अग्राह्य व वेडगळ आहे, पण ह्यांत त्यांची चुकी आहे. मुख्य गोष्ट ही चुकते कीं, ते एकपक्षीं सृष्टि मिथ्या मानतात व आपणांस खरे समजतात. कारण ते सृष्टि मिथ्या केव्हां आहे याचा

विचार करीत नाहींत. ब्रह्माचा अनुभव झाला म्हणजे मग सृष्टि मिथ्या आहे, तत्पूर्वी ती मिथ्या मानतां येत नाहीं, असें शंकरार्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. मजला एका मित्रानें विचारलें, “ कांहो, संसार व सृष्टि जर मिथ्या आहेत, तर मग आपणांस अरण्यांत गेलें पाहिजे. आणि ह्या दृष्टीनें आमचें कर्तव्य काय आहे? ह्या प्रश्नाचा नेहमींच्या वेदान्तिकरीत्या जबाब असा–शिष्यानें गुरूला म्हटलें, “अहो हा हत्ती मिथ्या आहे तर तुम्हीं कां पळतां ?” गुरूनें उत्तर दिलें कीं “बाबा हे माझें पळणें कोठें सत्य आहे? तेंहि मिथ्याच आहे.” सारांश संसार मिथ्या आहे तर आम्ही संसार करितों हें तरी कोठें खरें आहे ? परंतु, मी त्यास निराळ्या रीतीनें उत्तर दिलें. मीं म्हटलें, “आपण जर अरण्यांत गेलों तर मिथ्या सृष्टींतून बाहेर गेलों काय ? शहरांतलीं माणसें, रस्ते, झाडें खोटीं, आणि अरण्यांतले वृक्ष, पर्वत काय खरे आहेत ?” दुसरें, आपण कसें वागावें याचा निकाल किंवा मार्ग वेदान्ताच्या सिद्धांतांतून काढणें म्हणजे बीजगणिताच्या एखाद्या नियमानें वनस्पतिशास्त्राचे नियम शोधून काढण्यासारखें आहे. व्यवहारांत आपण कसें वागावें हें सांगणारीं व्यवहारशास्त्रें व धर्मशास्त्रें आहेत; व्यवहाराचा वेदान्ताशीं मुळींच संबंध नाहीं. संसार खोटा, सृष्टि मिथ्या हीं तत्त्वें केव्हांचीं आहेत ? तर मनुष्य व्यवहाराच्या बाहेर ब्रह्मैक्याशीं जाऊन मिळेल तेव्हांचीं. श्रीमच्छंकराचार्यांनीं प्रारंभीं उपोद्घातांतच जेथें अध्यास सांगितला आहे तेथेंच स्पष्ट असें सांगितलें आहे कीं, सर्व शास्त्रें ‘अविद्याविषयाणि’ आहेत. मनुष्य हत्या करील तर देहांतशिक्षा धर्मशास्त्रांत सांगितली आहे. पण आरोपी जर ‘नायं हंति’ असें म्हणून मी मारलें नाहीं, मारलें हें मिथ्या आहे, असें एकपक्षी वेदान्तवाक्य लावील तर त्यास असेंच उत्तर दिलें पाहिजे कीं, तुला देहान्त शिक्षा दिली जात आहे; पण ‘ न हन्यते ’ या न्यायानें तुझें

मरणें मिथ्या आहे. सारांश, वेदान्ताच्या परम रहस्याची योजना व्यवहारास लावून खऱ्या वेदान्तशास्त्रास असमंजस म्हणणारे लोक स्वतः असमंजस आहेत असें म्हणावें लागतें. ज्या वेळेस अशी स्थिति होईल कीं, सर्व जग परब्रह्म होईल, ज्या वेळेस उपनिषदांत वर्णिल्याप्रमाणें "वेदा अवेदा भवंति" वेदसुद्धां अवेद होऊन जातील, मग ब्राम्हणोऽब्राम्हणः क्षत्रियोऽक्षत्रियः पौल्कसोऽपौल्कसः' ब्राम्हण, क्षत्रिय, चाण्डाल वगैरे भेद कोठून राहणार? व त्या वेळेस सृष्टि,संसार व जग हें मिथ्या आहे असा निश्चय होईल व तो निश्चय कोणत्याहि व्यवहाराचे आड येणार नाहीं.

**मिथ्यात्वाची एक उपपत्ति.**

११. जगताचें मिथ्यात्व कसें संभवनीय आहे याची एक तऱ्हेनें कल्पना होऊं शकेल असें मला वाटतें. सृष्टि केवळ भेदामुळें आपल्या अनुभवाड येते ही गोष्ट लक्षांत आणिली पाहिजे. ह्या भिंतीचा रंग पांढरा आहे, खुर्च्या तांबूस रंगाच्या आहेत, हें झाड इतकें उंच आहे, तें जमिनीवर वाढत गेलें आहे, आकाशांतील सूर्य दैदीप्यमान असून पृथ्वीपासून इतका दूर आहे, चंद्र कमी तेजस्वी असून जवळ आहे, अशाप्रकारचें प्रत्येक वस्तूचें ज्ञान त्यांच्या भेदामुळें होतें. ह्याच गोष्टीला उपनिषदांत नामरूप असें म्हटलें आहे. यांत भेद करणाऱ्या इतर सर्व कारणांचा अंतर्भाव आहे असें मी समजतों. सहस्रावधि पदार्थांचे निरनिराळे गुणधर्म (properties) आपल्या अनुभवास येतात, यामुळेंहि सृष्टीचा प्रत्यय आपल्यास होतो. पण ज्या वेळेस निदिध्यासानें सर्व जगत् परमेश्वरमय आहे असें स्पष्ट आपल्या बुद्धिरूढ होईल, ज्या वेळेस तुम्ही व मी एक आहों, भिंत खुर्च्या टेबलें एक आहेत असें आपल्यास वाटेल, सूर्य, चंद्र, पृथ्वी हीं सर्व एकरूप होऊन त्यांमधील हा प्रचंड अवकाशहि परमेश्वरानें

आकाशरूपानें भरला आहे असें बुद्धिगोचर होईल, एका तत्त्वांत ( element ) दुसरें तत्त्व मिसळलें असतां अमुक होतें पण मुळींच सर्व तत्त्वें एक होऊन मिसळणें हेंहि असंभवनीय होईल, तेव्हां हा सर्व भेद नाहींसा होऊन सृष्टीचें भान राहणार नाहीं. उपनिषदांच्या सर्व ऋषींत अग्रगण्य व शंकराचार्यांच्या मताचे आधारभूत असे याज्ञवल्क्य म्हणतात "यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत् तत्केन कं पश्येत् केन कं जिघ्रेत्. " ज्या ठिकाणीं सर्वच आत्मयय याला झालें, त्या ठिकाणीं कोणी कोणाला कशानें पाहावें व कशानें कोणास घ्राण करावें ? सारांश, भेदभाव जेव्हां मुळींच नाहींसा होऊन सर्व सृष्टीचें परमेश्वरस्वरूप आपल्यास दिसेल, त्या वेळेस केवळ भेदभावानें अनुभवास येणारी सृष्टि मुळींच राहणार नाहीं. ती वाळवंटांतील मृगजळाप्रमाणें सत्यवस्तु समजल्यानें आपोआप नाहींशीं होईल.

वेदान्तशास्त्राचे सिद्धान्त जसे श्रुतिप्रमाणावर अवलंबून आहेत तसेच ते अनुमान व युक्तिवाद यांसहि धरून आहेत, ही गोष्ट प्रत्येक वेदान्तशास्त्राचें अध्ययन करणारास दिसून येते. नुसतें बाबावाक्यं प्रमाणं असें सांगण्याचा वेदान्ताचा उद्देश नसून आपल्या युक्तीस काय जुळतें हेंहि दाखविण्याचा विशेषतः वेदान्तसूत्रकाराचा प्रयत्न असतो. सांख्य, योग इत्यादि केवळ तर्कावर पायावद्ध झालेल्या सिद्धातांशीं सामना करतांना वेदान्तशास्त्रास असें करणें जरूर पडलें. याच कारणानेंहि पाश्चात्य शास्त्रें व वेदान्तशास्त्र यांची ही तुलना व ऐक्य करणें जरूर व शक्य आहे. पाश्चात्य तत्त्वशास्त्रें व आधिभौतिक शास्त्रें यांच्या मतांस व शोधांस वेदान्तशास्त्र कितपत धरून आहे, हें या लेखांत प्रतिपादिणें आहे.

सृष्टि ब्रह्मापासून उत्पन्न झाली, ब्रह्मांतच राहते, आणि ब्रह्माचे ठिकाणीं लीन होणार असें जर आहे, तर ब्रह्माचें अस्तित्व त्रिकाला-

बाधित आहे हें सिद्ध आहे. अशा रीतीनें 'ब्रह्म सत्यं' म्हणजे त्रिकालाबाधित अस्तित्वाचें आहे, ही गोष्ट कबूल केली म्हणजे 'जगन्मिथ्या' हें तत्त्व साहजिक प्राप्त होतें. जगत् पूर्वी नव्हतें, पुढें राहणार नाहीं, व हल्लीं आहे तेंहि ब्रह्मस्वरूप आहे, ही गोष्ट कबूल झाली म्हणजे जगन्मिथ्या हें मत कबूल केलेंच पाहिजे. परंतु जगताचें मिथ्यात्व आपल्या अनुभवास येत नाहीं, यामुळें हा सिद्धान्त जरी प्राप्त झाला तरी आपली बुद्धि तो कबूल करीत नाहीं. तेव्हां "जगन्मिथ्या" या वाक्याचा निराळा अर्थ करून जग नाशवंत आहे एवढाच अर्थ कांहीं लोक घेतात. पण शास्त्रदृष्ट्या जगताचें मिथ्यात्व कबूल केलें पाहिजे, व तें अनुभवासहि येण्यासारखें आहे. मात्र 'ब्रह्म सत्यं' ही गोष्ट पूर्ण अनुभवारूढ झाली म्हणजे 'जगन्मिथ्या' हेंहि अनुभवास येईल यांत संशय नाहीं. याची उपपत्तिही आपल्याला दाखवितां येते. जगताचें अस्तित्व किंवा सत्यत्व आपल्या अनुभवास येतें तें केवळ भेदामुळें येतें ही गोष्ट लक्ष्यांत आणली पाहिजे. मीं तूं, पृथ्वी आकाश, चंद्रसूर्य, कागद लेखणी, लाकूड, दगड इत्यादि, सर्व पदार्थांचा अनुभव भिन्नपणामुळें आपणांस येतो. घट ही माती आहे या दृष्टान्तावरून आपण चढत चढत सर्व दृश्य जात ब्रह्म आहे हें जर सिद्ध झालें व प्रत्ययास आलें,--म्हणजे पृथिवी, आप, तेज, वायु, आकाश सर्वच जर ब्रह्मस्वरूप म्हणजे एक पदार्थ आहे, पाहणारा ब्रह्मरूप असून सूर्यहि ब्रह्म आहे, व त्यामधील अन्तराकाशहि ब्रह्म आहे, तर सूर्य व पाहणारा ह्या निराळ्या कोट्या उरणारच नाहींत, व हें भेदभावानें अस्तित्वांत असणारें जगत् नाहींसें होऊन जाईल. उपनिषदासारखें उदात्त विचाराचे तत्त्वांतें भरलेले धर्मग्रंथ कोठेंच नसतील. वर सांगितलेलीं उपपत्ति उपनिषदांत अत्यंत मनोवेधक रीतीनें सांगितली आहे. याज्ञवल्क्य म्हणतात "यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्

तत्केन कं पश्येत् केन कं श्रुणुयात् केन कं जिघ्रेत्." जेथें सर्वच ब्रह्म-स्वरूप झालें तेथें कोणी कोणास कशानें पहावें, कोणी कोणास कशानें ऐकावें ? सारांश, 'ब्रह्म सत्यं' या सिद्धांताचा वर्तमानकाळीं पूर्ण अभिनिवेश झाला म्हणजे वर्तमान काळींहि "जगन्मिथ्या" हें खरें वाटणार आहे. असो, एवढाच मागील विपयाचा परामर्ष घेऊन आपण आतां " जीवो ब्रह्मैव नापरः" या द्वितीय चरणाकडे वळूं.

जर 'तूं' किंवा दृश्य जग परमेश्वरस्वरूप आहे तर 'मी' राहिलेला एकच पदार्थ परमेश्वरावांचून व्यतिरिक्त कसा असूं शकेल ? सारांश, मागील अनुरोधानें 'जीवो ब्रह्मैव नापरः' हें म्हणणें साहजिकच प्राप्त होतें. मी, आणि तूं ( म्हणजे जगत् ) सचेतन आणि अचेतन, या भेदानें प्रत्यक्ष आपल्यास भिन्न दिसतात. पाश्चात्य शास्त्रास अद्याप सचेतन, कोटा काय आहे याचा शोध लागला नाहीं. कित्येक जीव म्हणून मॅटरशिवाय कांहीं निराळा पदार्थ आहे असें मुळींच मानीत नाहींत. Consciousnss हा एक मॅटरच्या विशिष्ट स्थितीचा गुण आहे. Heat, light, electricity इत्यादि जसें motion अथवा गतीचें विशिष्ट स्वरूप आहे त्याप्रमाणें जीव हाहि एक त्याहून अधिक विशिष्ट प्रकार असावा असें कोणी मानतात. परंतु सचेतन व अचेतन यांच्या मधली सांधणारी सांखळी अद्याप पाश्चात्य भौतिकशास्त्रास सांपडली नाहीं ही गोष्ट सर्वविदित आहे. प्रोफेसर बोसप्रभृति रसायनशास्त्रपारंगत विद्वान् लोक या विषयाचा अभ्यास करीत आहेत, व ही शक्यतेच्या बाहेरची गोष्ट आहे असें म्हणतां येत नाहीं. माझ्या मतें वेदान्तशास्त्राचा सिद्धांत वरील तत्त्ववेत्त्यांच्या विचारांस विरुद्ध पडणार नाहीं. कारण अचेतन जग ब्रह्म असून सचेतन जीव हाहि जर ब्रह्मच आहे तर दोहोंमध्यें सांखळी असून ती कधीं तरी दृश्य किंवा प्रत्ययास आणण्याजोगी होईल यांत वेदान्त्यास आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

जीव म्हणजे व्यक्त ब्रह्मस्वरूप असून जगत् किंवा अचेतन हें अव्यक्त ब्रह्मस्वरूप आहे असें वेदान्तशास्त्राच्या सिद्धांताचें तात्पर्य आहे. ब्रह्मस्वरूप सर्वांशी जरी वर्णन करितां येत नाहीं, तरी 'सत्, चित्, आनंद' ह्या तीन गुणांचें त्याच्या ठिकाणीं अस्तित्व वेदान्तांत स्पष्ट सांगितलें आहे. सत् म्हणजे त्रिकालाबाधित सत्ता; ही जीवाचे ठिकाणीं आहे हा सिद्धांत सर्व धर्मांस कबूल आहे. Soul म्हणजे जीव immortal म्हणजे अविनाशी आहे हें सर्वधर्म मानतात; पण तो अनुत्पन्न आहे असें मानीत नाहींत. ख्रिस्ती लोक जीवास अविनाशी मानतात पण त्यास आदिमत् समजतात. वस्तुतः जीव अनन्त आहे तर तो अनादि मानणें विशेष युक्तीचें दिसतें. हिंदुस्थानांतील सर्व मतवादी—मग ते सांख्य असोत, किंवा बौद्ध असोत, किंवा इतर असोत,—जीवास अनादि व अनन्त मानतात, व यामुळें transmigration of soul म्हणजे जीवाचें पुनरागमन वेदान्तशास्त्रांत व इतर आर्यशास्त्रांत मानलें गेलें आहे. इतर धर्मांच्या मताप्रमाणें soul उत्पन्न होऊन मनुष्याच्या मरणोत्तर कोठें तरी—मग स्वर्गांत म्हणा किंवा थडग्यांत म्हणा—अविनाशी असा राहतो.

जीवाला अचेतनाप्रमाणें सत्त्व आहे पण अचेतनांत जे चित् व आनंद गुण व्यक्त नाहींत ते जीवांत व्यक्त आहेत. किंबहुना हा त्याचा मुख्य भेद. चित् म्हणजे ज्यास इंग्रजींत consciousness म्हणतात, हा जीवाचा मुख्य गुण आहे, ह्याशिवाय जीवाची कल्पनाच होत नाहीं. ब्रह्माचा आनंदहि जीवामध्यें व्यक्त राहतो, हें प्रत्येक मनुष्याच्या अनुभवास येणारें आहे. जिवन्त असणें, म्हणजे मी जिवन्त आहे असें भान असणें, हाच एक प्रकारचा मोठा आनंद आहे यांत संशय नाहीं. उपनिषदांतहि 'यद्येष आनंदो न स्यात् को ह्येवान्यात् कः प्राण्यात्' असें स्पष्ट म्हटलें आहे. "जर हा आनंद नसता तर कोण

श्वासोच्छ्वासाची क्रिया करता व जिवंत राहण्याची खटपट करता ?"

सारांश, जीव सच्चिदानंदस्वरूप आहे यांत शंका नाहीं.

मनुष्याचें शरीर हें अचेतन आहे ही गोष्ट सर्वसंमत आहेच. पण इंद्रियें, मन आणि बुद्धि हींहि अचेतन कोटींतलीच आहेत असें वेदान्तशास्त्राचें मत आहे. एकंदर वस्तूंचें ज्ञान इंद्रियद्वारा जीवास होतें, व इंद्रियांचा मनाच्या द्वारानें बुद्धीशीं संबंध झाल्यानें तेथें निश्चय होतो. या तीन्ही पदार्थांचें ज्ञान अद्याप भौतिक शास्त्रांस चांगलें झालेलें नाहीं. नाडीचक्र ( Nervous system ) म्हणून जी व्यवस्था प्रत्येक सजीव शरीरांत आहे त्याचेंच हे तीन भाग आहेत असें दिसतें. परंतु श्रोत्रादि ठिकाणीं आलेल्या ( nerves ) नाड्यांना निरनिराळे अनुभव कसे येतात व निद्रेच्या वेळेस तसे अनुभव कां येत नाहींत हें स्पष्ट रीतीनें अद्याप पाश्चात्य वैद्यकशास्त्रास कळलेलें नाहीं. तत्रापि इंद्रियें, मन व बुद्धि हीं भौतिक ज्ञानसाधनें आहेत, व त्या सर्वांस nervous system म्हटलें तरी चालेल. सारांश, इंद्रियें, मन व बुद्धि अचेतन कोटीपैकीं आहेत हा वेदान्तशास्त्राचा सिद्धांत पाश्चात्य शास्त्राच्या मताच्या विरुद्ध नाहीं. या nervous system हून जीव कोणी निराळा आहे, तो राग द्वेष-सुखदुःखाचा अधिष्ठाता आहे, हें जरी सिद्ध करितां येत नाहीं तरी सर्वसंमत आहे व तें गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं.

इंद्रियमनोबुद्धीनीं सहित असा जीव ब्रह्मच असून सच्चिदानंदस्वरूप आहे हें येथवर उपपादन झालें. जीवाचें आणि ब्रह्माचें ऐक्य केलें म्हणजे कित्येक प्रश्न उद्भवतात, त्यांचाहि निर्णय वेदान्तशास्त्रांत केलेला आहे. "नात्माऽश्रुतेः" इत्यादि सूत्रापासून, ब्रह्मसूत्राच्या २ऱ्या अध्यायाच्या ३ऱ्या पादांत, जीवाविषयींच्या सर्व शंकांचें निराकरण केलें आहे. जीव अणुपरिमाण किंवा मध्यमपरिमाण नसून विभु आहे. शरी-

रांत, डोक्यांत किंवा हृदयांत आत्मा आहे असें आपण म्हणतों तें केवळ त्या ठिकाणीं विशेष अनुभव येतो म्हणून म्हणतों; वस्तुतः जीव ब्रह्माप्रमाणें विभु म्हणजे सर्वव्यापी आहे. येथें अशी शंका उत्पन्न होते कीं, जीव जर सर्वव्यापी आहे तर एका मनुष्याचीं सुखदुःखें दुसऱ्यास कां होत नाहींत ? न्यायशास्त्रांत अनेक जीवात्मे मानले आहेत याचें कारण तरी हेंच आहे. परंतु वेदान्तशास्त्र या शंकेचें समाधान निराळ्या रीतीनें करितें; सर्वव्यापी जीवाला देहाभिमानानें निरानिराळें सुखदुःख होतें. किंबहुना जीव ब्रह्मच असतानाहि त्यास सुखदुःखाचा हा अनुभव याच कारणानें येतो. जर देहाभिमान जीवास नसेल तर त्यास सुखदुःख मुळींच होणार नाहीं. प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न विभु आत्मे मानले तरी ही शंका राहतेच. कारण सर्व आत्मे विभु असल्यानें सर्व देहाचीं सुखदुःखें प्रत्येकास झालींच पाहिजेत. तेव्हां एकच ब्रह्म जीवस्वरूपानें सर्व ठिकाणीं आहे व त्या त्या देहाच्या अभिमानानें त्याला सुखदुःख निरानिराळें होतें, ही गोष्ट विशेष सुयुक्तिक दिसते.

जीवाचें ब्रह्मत्व स्वीकारलें तर जीव स्वतंत्र असून तो चांगलें वाईट कर्म करितो, ही गोष्ट संभवते कीं नाहीं हाहि प्रश्न साहजिक निघतो. परंतु वेदान्तशास्त्रांत जीवाला स्वतंत्रकर्तृत्व मानलें आहे. कारण व्यवहारांत सर्व माणसें आपआपल्या कर्तव्याचीं अधिकारी आहेत. व शास्त्रेंहि, मनुष्य स्वतंत्रकर्तृत्वाचा अधिकारी आहे, असें मानून प्रवृत्त झालीं आहेत. नाहीं तर, अमुक करा, अमुक करूं नका, हें म्हणणें व्यर्थ होईल. बरें, स्वतंत्रता मनुष्याची आहे तरी तो ईश्वराधीन आहे, ही गोष्ट विसरतां कामा नये. मनुष्य ईश्वराधीन आहे, तर मग तो स्वतंत्र कशाचा, असें कोणी म्हणेल, तर ईश्वर मनुष्यास त्याच्या कर्माप्रमाणें फळ देतो, केवळ स्वेच्छाचारानें देत नाहीं हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे.

मनुष्याचें स्वतंत्रत्व कसें आहे, तो ईश्वराधीन कसा आहे, त्याच्यां कर्मानुसार त्यास ईश्वर फळ देतो किंवा स्वेच्छेप्रमाणें, दुसरें पक्षीं जीवात्मा परमात्म्याशीं अभिन्न आहे किंवा त्याहून निराळा आहे, व त्याचा सेवक आहे किंवा तदंश आहे, इत्यादि विषय गहन व वादग्रस्त असून विरोधी दिसतात. परंतु मला वाटतें वेदांताचे विचार या बाबतींत सर्व मतांहून पलीकडे गेले आहेत. हिंदुस्थानच्या आर्यांना राजकीय बाबतींत जरी प्रजासत्ताक राज्याची कल्पना आली नाहीं तरी तत्त्वविवेचनांत ते तेथपर्यंत पोंचले होते असें म्हटलें तरी चालेल. वरील विषयांवरील वेदान्ताची मतें प्रजासत्ताक राज्याची आपण कल्पना केली असतां आपल्या समजुतीस चांगलीं येतील. प्रजासत्ताक राज्याची सत्ता जशी प्रजेच्या प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं अंशतः आहे त्याप्रमाणें प्रत्येक जीव ब्रह्माचा अंशभूत आहे. सर्व व्यक्तींचें समष्टि स्वरूप म्हणजेच प्रजासत्ताक राज्यसत्ता होय. असें जरी आहे, म्हणजे प्रजासत्ताक राज्यात प्रत्येक व्यक्तीस असें जरी म्हणतां येईल कीं मीच राजा आहे, तरी तो आपआपल्या सुखदुःखाचा व कर्माचा निरनिराळा अनुभव घेणारा आहे, व त्यांत प्रत्येक मनुष्याची आपल्या कर्माबद्दलची जबाबदारी नाहींशी झालेली नसते. प्रत्येक मनुष्य आपआपल्या कर्मानुसार सुखदुःख भोगतो इतकेंच नव्हे, तर त्याचें शासन किंवा अभिनंदन त्या त्या कर्मानुसार राज्याकडूनहि होतें. सारांश, प्रजासत्ताक राज्यांत जरी राजसत्ता प्रत्येकाचे ठिकाणीं आहे तरी मनुष्यास पाहिजे तें करण्याचा अधिकार नाहीं, त्यास राज्याचे कायद्याप्रमाणें वर्तन केलेंच पाहिजे. बरें, आपआपली स्थिति सुधारण्याचा प्रत्येकास अधिकार व अवकाशहि आहे, म्हणजे पाहिजेल तो मनुष्य प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्षहि होऊं शकतो. ईश्वरकोटि वेदान्तांत परमेश्वराहून भिन्न मानली आहे ती प्रजासत्ताक राज्याच्या प्रेसिडें-

टांच्या स्थानापन्न आहे असें मानिलें पाहिजे. मनुष्य आपल्या कृतीनें ईश्वरहि होऊं शकेल. " जगद्व्यापारवर्जम् " या सूत्रानें वर्ज केलेल्या गोष्टीशिवाय जीव ब्रह्माच्या ऐक्याचा अनुभव झाल्यावर मनुष्य कोठपर्यंत जाऊं शकतो हें ब्रह्मसूत्रांत स्पष्ट सांगितलें आहे. असो; प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्ष जसा प्रत्येक व्यक्तीस त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणेंच फळ देऊं शकतो, अधिक देऊं शकत नाहीं त्याचप्रमाणें ईश्वरकृत प्रयत्नसापेक्ष आहे असेंहि वेदांताचें मत आहे. सारांश, जीवाचें स्वतंत्रकर्तृत्व ईश्वराधीनत्वाला अविरोधि कसें आहे, तसेंच जीव परमेश्वरांशत्वाला विरोध न येतां आपल्या कर्तृत्वानें किती उन्नत स्थितीला पोहोंचूं शकतो, याची नीट कल्पना प्रजासत्ताक राज्याच्या दृष्टान्तानें चांगली येईल.

" ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ", " जीवो ब्रह्मैव नापरः " या वेदान्ताच्या दोन मुख्य सिद्धान्तांचें समर्थन, परमेश्वर व जीव यांची कल्पना गृहीत* धरिली म्हणजे युक्तीला धरून आहेत तसेंच ते

---

*This life and the next नांवाच्या इंग्रजी पुस्तकांत अनेक विद्वानांचीं मतें एकत्र केलीं आहेत तीं वेदान्तशास्त्राला कशीं जुळून येतात हें खालील उताऱ्यावरून कळेल.

The glorious idea of a divine creator whose providence watches over the world, the immateriality of the soul, and lastly its immortality–that consolation of persecuted and suffering virtue–can these be nothing more than amiable and splendid chimeras ?

MADAME ROLAND.

प्रत्ययासहि येण्यासारखें आहेत असें वेदान्ताचें मत आहे. आधुनिक भौतिक शास्त्रें तर्क ( reason ) व प्रत्यय ( Experiment ) या दोन बळकट पायांवर रचिलीं आहेत. हिंदुस्थानच्या परम बुद्धिवान् प्राचीन ऋषींनीं वेदान्तसिद्धान्तहि युक्ति आणि प्रत्यय याच दोन पायांवर बांधिले आहेत असें म्हटलें पाहिजे. "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या" हें युक्तीस जुळलें पण प्रत्ययास येत नाहीं व येण्यासारखें नाहीं, असें साधारणपणें प्रत्येक मनुष्यास वाटतें. तसेंच " जीवो ब्रह्मैव नापर: " हा परमोच्च व उदात्त सिद्धांतहि डळमळीत म्हणजे प्रत्ययारूढ होण्यास अयोग्य आहे असेंहि सार्वत्रिक मत आहे. पण वेदान्तशास्त्राचा हेतु केवळ सिद्धांत सांगावयाचा नसून त्या सिद्धान्ताचा प्रत्यय कशा रीतीनें होईल हेंहि सांगावयाचा आहे. उपनिषदांत सांगितलेल्या श्रवणमनननिदिध्यासादि मार्गांनीं वेदान्तसिद्धांत प्रत्ययास येण्यासारखे आहेत असें पूर्वाचार्य सांगत आले व तें संभवनीय आहे असें मलाहि वाटतें.

वाचकांची रजा घेण्यापूर्वी आणखी एक मुद्दा, जरी तो विषयाला थोडासा सोडून आहे तरी, सांगितल्यावांचून राहवत नाहीं. "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या " हा सिद्धांत वेदान्तासारख्या महाशास्त्रानें घेतल्यापासून हिंदुस्थानचें फार नुकसान झालें आहे असें पुष्कळांचें मत आहे. जगताचें मिथ्यात्व अनुभवास येण्यासारखें नाहीं इतकेंच नाहीं, तर हा खोटा सिद्धांत हमेशा लोकांच्या कानीं पडत असल्यानें व तोहि त्यांनीं संमत मानलेल्या आचार्य, साधुसंत इत्यादि महापुरुषांच्या तोंडून वारंवार लोकांच्या बुद्धीवर आदळत असल्याकारणानें हिंदु लोकांची प्रकृति शिथिल, निस्तेज, उत्साहरहित झाली आहे, व जगताच्या मिथ्यात्वाच्या कल्पनेमुळें जगतांतील सुखास व उन्नतीस ते आंचवले आहेत असें पुष्कळ लोकांचें मत आहे. मला वाटतें हें मत निराधार व

बारकाईच्या विचाराला सोडून आहे. प्रथम तर, जगत् मिथ्या आहे ह्या सांगण्याचा लोकांच्या प्रकृतीवर कांहीं परिणाम घडून आला आहे असें मुळींच दिसत नाहीं. प्रवृत्तीकडे मनाची नैसर्गिक धांव इतकी जोरदार आहे कीं, तुकाराम, रामदास वगैरे प्रभृतींनीं जरी कंठशोष केला तरी जगताची रहाटी अणुरेणु तरी बदलली आहे असें कोणी प्रतिपादन करणार नाहीं. हिंदुस्थानाची अवनति—म्हणजे जगताच्या व्यवहारांतील दुर्दशा—आपल्यास दिसत आहे तिचीं कारणें जगताच्या व्यवहारांतच शोधिलीं पाहिजेत. वेदान्तासारख्या पारमार्थिक कार्या-करितां उत्पन्न झालेल्या शास्त्रावर आपल्या अवनतीचा दोष लादणें म्हणजे चोराला सोडून संन्याशाला सुळीं देण्यासारखें आहे.

आतां येथें कोणी म्हणेल, " जरी तुमच्या बोलण्याचा व उप-देशाचा परिणाम प्रत्यक्ष आमचेवर होत नसेल तरी तुम्ही असें सांग-तांच कां कीं हें जग मिथ्या आहे, मनुष्यांनीं प्रवृत्तिमार्ग सोडून निवृत्तीकडे वळलें पाहिजे ? वैराग्यधारण केल्यावांचून मोक्ष नाहीं अशा तुमच्या—म्हणजे आमच्या धर्मगुरूंच्या—वटवटीपासून आम्ही आपला उद्योग जरी सोडला नाहीं तरी अप्रत्यक्ष रीतीनें आमच्या मनावर कांहीं ना कांहीं परिणाम होईलच." नीट विचार केला असतां अशा प्रकारच्या कल्पना आपल्या लोकांत प्रचलित होण्याचें कारण मुख्यत: असें दिसून येतें कीं कांहीं अंशीं वेदान्त सांगणा-रांची चुकी आहे; व कांहीं अंशीं वेदान्त ऐकणारांची चुकी आहे, मुख्य चूक वक्त्याश्रोत्यांची अशी होते कीं " ब्रह्म सत्यं " हा अनुभव झाल्यावर " जगन्मिथ्या " हें अनुभवास येणारें आहे. हें आपण लक्षांत घेत नाहीं. कोणतीहि गोष्ट एकदेशीय घेतली म्हणजे तिजविषयीं अशा प्रकारचा गैरसमज झालाच पाहिजे. शिष्यानें जेव्हां गुरूस म्हटलें—" गुरुजी, पळतां कां ? हा हत्ती मिथ्या आहे " त्या

वेळेस एकदेशीयच विचार शिष्यानें केला होता. फक्त इत्ती तेवढा मिथ्या आणि गुरुजींचें पळणें तेवढें खरें असें कसें संभवेल ? "यत्र-त्वस्य सर्वमात्मैवाभूत्" असें जेव्हां होईल तेव्हांच भेदभावानें अस्तित्वांत असणारें जगत् नाहींसें होणार आहे. आणि जगताचें मिथ्यात्व, आपल्यास खरें समजून, कधींहि वेद्य होणार नाहीं. जगताचे सर्व नियम, सर्व शास्त्रें, सर्व विहित-निषिद्धादि विचार, जगतांत असलेच पाहिजेत, व ते पाळलेच पाहिजेत. वेदांतशास्त्राचा कटाक्ष इतर शास्त्रांचा किंवा नीतीचा उच्छेद करण्याकडे नाहीं. आणि प्रवृत्तीचाहि उच्छेद करण्याकडे नाहीं. किंबहुना सूत्रांचा व गीतेचा व उपनिषदांचा योग्य विचार केला असतां, असला भ्रामक समज गैर आहे हें लागलेंच दृष्टोत्पत्तीस येण्यासारखें आहे.

प्रथमतः ही गोष्ट लक्षांत आणिली पाहिजे कीं, उपनिषदाच अध्ययन व तदुदित विषयांचें परिशीलन हें गृहस्थाश्रमाकरितां सांगितलेलें नाहीं. आश्रमव्यवस्था प्राचीन ऋषींनीं फार दूरदर्शित्वानें लाविली आहे असें म्हटलें पाहिजे. हा एक स्वतंत्र विषय अन्यत्र प्रतिपादित होईल, पण प्रत्येक मनुष्यानें ब्रह्मचर्य उत्तम पाळून व तदनन्तर गृहस्थाश्रम उत्तम साधून नंतर मोक्षाकडे वळावें असा उपनिषदांचा तीव्र कटाक्ष आहे. उपनिषदांत "आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः" अशी शिक्षा स्पष्ट सांगितली आहे. तसेंच 'ब्राह्मणो जायमानः त्रिभिः ऋणवान् भवति ब्रह्मचर्येण ऋषीन् यज्ञेन देवान् प्रजया पितृन्' असें सांगितलें आहे. ब्रह्मचर्य यथाशास्त्र संपादून ऋषींचें ऋण फेडलें पाहिजे, यज्ञयागादिकांनीं देवांचें ऋण फेडलें पाहिजे व यथाशास्त्र पुत्रोत्पादनानें पितरांचें ऋण फेडलें पाहिजे. सारांश, ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रमित्व प्रत्येकानें साधिलेंच पाहिजे. तेंही रडतखडत साधूं नका, असें उपनिषदें

सांगतात. कारण, "भूत्यै न प्रमदितव्यम्" अशी ही शिक्षा आहे.

आरभेतैव कर्माणि श्रान्तः श्रान्तः पुनः पुनः।
कर्माण्यारभमाणं हि पुरुषं श्रीर्निषेवते ॥

अशी मनूची गृहस्थाश्रम्याला खडखडीत ताकीद आहे. सारांश, प्रवृत्ति सोडा अशी उपनिषदाची किंवा धर्मशास्त्राची आज्ञा नसून, उलट ती सोडूं नका अशी आज्ञा आहे. मात्र प्रवृत्तीची जन्मभर सेवा करूं नका एवढें उपदेष्टव्य आहे. प्रत्येक मनुष्यानें उतारवयांत परोपकाराकडे व मोक्षाकडे लक्ष दिलें पाहिजे. पण त्याला तें अगोदर देतां येत नाहीं व देऊं नये, हें लक्षांत घेतलें पाहिजे. मनूनें उपनिषदांचा आशय मनांत घेऊन स्पष्ट म्हटलें आहे कीं,

ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत्।
अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः ॥

ब्रह्मसूत्रानें "ऊर्ध्वरेतःसुच शब्देहि" या सूत्रानें वेदान्ताचा अधिकारी चतुर्थाश्रमी ठरविलेला आहे. 'ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत्' अशी जाबालीची श्रुति आहे खरी, पण ती फक्त जाबालास लागू आहे, आणि इतरांनीं घेतली तरी शंकराचार्यासारख्या लक्षावधि लोकांपैकीं एखाद्यानेंच घेण्यासारखी आहे. सामान्य उपदेश म्हटला म्हणजे 'ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत्' हाच आहे. बरें, चतुर्थाश्रम्यांनीं वेदांतमार्ग स्वीकारल्यावर पाहिजेल तसें वर्तावें असें नाहीं. पुष्कळांचा असा समज आहे कीं एकदां सर्व ब्रह्मस्वरूप झाल्यावर मग पाहिजे तें करण्यास परवानगी आहे. उपनिषदांचा, सूत्राचा, किंवा धर्मशास्त्राचा असा मुळींच आशय नाहीं. धर्माचे व नीतीचे सर्व नियम वेदान्त्यासहि पाळिलेच पाहिजेत. मनूनें स्पष्ट म्हटलें आहे कीं—

चतुर्भिरपि चैवैतैर्नित्यमाश्रमिभिर्द्विजैः
दशलक्षणेका धर्मः सेवितव्यःप्रयत्नतः॥

धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥

यांतील अस्तेय, शौच ( स्वच्छता ), इंद्रियनिग्रह, सत्य, हे धर्म विशेषतः लक्षांत ठेवण्यासारखे आहेत, व ते सर्वांना सारखे पाळले पाहिजेत, हा श्रुतिस्मृतींचा पूर्ण कटाक्ष आहे.

असो, या मुद्दयाकडे जास्ती जातां येत नाहीं. प्रवृत्तीचें उत्तम सेवन केलें पाहिजे, संसार सर्वोत्कृष्ट करण्याचा यत्न केला पाहिजे, असाच उपनिषदांचा कटाक्ष आहे. कारण निसर्गतः बलवान् असा इंद्रियग्राम एरव्हीं ताब्यांत येणें कठीण आहे. हें जाणूनच वयोधर्माप्रमाणें प्रवृत्तीची निवृत्तीशीं सांगड घालून दिली आहे. इंद्रियदमन झाल्यावर विरागादि साधनांनीं ब्रह्माचें सत्यत्व प्रतीतीस आणिलें पाहिजे, म्हणजे मग "जगन्मिथ्या" हें प्रत्ययास येईल. "जगन्मिथ्या" यास अलीकडे सर्व ठिकाणीं आपण वापरूं लागलों, किंवा केवळ त्याचाच उपदेश उपदेशक करूं लागले, तर ती समजणाराची व सांगणाराची चुकी आहे; वेदान्तशास्त्राची नाहीं. पण मी याहि पुढें जातों. आपले उपदेशक नेहमीं "जगन्मिथ्या" अशी ओरड करितात, कोणत्या वयांत प्रवृत्तीचें सेवन आहे व कोणत्या वयांत किंवा स्थितींत निवृत्तीचें सेवन आहे हें सांगत नाहींत, असें जरी आपण गृहीत धरून चाललों तरी, "जगन्मिथ्या" या उपदेशानें आपण कर्तव्यपराङ्मुख कां होतों? कर्तव्यदक्ष कां होत नाहीं? जग खोटें आहे तर जगांतील सुख व दुःख दोन्ही खोटीं आहेत, असें असतां जगतांतलें सुख खोटें आहे एवढेंच एकदेशीयत्वानें आपल्या नैसर्गिक आलस्याला अनुकूल असें आपण घेतों व निरुत्साह व कर्तव्यपराङ्मुख होतों. जगतांतलें दुःख खोटें आहे व कशींहि संकटें आलीं तरी तीं मिथ्या आहेत, तेव्हां आपलें कर्तव्य आम्ही कर्तव्य या दृष्टीनें बजावणार, असें आपल्यास कां

वाटत नाहीं ? सारांश आपल्या अवनतीचीं कारणें निराळीं आहेत व त्या कारणांमुळें आपण वेदान्तशास्त्राच्या मतांचा एकदेशानें विपर्यास करितों. वस्तुतः वेदान्तमतानें मनुष्य कर्तव्यनिष्ठ होण्यास कोणतीहि आडकाठी नाहीं. हिंदुस्थानचा इतिहास पाहिला तरी असेंच दिसून येईल. ज्या वेळेस उपनिषदांसारखे ग्रंथ झाले त्या वेळेस आपली स्थिति अत्युच्च होती यांत शंका नाहीं. जेव्हां अर्जुन इतर कारणांनीं लढाईच्या वेळीं कर्तव्यपराङ्मुख होऊन शिथिल झाला त्या वेळेस श्रीकृष्णानें त्यास गीता सांगून कर्तव्यतत्पर केलें. भीष्मासारखे महान् वेदान्ती समरांगणीं कर्तव्याला शरीराची आहुति देऊन शरपंजरीं आनंदानें पडले. जगन्मिथ्या असल्यामुळें शरीराच्या वेदनाहि मिथ्या आहेत, ह्या दृढ समजुतीचाच प्रभाव होता असें म्हटलें पाहिजे. ज्या जपानी योध्यांनीं डायनामाईटांनीं भरलेल्या रणभूमीवर चाल करून आपले देह कर्तव्ययज्ञास अर्पण केले, ते जरी वेदान्ती नव्हते, तरी वेदान्त्यासारखी त्यांच्या मनाची शीतोष्ण–सुखदुःखें, जन्ममरण, सारखींच मानण्यासारखी स्थिति होती यांत संशय नाहीं. सारांश, वेदान्ताचा संसाराशीं व तदंतर्भूत आपल्या सुस्थितीशीं किंवा दुःस्थितीशीं वास्तविक कांहीं संबंध नाहीं. आपल्या अवनतीशीं जो वेदान्ताचा संबंध दिसतो तो केवळ आपल्या इतर दोषांमुळें होणाऱ्या एकदेशीय दृष्टीनें दिसत आहे. "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या" किंवा "जीवो ब्रह्मैव नापरः" हे सिद्धांत व्यवहारांत जशी आपली मनोवृत्ति असेल त्याप्रमाणें उपयोगी पडतील. कारण हेच सिद्धांत मनुष्यास कर्तव्यदक्षता, निराभिमान, भूतदया, समदृष्टि, निरालस्य, इत्यादि गुणांच्या उत्कर्षाकडे लावितां येतील, किंबहुना देशाकरितां निर्भय मरण्यास तयार करतील यांत शंका नाहीं.

---